प्रा.के.वि.(पू.बाबा) बेलसरे
यांचे साधकांबरोबर झालेले

# अध्यात्म संवाद

भाग-तिसरा

प्रा. के. वि. बेलसरे (पू. बाबा)
यांचे साधकांबरोबर झालेले

# अध्यात्म संवाद

भाग तिसरा

संकलन व संपादन
म. वि. केळकर



त्रिदल प्रकाशन

प्रा. के वि. बेलसरे (पू. बाबा)
यांचे साधकांबरोबर झालेले
अध्यात्म संवाद
भाग तिसरा

प्रथमावृत्ती : श्रीदत्तजयंती, मार्गशीर्ष शके १९२१, २२ डिसेंबर १९९९
पुनर्मुद्रण : २०००, २००१, गुरुपौर्णिमा, १३ जुलै, २००३



संकलन व संपादन :
म. वि. केळकर

मांडणी व सजावट :
श्री. राजाभाऊ मराठे

प्रकाशक :
श्रीमती स्नेहल टिळक
त्रिदल प्रकाशन
२५७, राणी बिल्डिंग,
प्रार्थना समाजजवळ,
गिरगाव, मुंबई - ४०० ००४.

अक्षरजुळणी :
अक्षय फोटोटाइपसेटर्स
१, चित्रकूट सोसायटी,
दर्शन टॉवरशेजारी,
डॉ. आंबेडकर मार्ग,
ठाणे (पश्चिम)- ४०० ६०१.

मुद्रक :
श्री. विश्वास गोखले
श्रीपाद प्रेस
२३७, नवी अमृतवाडी, वि. प. रोड,
मुंबई - ४०० ००४

किंमत १०० रुपये



पू. के. वि. बेलसरे

श्रीराम

अध्यात्मग्रंथ वाचून परमार्थमार्गात ज्यांना वाटचाल करावीशी वाटते त्यांना ते अवघडच जाते. यासाठी ज्ञानी माणसाकडून श्रवण केल्यास जरा सोपे जाते. अशा चर्चा दर शुक्रवारी होत असत. काही काही वेळा त्या अतिशय रंगत असत. ते सर्व स्मरणात ठेवून लिहून काढण्याचे काम प्रा. केळकरांनी केले, हे कौतुकास्पदच होय. त्यामुळे तर आज ही पुस्तिका होत आहे. अशा संवादात श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांना संमत अशा तऱ्हेने त्यांनी हा विषय स्पष्ट शब्दांत समजावून दिला; त्यांच्यावर श्रीमहाराजांचे अतिशय प्रेम होते. शिवाय विशेष कृपाप्रसादही होता. म्हणून या संवादरूपी पुस्तिकेला श्रीमहाराजांचे आशीर्वाद निःसंशय असणारच.

इंदिरा बेलसरे

# प्रस्तावना

*सर्वश्रुतिशिरोरत्नसमुद्भासितमूर्तये।*
*वेदान्ताम्बुजसूर्याय तस्मै श्रीगुरवे नमः॥*

**जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला। जयानें सदा वास नामांत केला।**
**जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ती। नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती॥**

अठ्ठावीस जुलै १९९९ला, गुरूपौर्णिमेदिवशी अध्यात्म संवादाच्या दुसऱ्या भागाचे प्रकाशन झाले. आता हा तिसरा भाग श्रीमहाराजांच्या चरणीं विनम्र भावाने अर्पण करीत आहे. दुसरा भाग प्रसिद्ध झाल्यानंतर अनेक वाचक आणि साधक मित्रांनी त्यांना हे संवाद आवडल्याचे फोन करून व पत्रे लिहून कळविले. त्या सर्वांचा मी आभारी आहे. सर्वांनी असाच लोभ ठेवावा म्हणजे चवथा भाग प्रसिद्ध करणे शक्य होईल.

ह्या भागात जे. कृष्णमूर्ती, कृष्णप्रेम, योगी श्रीअरविंद व मदर इत्यादींच्या लेखनातील बरेच उतारे दिले आहेत. चर्चेच्या वेळी उतारे वाचून झाल्यावर पू. बाबा उतारे असलेली पुस्तके खुणा ठेवून मला देत असत त्यामुळे हे उतारे देणे शक्य झाले आहे. इंग्रजी उतारे, हिंदी दोहे आणि पदे आणि संस्कृत श्लोकांचे बऱ्याच ठिकाणी कंसामध्ये भाषांतर दिले आहे. तथापि हे शब्दशः भाषांतर नाही.

नवीन वाचकांना या लेखनाची पार्श्वभूमी माहीत व्हावी म्हणून पहिल्या भागाची प्रस्तावना पुन्हा छापली आहे. जानेवारी १९९२ ते सप्टेंबर १९९३ अखेर पावणेदोन वर्षांत झालेल्या संवादांचा ह्या तिसऱ्या भागात समावेश केला आहे. संपादन करतांना शक्यतो पुनरुक्ती टाळली आहे व लक्षात आले त्या ठिकाणी कंसात पहिल्या दोन भागातील संवादांचे संदर्भ दिले आहेत. तथापि काही ठिकाणी पुनरुक्ती वगळणे शक्य असतानाही अनवधानाने ती राहिली असण्याची शक्यता आहे. त्याबद्दल मी वाचकांची क्षमा मागतो. तसेच लेखनात अन्य काही चुका राहिल्या असल्यास ती जबाबदारी माझी आहे.

दुसऱ्या भागाप्रमाणे ह्या भागाचेही बहुतेक सर्व लेखन पूर्वी चर्चेत भाग घेतलेल्या माझ्या मित्रांना व ती. आईना वाचून दाखवले आहे. पू. बाबा व ती.

आई यांचा तर मी ऋणी आहेच पण हा भाग ऐकतांना सर्वांनी वेळोवेळी ज्या बहुमोल सूचना केल्या आणि काही मुद्द्यांवर पुन्हा चर्चा केली त्याबद्दल मी त्यांचाही ऋणी आहे. वाचकांनीही त्यांच्या सूचना कळवल्या तर त्यांचा पुढच्या भागासाठी उपयोग होईल.

प्रकाशकांनी त्यांच्या पानामध्ये दुसऱ्या भागात श्री. वेर्लेकरांच्या माहितीची भर घातली होती. ह्या भागात डॉ. कुर्तकोटी व श्री हुच्चूराव यांच्या माहितीचा समावेश केला आहे.

पहिल्या दोन भागांप्रमाणे हा तिसरा भागही सर्वांगसुंदर व्हावा म्हणून प्रा. श्रीपादराव बेलसरे यांनी पू. बाबांची छायाचित्रे दिली. श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि अक्षय फोटोटाईपसेटर्सचे श्री. दीपक व श्री. अरुण फडके यांनी सजावट, मांडणी, छपाई इत्यादी सर्व कामे अतिशय आपुलकीने केली त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

श्रीमती स्नेहल टिळक आणि त्यांचे सहकारी यांनी त्रिदल प्रकाशनाच्या परंपरेला साजेल अशा सुबक स्वरूपात हा भागही माफक किंमतीत उपलब्ध करून दिला आहे. त्या सर्वांचाही मी ऋणी आहे.

- म. वि. केळकर

बी-३८, कमलपुष्प सोसायटी
बांद्रा रेक्लमेशन (पश्चिम)
मुंबई - ४०० ०५०
फोन २६४२ ९६ ६०
दिनांक १७ डिसेंबर १९९९.
Email : kelkar.mavi@gmail.com

# पहिल्या भागाची प्रस्तावना

*गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु: गुरुर्देवो महेश्वर:।*
*गुरुरेव परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नम:॥*

सन १९८४ पासून मी मालाडला दर शुक्रवारी संध्याकाळी ६-३० वाजता पू. बाबांकडे (प्रा. के. वि. बेलसरे) जाऊ लागलो. त्या वर्षी एक दिवस मी प्रा. श्रीपादराव बेलसरे यांना म्हणालो की पू. बाबा दर रविवारी ज्ञानेश्वरीवर निरूपण करतात ते ऐकावयाला यावे असे वाटते, पण घरच्या अडचणींमुळे रविवारी सकाळी बाहेर जाता येत नाही. ते म्हणाले, मग तुम्ही शुक्रवारी संध्याकाळी येत जा. शुक्रवारी संध्याकाळी पू. बाबांशी चर्चा करावयाला काही जण येतात; तुम्हीही येत जा. डॉ. रवीन्द्र ठोसर, डॉ. बाळासाहेब खापर्डे, श्री. दादा निकते आणि डॉ. दप्तरदार नियमित जात असत. आता मीही जाऊ लागलो. पुढे श्री. कवीश्वर आणि श्री. वसंतराव खरे येऊ लागले. शुक्रवारच्या चर्चा मंडळाची ही संख्या पू. बाबांनी शेवटपर्यंत कायम ठेवली. आमच्या खेरीज ती. आई, प्रा. श्रीपादराव आणि सौ. शोभावहिनी यांचा चर्चेत सहभाग असे. ते ह्या मंडळाचे पदसिद्ध सदस्यच होते. १९९३ मधील बॉम्बस्फोट आणि दंगलीनंतर संध्याकाळी ६-३० ऐवजी आम्ही ५-४५ वाजता जाऊ लागलो. शुक्रवारच्या चर्चांखेरीज गुरूपौर्णिमा, पू. बाबांचे वाढदिवस, गोंदवल्याचे पुण्यतिथी उत्सव आणि नाम साधन अभ्यास शिबिरे, हेबळ्ळीची शिबिरे अशा प्रसंगी पू. बाबांच्या खोलीत चर्चा होत असत त्यांचाही येथे समावेश केला आहे. ज्यावेळी मी चर्चेसाठी उपस्थित नसे त्यावेळी आमच्यापैकी कोणीतरी, विशेषत: डॉ. बाळासाहेब आणि श्री. खरे चर्चेची टिपणे लिहून नंतर ती मला देत असत.

सुरुवातीचे काही दिवस मी चर्चा फक्त ऐकत असे. पू. बाबांची चर्चेची शैली मोठी आकर्षक आणि आश्वासक होती. त्यामुळे अध्यात्म विषयाची विशेष माहिती नसतानाही मी या चर्चेत केव्हां भाग घेऊ लागलो याचा मला पत्ता लागला नाही. पुढे लक्षात आले की पू. बाबांची चर्चेची एक विशिष्ठ पद्धत आहे. विचारलेल्या प्रश्नांची वा शंकांची उत्तरे चर्चेत भाग घेणारांकडूनच मिळावी अशा कुशलतेने ते चर्चेचे सूत्रसंचालन करीत असत. चर्चेत भाग

घेणारांपेक्षा आपण कोणी वेगळे, श्रेष्ठ आहोत असे ते कधीही दाखवत नसत. 'आपली दृश्याची ओढ का बरे कमी होत नाही?' 'आपण किती सहज श्रीमहाराजांना विसरतो!' अशा प्रकारची वाक्ये त्यांच्या तोंडी असत. वास्तविक, तुमची दृश्याची ओढ का बरे कमी होत नाही असे त्यांना विचारावयाचे असे, पण त्यांनी तसे कधी विचारले नाही. त्यांचे ज्ञान आणि साधन यांनी चर्चा करणारे दबून जात नसत. त्यामुळे साहजिकच चर्चेमध्ये मोकळेपणा रहात असे. श्री. सद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे (श्रीमहाराजांचे) जीवन आणि शिकवण हा चर्चेचा केन्द्रबिंदू असे. प्रामुख्याने अध्यात्म विषयावर चर्चा होई म्हणून ह्या चर्चेस अध्यात्म संवाद असे नांव दिले आहे.

दोन-एक वर्षांनी माझ्या लक्षात आले की चर्चेत काही विषय पुनःपुन्हा येतात आणि पूर्वी याबद्दल काय चर्चा झाली ते आम्ही बऱ्यापैकी विसरलेले असतो. म्हणून १९८७ पासून माझ्या रोजनिशीत मी मुख्य मुद्यांची अथवा चर्चेच्या गाभ्याची नोंद करावयास सुरवात केली. चर्चेसाठी येणाऱ्या इतरांना हे जेव्हा समजले तेव्हां त्यांनी ती टिपणे वाचावयास मागितली. रोजनिशी देणे शक्य नव्हते म्हणून मग मी ती एका नोटबुकात लिहून त्यांना दिली. त्यानंतर टिपणे रोजनिशीत लिहिण्याऐवजी नोटबुकात लिहू लागलो. रोजनिशीत लिहिताना त्या दिवसाच्या पानाची मर्यादा असे ती आता राहिली नाही म्हणून मग चर्चा जास्त विस्ताराने नोंदून ठेवू लागलो. त्यामुळे सुरूवातीची काही टिपणे संवाद रूपात नाहीत.

चर्चा चालू असताना मी टिपणे घेत नसे. शुक्रवारची चर्चा पुढच्या आठवड्यात आठवेल त्याप्रमाणे लिहून ठेवत असे. त्यामुळे तपशीलात क्वचित त्रुटी राहिल्या असण्याची शक्यता आहे. डॉ. ठोसर, श्री. निकते इत्यादींनी नोटबुक वाचल्यावर एक दिवस मी ते पू. बाबांना वाचायला दिले. त्यांनी ते वाचले व विचारले की हे तुम्ही कशासाठी लिहित आहात? झालेली चर्चा आम्ही विसरतो, लिहून ठेवले की ते पुन्हा पहाता येते असे मी म्हणालो. ते म्हणाले की हे लिहिलेले सर्व ठीक आहे पण प्रत्येक वेळी पूज्य बाबा असे कशाला लिहिले आहे? मी म्हणालो की ही माझ्या रोजनिशीतली पाने आहेत. त्यात कोणासंबंधी काय लिहायचे याचे मला स्वातंत्र्य नाही का? ते फक्त हसले. यानंतर प्रत्येक नोटबुक लिहून झाले की मी ते प्रथम पू. बाबा व आई यांना वाचावयास देत असे व त्यांचे वाचून झाल्यावरच इतरांना देत असे. ही

संपूर्ण चर्चा त्यांनी वाचलेली आहे. तथापि त्यात काही चुका राहिल्या असल्यास त्याची जबाबदारी माझी आहे.

बरीच नोटबुके लिहून झाल्यावर माझ्या मनात येऊ लागले की आता हे लिहिणे पुरे झाले. पण जेव्हां जेव्हां माझ्या मनात असे येत असे तेव्हां तेव्हां पू. बाबा चर्चा चालू असताना मधेच "नाना, हे महत्वाचे आहे. हे नीट लिहून ठेवा बरे का" असे म्हणत. काही वेळा चर्चा बहारीची होत असे. तेव्हांही ते आजची चर्चा नीट लिहून ठेवा असे सांगत. त्यामुळे पुढे हे लेखन माझे न रहाता पू. बाबांनी सांगितलेले मला आवडणारे काम झाले.

काही वर्षापूर्वी चर्चेत सहभागी होणारांनी लिखाणाची प्रत आपल्याजवळ असावी अशी इच्छा व्यक्त केली म्हणून सर्व नोटबुकांच्या झेरॉक्स प्रती काढावयाचा विचार केला. किती प्रती काढावयाच्या ते ठरेना कारण प्रतींसाठी पू. बाबांनी काही नांवे सुचविली. श्री. श्रीपादरावांनी त्यात भर घातली. त्यामुळे ४०-४५ प्रतींपर्यंत आकडा गेला, म्हणून सध्या काहीच करू नका असे पू. बाबांनी सांगितले.

पू. बाबांच्या शेवटच्या आजारात याबाबतीत त्यांना काहीच विचारू शकलो नाही. पू. बाबा गेल्यावर एक दिवस पुस्तके आणि इतर कागदपत्रे आवरत असताना वाटले की आता या नोटबुकांचे काय करावयाचे? का ही रद्दीत जाणार? दि. ९ जुलै १९९८ गुरूपौर्णिमेदिवशी पू. बाबांची प्रार्थना करून त्यांना हा प्रश्न विचारला. पू. बाबांची प्रेरणा आली की चर्चा करणाऱ्या तुम्हा सर्वांची नांवे बगळून ही चर्चा लोकांच्या हाती देण्यास हरकत नाही. म्हणून त्या दिवशीच संपादनाच्या आणि पुनर्लेखनाच्या कामाला सुरुवात केली. प्रथम आमच्या नांवांऐवजी साधक असे लिहावयाचे ठरविले होते. (साधन करणारा तो साधक अशा मर्यादित अर्थानेच हा शब्द योजिला आहे). पण डॉ. ठोसर यांनी सुचविले की नुसते साधक लिहिल्यास एकच व्यक्ती परस्पर विरोधी विधाने करत आहे असे वाटेल म्हणून साधकांच्या नांवांऐवजी काही संकेत चिन्हांचा उपयोग करावा म्हणजे पू. बाबांचा उद्देशही सफल होईल. म्हणून नांवांऐवजी साधक अ, साधक प इत्यादी संकेत अक्षरांचा उपयोग केला आहे.

पू. बाबांना चर्चा आवडत असे. तथापि निव्वळ बौद्धिक कसरतीचा त्यांना तिटकारा होता. चर्चेतून साधकाच्या अध्यात्मविषयक संकल्पना स्पष्ट व्हाव्या आणि साधनात त्याची प्रगती व्हावी असे त्यांना वाटत असे. हे करतांना त्यांची त्यामागची तळमळ दिसत असे. अनेक वेळा चर्चेसाठी वेगवेगळे संदर्भ

काढून ठेवून ते आमची उत्सुकतेने वाट पहात असत. माहीत असूनही, समोरच्या माणसाच्या दोषांचा त्यांनी कधी उच्चार केला नाही आणि त्याला त्या दोषांतून मुक्त करण्याची खटपट केली. ह्या दृष्टीने त्यांची भूमिका शिक्षकापेक्षा श्रेष्ठ होती. पण आपण कोणीतरी मोठे आहोत असा गुरुत्वाचा भावही त्यांच्या वागण्यात नसे. Art lies in concealing art असे म्हणतात. आपली विद्वत्ता आणि अध्यात्मिक उंची पू. बाबांनी सर्वांपासून लपवून ठेवली होती. श्रीमहाराजांनी त्यांना अमानित्वाचा अभ्यास करावयाला सांगितले होते. श्रीमहाराजांच्या सांगण्यापासून ते तसूभरही ढळले नाहीत. अभ्यासावर त्यांचा कटाक्ष असे. तुम्ही अभ्यास करा, तुम्हाला साधेल असे ते नेहमी सांगत असत.

अध्यात्म विषय स्पष्ट होण्यासाठी ह्या संवादांचा उपयोग होईल असे वाटते. वाचकांना पसंत पडल्यास संवादांचे पुढचे भाग आवश्यक ते संपादन करून यथावकाश प्रसिद्ध करण्याचा मानस आहे. ह्या कामास ती. आईंनी शुभाशीर्वाद दिले आहेत. त्यांचा आणि पू. बाबांचा ऋणी राहण्याचे भाग्य लाभले याचा मला आनंद वाटतो.

मित्रवर्य श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि फडके बंधू यांनी पुस्तक चांगले व्हावे म्हणून आपलेपणाने सजावट, मांडणी, छपाई इत्यादी कामे स्वीकारली. त्यांचे आभार मानणे त्यांना आवडणार नाही म्हणूनच मी त्यांचा केवळ नामोल्लेख केला आहे. श्रीमती टिळक आणि त्यांचे सहकारी यांनी त्रिदल प्रकाशनाच्या आत्तापर्यंतच्या परंपरेला साजेल अशा सुबक स्वरूपात आणि माफक किंमतीत हे पुस्तक आमच्या हाती दिले आहे. त्यांचाही मी ऋणी आहे.

**- म. वि. केळकर**

मुंबई - ४०० ०५०
दि. १० नोव्हेंबर १९९८

# प्रकाशकाचे पान

सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांशी संबंध आलेल्या व्यक्तींची माहिती नसणाऱ्या काही वाचकांनी सूचना केली म्हणून पुस्तकात उल्लेख असलेल्या काही महत्त्वाच्या व्यक्तींविषयी संक्षिप्त माहिती देत आहोत.

**संदर्भ** : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज : चरित्र आणि वाङ्मय लेखक : प्रा. के. वि. बेलसरे.

**(१) श्रीतुकामाई** : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे गुरु. उच्च अशा आध्यात्मिक अवस्थेमध्ये वावरणाऱ्या या महात्म्याला गांवातील लोक 'वेडा तुक्या' म्हणत. त्यांची वृत्ति सदैव आनंदी असे. त्यांचा नामस्मरणावर दृढ विश्वास होता. स्वत: विठ्ठलोपासक असूनही त्यांनी श्रीमहाराजांना रामोपासना दिली. शके १८०९ मध्ये त्यांनी येहळेगांव येथें देह ठेवला. तेथें त्यांची समाधि असून दरवर्षी त्यांच्या पुण्यतिथीला तेथें मोठे अन्नदान होते.

**(२) श्रीआनंदसागर** : श्री. गोविंद अनंत कुलकर्णी. दहाव्या वर्षी यांचे वडील वारल्यानंतर प्रपंचाच्या दु:खमय अनुभवांनी यांची वृत्ति अंतर्मुख झाली. दासबोध वाचत असताना मन:चक्षूंसमोर श्रीमहाराजांची मूर्ती उभी राहिली व त्यांनी 'मला येऊन भेट' असे सांगितले. इंदूरला श्रीमहाराजांची भेट झाली. श्रीमहाराजांनी त्यांच्यावर व त्यांच्या आईवर अनुग्रह केला अणि रामसेवा करण्यास सांगितले. श्रीमहाराजांच्या आज्ञेवरून त्यांनी जालना येथे राममंदिर स्थापन केले. १९०७ साली चंद्रग्रहणादिवशी या थोर पुरुषाने देह ठेवला.

**(३) श्रीब्रह्मानंद** : श्री. अनंत रामभट्ट गाडगुळी. जन्म शके १७८० तर्क, साहित्य, व्याकरण व वेदांतशास्त्राचा गाढा अभ्यास. अभ्यास संपत आला तेव्हा हाताच्या बोटांवर कोडाचे डाग दिसू लागले आणि शास्त्रार्थ शिकणे व्यर्थ वाटू लागून एकंदर जीवनाचा अर्थ काय हा प्रश्न सतावू लागला. 'तू व्यंकटापूरला जा' असा दृष्टांत झाला म्हणून तेथें जाऊन भजन पूजन सुरू केले व देवाजवळ सद्गुरुभेटीचा ध्यास घेतला. इंदूरला श्रीमहाराजांची भेट झाली. श्रीमहाराजांनी अनुग्रह केला व 'ब्रह्मानंद' असे नांव ठेवले. श्रीमहाराजांच्या आज्ञेनुसार त्यांनी कर्नाटकात रामनामाचा प्रसार केला. व्यंकटापूर येथे त्यांनी व्यंकोबाचे भव्य मंदिर बांधले. श्रीमहाराजांनी १९१३ मध्ये देह ठेवल्यानंतर त्यांच्या पुण्यतिथी उत्सवाची जी पद्धत ब्रह्मानंदांनी घालून दिली त्यानुसार

आजही गोंदवल्यास उत्सव होतो. इ. स. १९१८ मध्ये नवबाग (कागवाड) येथें त्यांनी देह ठेवला. तेथें त्यांची समाधि व समाधी मंदिर बांधलेले आहे.

**(४) श्री. भाऊसाहेब केतकर** : जन्म इ. स. १८४७. प्रपंचात राहून श्रीमहाराजांची पूर्णकृपा संपादन करणारा शिष्योत्तम. वयाच्या पंचविसाव्या वर्षी श्रीमहाराजांची प्रथम भेट झाली. इ. स. १९०४ मध्ये इंजिनिअरिंग खात्यातून सेवानिवृत्त झाल्यावर गोंदवल्यास राहावयास गेले. श्रीमहाराजांच्या सांगण्यावरून त्यांनी आपला संसार श्रीमहाराजांवर सोपवला व नंतर विरक्त वृत्तीने प्रपंचात राहिले. श्रीमहाराजांविषयी मनामध्ये सदैव असणारा प्रेमाचा ओलावा हेच त्यांच्या परमार्थाचे साधन बनले. श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर त्यांच्या आज्ञेनुसार बारा वर्षे गोंदवल्यात राहिले. १९३९ मध्ये वयाच्या ९२ व्या वर्षी ते वारले.

**(५) पू. तात्यासाहेब केतकर** : श्री. रा. चिं. केतकर, श्री. भाऊसाहेब केतकरांचे चिरंजीव. भाऊसाहेबांप्रमाणे यांनीही आपला संसार श्रीमहाराजांच्या चरणीं अर्पण केला. त्यांचा जन्म १८८५ साली झाला. १९०४ मध्ये गोंदवल्यास ते श्रीमहाराजांना प्रथम भेटले. श्रीमहाराजांनी त्यांच्याकडून तेरा कोटी जपाचा संकल्प सोडविला. १९१७ मध्ये त्यांना मिलिटरी अकाउंटस्‌मध्ये नोकरी मिळाली. तेथून १९४८ मध्ये ते सेवानिवृत्त झाले.

इ. स. १९२५ पासून म्हणजे श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर बारा वर्षांनी श्रीमहाराज पू. तात्यासाहेबांच्या मुखाने बोलू लागले! श्रीमहाराजांचा फोटो व मराठी मुळाक्षरे लिहिलेली एक पेटी आहे. त्या पेटीसमोर बसून पू. तात्यासाहेब एक नाणे मुळाक्षरांवर ठेवत आणि त्यावर आपला उजवा हात ठेवत. नाणे फिरू लागल्यावर त्यांच्या मुखाने श्रीमहाराज बोलू लागत. ते लोकांना उपदेश करत आणि लोकांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरेही देत. श्रीमहाराजांच्या वेळी त्यांच्याजवळ असणाऱ्या असंख्य मंडळींनी याविषयी आपली खात्री करून घेतली होती. पू. बाबा १९३१ मध्ये पू. तात्यासाहेबांना म्हणजे श्रीमहाराजांना प्रथम भेटले. पू. बाबा जेव्हा श्रीमहाराजांना विचारले किंवा श्रीमहाराजांनी सांगितले असे म्हणत तेव्हा त्याचा अर्थ पू. तात्यासाहेब पेटीसमोर बसलेले असत तेव्हा त्यांना विचारले किंवा त्यांनी सांगितले असा असे. १९६७ साली पू. तात्यासाहेबांचे प्रोस्टेटचे ऑपरेशन झाले व त्यातच त्यांचा अंत झाला.

**(६) श्री. रामकृष्णपंत दामले** : हे इंजिनिअर होते. त्यांच्या वयाच्या सहाव्या वर्षी त्यांना श्रीमहाराजांनी आपण होऊन नाम दिले. श्रीमहाराजांवर

त्यांचे अत्यंत प्रेम असल्याने श्रीमहाराजांचे चरित्र ऐकतांना त्यांचे डोळे भरून येत. १९५९ साली जलोदराने त्यांचा मृत्यू झाला. जायच्या आधी बारा तास ते बेशुद्ध होते पण प्राण जाण्यापूर्वी तासभर त्यांनी तारकमंत्राचा मोठ्याने जप केला!

**(७) भीमराव गाडगुळी** : ब्रह्मानंदाचे पुतणे. हे वकील होते. बेलधडी आणि वेंकटापूर येथील मंदिरांची व्यवस्था ब्रह्मानंदांनी यांचेवर सोपविली होती.

**(८) कृष्णशास्त्री उप्पिनबेटिगिरी** : हे कर्नाटकातील अतिशय विद्वान पंडित होते. यांची व श्रीमहाराजांची भेट बेलधडीला झाली. श्रीमहाराजांनी त्यांचा सत्कार केला व त्यांना गोंदवल्यास बोलावले. शास्त्रीबुवांचा आणि पंडित मदनमोहन मालवीय यांना फार स्नेह होता. १९२२ साली यांनी देह ठेवला.

**(९) डॉ. पाथरकर** : जन्म सन १८९२. हे वाडिया हॉस्पिटलमध्ये डॉक्टर होते. त्यांची लहानपणापासून ईश्वराच्या अस्तित्वावर आणि नामस्मरणावर निष्ठा होती. श्रीमहाराजांची भेट झाल्यावर ती आणखी दृढ झाली. त्यांची वृत्ति अत्यंत समाधानी होती. गरिबांबद्दल त्यांना कणव वाटे व कित्येकदा पदरमोड करून ते गरीब पेशंटस्‌ना औषधे देत. शेवटी त्यांना कॅन्सर झाला. त्यातच श्रीमहाराजांचे नांव घेत त्यांनी देह ठेवला.

**(१०) श्री. वेर्लेकर** : श्री. वासुदेव नारायण वेर्लेकर. जन्म जानेवारी १९१४. हे मूळ गोव्याचे. शिक्षण तेथेच झाले. १९४७मध्ये मुंबईस आले. व्यवसाय - सुवर्णकाम. अतिशय प्रेमळ पण शिस्तप्रिय असे श्रीमहाराजांचे नि:सीम भक्त म्हणून हे सर्वांना परिचित होते. पू. बाबांवर त्यांची नितांत श्रद्धा होती. त्यांना भजनाची आवड होती. चारचौघांसारखाच प्रपंच, पण त्यांनी कधीही तक्रार केली नाही. अखंड नामस्मरण आणि कोणाचेही अंत:करण न दुखवणे हे व्रत त्यांनी जन्मभर सांभाळले. जानेवारी १९९७मध्ये त्यांनी देह ठेवला.

**(११) डॉ. कुर्तकोटी** : (इ. स. १८७९ - १९६७) यांचे पूर्वाश्रमाचे नांव लिंगेशगौडा मेलगिरीगौडा पाटील. धारवाड जिल्ह्यात कुर्तकोटी या गावी वतनदार घराण्यात यांचा जन्म झाला. मॅट्रिक परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनी काशी, कलकत्ता व शृंगेरी येथे राहून संस्कृत भाषा, धर्मग्रंथ आणि वेदान्ताचे अध्ययन केले. काशीच्या विद्वानांनी त्यांना 'विद्याभूषण' ही पदवी दिली. त्यांच्या गीतेवरील प्रबंधासाठी वॉशिंग्टन विद्यापीठाने त्यांना पीएच्. डी. पदवी दिली.

पू. ब्रह्मानंद महाराजांच्यामुळे ते श्रीमहाराजांकडे आले. त्यांना श्रीमहाराजांचा आठदहा वर्षे सहवास घडला. वैदिक काळी शिष्य ज्या रीतीने गुरूंची सेवा करीत, अगदी त्याच रीतीने त्यांनी श्रीमहाराजांची सेवा केली. श्रीमहाराज त्यांना 'महाभागवत' म्हणत असत.

श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर कुर्तकोटींनी संस्कृत विद्येच्या प्रसारासाठी व परधर्मात गेलेल्या हिंदूच्या शुद्धीकरणासाठी मोठे कार्य केले. १९१७ साली त्यांनी संन्यास घेतला. पुढे काही काल ते करवीर - संकेश्वर मठाचे शंकराचार्य झाले. त्यांनी अनेक चळवळी केल्या पण बाहेरील सर्व पसाऱ्यात त्यांचे अंतरंग मात्र श्रीमहाराजांच्या चरणी गुंतलेले असे.

**(१२) श्री. हुच्चूराव :** हे मूळ म्हैसूरचे पण पुढे बंगलोरला राहात असत. यांनी काही काळ रेल्वेत नोकरी केली व काही काळ व्यापारही केला. तथापि वृत्ती विरक्त असल्यामुळे त्यांनी कुंदगोळचे नारायणाप्पा कुंदगोळकर यांचा अनुग्रह घेतला. श्रीमहाराज (पू. तात्यासाहेब) बंगलोरला गेले होते तेव्हां त्यांची श्रीमहाराजांशी भेट झाली. पू. तात्यासाहेबांची त्यांनी मनापासून सेवा केली. यांचा स्वभाव करारी होता. एक शिस्तप्रिय साधक म्हणून लोक त्यांना ओळखत असत. गोंदवल्याच्या श्रीमहाराजांच्या मंदिराच्या कामासाठी व बंगलोरला श्रीमहाराजांचे मंदिर बांधण्यासाठी निधी जमवण्याचे मोठे कार्य त्यांनी केले. तथापि बंगलोरचे मंदिर बांधून झाल्यानंतर ते गोंदवल्यास येऊन राहिले. अलिकडेच बंगलोरला त्यांच्या पुतण्याच्या घरी त्यांनी देह ठेवला.

## |२४७| (३ जानेवारी १९९२)

**पू. बाबा :** साधनात परिमित आहाराचे फार महत्त्व आहे. या बाबतीत मला ब्रह्मानंद महाराज आदर्श वाटतात. कोरेगावहून निघाल्यानंतर श्रीमहाराजांचे दर्शन होईपर्यंत ते काहीही खात नसत. इतके जरी नाही तरी खाण्यावर ताबा हवा. भागवतातही या बाबतीत 'जितं सर्वं जिते रसे' असे म्हटले आहे. श्रीमहाराजही जीभ जिंकली त्याचा अर्धा परमार्थ साधला असे सांगत.

श्री. तुळपुळे यांनी श्रीतुकाराम महाराजांचे चरित्र लिहिले आहे. त्यातून एक अभंग पू. बाबांनी वाचून दाखवला. अभंग असा :

आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळीचा।
विश्वास नामाचा एका भावें॥ १॥
तरीच हरिचे दास म्हणविता साधिजे।
निर्वासना कीजे चित्त आधी॥ २॥
गाऊं नाचूं प्रेमें आनंदे कीर्तनीं।
भुक्ति मुक्ति दोन्ही न मागो तुज॥ ३॥
सगुण निर्गुण एकचि आवडी।
चित्तें दिली बुडी चिदानंदीं॥ ४॥
वृत्तीसहित मन रिघे प्रेमडोहीं।
नाठवती देहीं देहभाव॥ ५॥
तुका म्हणे देवा ऐसियांची सेवा।
द्यावी जी केशवा, जन्मोजन्मीं॥ ६॥

**पू. बाबा :** प्रथम, नामाचा एका भावाने विश्वास याला कुळधर्म म्हटले आहे. पण मला त्याहून महत्त्वाचे वाटते ते आधी चित्त निर्वासना केले पाहिजे याचे. ही Pre-condition आहे. प्रापंचिक वासना क्षीण झाल्याच पाहिजेत. त्यासाठीच सत्संगती आहे. बरे, तुम्हांआम्हांला आता प्रपंचात मागण्यासारखे काय आहे?

**साधक प :** आता अमूक एक पाहिजे अशी जोराची इच्छा नाही. तरी पण दृश्याचे प्रेम जात नाही.

**पू. बाबा :** होय, दृश्याचे प्रेम खोल आहे.

**साधक क :** आमच्या लहानसहान वासनांत आमचे चित्त वाटले गेले आहे आणि दृश्याची वासना तर जीवाला जडूनच आहे.

**पू. बाबा :** मला श्रीमहाराजांचा छत्तीस वर्षे सहवास झाला. मी त्यांना कधीही भगवंताखेरीज दुसरे बोलतांना ऐकले नाही. बोलण्याची सुरुवात काहीही झाली तरी लगेच ते भगवंताच्या गोष्टींवर येत. आपल्याला निर्वासना होण्याचा अभ्यास करायचा आहे. या अभ्यासामुळे प्रपंचात काही बिघाड होईल का?

**साधक ब :** काही परिणाम होणारच.

**पू. बाबा :** सर्व प्रपंच 'त्यांचा' आहे असे समजून केल्यास, व्यवहार होईल. श्री. भाऊसाहेबांनी तसे केले. मुले देखील गोंदवल्यास घरीच होती. त्यांचे शिक्षण अर्धवटच झालेले होते. तरी देखील भाऊसाहेबांनी काळजी केली नाही.

**साधक प :** श्रीमहाराजांना प्रपंच दिल्यावर मग प्रपंचाची कोणतीही जबाबदारी त्यांनी स्वत:कडे ठेवली नाही. प्रत्येक गोष्ट श्रीमहाराजांना विचारून केली. ते प्रपंचात असून नसल्यासारखे होते. श्रीमहाराज प्रत्येक गोष्ट हिताचीच करतात ही त्यांची खात्री होती.

यानंतर साधक प यांनी एक मुद्दा उपस्थित केला. ते म्हणाले, प्रारब्धाने देहभोग घडतात ही गोष्ट खरी आहे. प्रारब्ध म्हणजे पूर्वीच्या वासनाच होत. पण भोग भोगतांना ही वासना पूर्वीची म्हणजे प्रारब्धातून आलेली आहे की हा भोग पुढे नवीन वासना निर्माण करीत आहे म्हणजे ते क्रियमाण आहे, हे कसे समजायचे? आपल्या सगळ्या वासना आपल्याला कळत नाहीत म्हणून त्यांवर सावधानतेने लक्ष दिले पाहिजे. कृष्णमूर्तींनी म्हटले आहे की मनातल्या अगदी क्षुल्लक विचारावर देखील लक्ष दिले तरच आपल्याला वासना कळतील. वासना नाहीशा करायला श्रीरामकृष्ण लहानसहान वासना (उदाहरणार्थ, जिलबी खाण्याची) पूर्ण करीत. पण तसे करतांना त्यातले दोष मनाला दाखवत आणि त्यामुळे ती वासना नाहीशी होत असे.

**साधक क :** वासना जर हवेपणाने भोगली नाही, विवेक जागा ठेवला तर प्रारब्धाने भोग येतील पण त्यातून नव्या वासना निर्माण होणार नाहीत.

**साधक ख :** इतका विचार कोठे राहातो? आपली शक्ती कमी पडते.

**साधक ब :** याकरता श्रीमहाराजांची प्रार्थनाच उपयोगी पडेल. तुम्ही सांगितलेले मी करतो, आता पुढचे तुम्ही पहा अशी प्रार्थना करावी.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांनी आश्वासने दिली आहेत, त्यात तुम्ही नुसते नाम घ्या बाकी सर्व मी करतो असे त्यांनी म्हटले आहे. गोंदवल्याला मला अनेक स्त्री पुरुष भेटले. त्यांचे सांगणे ऐकून जीवनात किती प्रकारची दु:खे आहेत असे वाटले.

**साधक क** : तथापि सर्वांनाच वाटते की परिस्थिती बदलली की आपण सुखी होऊ. सध्या एवढे करा असे सर्वजण मागतात.

**पू. बाबा** : वाईट प्रसंगात अनुसंधान राहून, परिस्थितीत बदल करण्याची प्रार्थना न करणे कठीणच आहे.

**साधक प** : गोंदवल्यात नेहमी राहणाऱ्या काही साधकांशी बोलणे झाले. ते म्हणाले की सध्या ते सलग पाच-सहा तास जप करतात. जेवण झाल्याशिवाय किंवा झोपल्याशिवाय जप थांबत नाही. पण या जपात त्यांना आनंद वाटत नाही.

**पू. बाबा** : नामाबरोबर श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव वाढायला हवी. ती वाढली म्हणजे आनंद वाटेल. ही जाणीव वाढणे महत्त्वाचे आहे.

## |२४८| (१० जानेवारी १९९२)

**पू. बाबा** : काही प्रॉब्लेम नाही ना? (सर्वजण स्तब्ध) मला एक प्रॉब्लेम आहे, तो तुम्हांला सांगतो. त्याचे उत्तर सांगा.

ईश्वराच्या संकल्पातून जग निर्माण झाले. त्याचे पहिले रूप म्हणजे हिरण्यगर्भ. प्लेटो त्याला World Soul म्हणतो. हिरण्यगर्भातून पुढे विश्वमन निर्माण झाले. हा आदिसंकल्प म्हणजे नियति. काय, केव्हां, कोठे, कसे घडणार हे नियतीने ठरलेले आहे. त्यात बदल होत नाही. तुमचा जन्म, उत्कर्षापकर्ष, नातेवाईक, मृत्यू इत्यादी सर्व गोष्टी ठरलेल्या आहेत. त्यात तुम्ही बदल करू शकत नाही. असे जर आहे तर जीवनात माणसाच्या प्रयत्नांना काय स्थान आहे? योगवासिष्ठात म्हटले आहे की माणसाने वाईट वासनांचा त्याग करून शुभ वासनांचा आश्रय घेऊन कर्म करण्यात पौरुष प्रयत्न आहे. म्हणून मला वाटते की प्रारब्ध काहीही असले तरी संतांच्या किंवा सद्गुरूंच्या आज्ञेनुसार भगवंताचे अखंड स्मरण ठेवण्यामधे पुरुष प्रयत्न आहे. योगवासिष्ठ सांगते -

श्रीराम म्हणाले : प्राक्तनं वासनाजालं नियोजयति मां यथा।
मुने तथैव तिष्ठामि कृपणः किं करोम्यहम्॥ ३.४॥
यावर वसिष्ठ सांगतात :
अतएव हि राम त्वं श्रेयः प्राप्नोसि शाश्वतम्।
स्वप्रयत्नोपनीतेन पौरुषेणेव नाऽन्यथा॥ ३.५॥
द्विविधो वासनाव्यूहः शुभश्चैवाऽशुभश्च ते।
प्राक्तनो विद्यते राम द्वयोरेकतरोऽथवा॥ ३.६॥

शुभाशुभाभ्यां मार्गाभ्यां वहन्ती वासनासरित्।
पौरुषेण प्रयत्नेन योजनीया शुभे पथि॥ ३.९॥

**- मुमुक्षु व्यवहार प्रकरण**

(**श्रीराम म्हणाले** : पूर्वजन्मींच्या वासनाजालात मी गुंतवला जात असून त्यात गुंतून राहण्याखेरीज मी पामर काय करू शकतो ?

**यावर वसिष्ठ सांगतात** : हे रामा, म्हणूनच पुरुष प्रयत्नानेच (हे वासनाजाल तोडून) शाश्वत असे श्रेयस् प्राप्त करणे शक्य आहे. दुसऱ्या कोणत्याही मार्गाने ते साध्य होणार नाही. पूर्वजन्मींच्या वासनांची शुभ आणि अशुभ अशी संरचना असते. त्या दोहोंमधून एका प्रकाराचा स्वीकार आणि दुसऱ्या प्रकाराचा - अशुभ - त्याग केला पाहिजे. शुभ आणि अशुभ मार्गांनी वाहाणारी वासनांची ही नदी बलपूर्वक आपल्या प्रयत्नांनी - पौरुष प्रयत्नांनी - शुभ मार्गाकडे वळवली पाहिजे.)

हा प्रयत्न आपल्या हातून का होत नाही ? अगदीच होत नाही असे नाही; पण त्यात जो जोम पाहिजे, ताजेपणा पाहिजे तो नसतो. याचे कारण, मला वाटते, नामस्मरण हे देखील कर्मच होते. कर्मात तोच तोपणा असतो. कर्म म्हणजे दृश्य आले आणि नामस्मरण हे दृश्यापलीकडे नेणारे आहे. म्हणून दृश्यातून सूक्ष्मात जाण्यात पौरुष प्रयत्न आहे. योग्य तऱ्हेने हा प्रयत्न न होण्याचे कारण आपले ध्येय स्पष्ट नाही आणि त्यामुळे ध्येयसिद्धीसाठी लागणारी तळमळ नाही. ब्रदर लॉरेन्सने म्हटले आहे :

"That we ought to give ourselves entirely to God, whether in temporal or spiritual concerns, and find our happiness in doing His will, whether He lead us by the way of suffering or by the way of delight, for they are all the same to one truly resigned to Him." (Practice of the Presence of God. pp 12, 13)

म्हणजे प्रापंचिक आणि पारमार्थिक, सर्वच बाबतीत भगवंताला शरण जाऊन घडेल त्यात समाधानच वाटले पाहिजे. आपण जप करतो, पण त्यात आपले मन नसते. तुम्ही काहीही म्हणा, पण आत गेल्याखेरीज - अंतर्मुख झाल्याखेरीज परमार्थ साधणार नाही. मग त्याकरता तुम्ही काहीही करा. ह्या आत जाण्याच्या आड काय येते ?

**साधक ज :** आपण म्हणतो की मनाच्या सहाय्यानेच मनाला आवरले पाहिजे. याबाबतीत सावधानता ठेवली, मन भरकटत नाही ना हे पाहिले तर आत जाता येईल.

**पू. बाबा :** तीच तर पंचाईत आहे. आपले मन सारखे दृश्यात रमते; ते सूक्ष्म झाल्याखेरीज आत जाता येणार नाही. आपल्याला काळापलीकडे जायचे आहे. त्यासाठी निदान जप करतांना तरी काळ विसरला पाहिजे. मी देह नाही. माझे अस्तित्व देहाच्या पलीकडे आहे हे ठसले की मृत्यूची भीती राहाणार नाही.

**साधक ग :** दृश्याची ओढ विलक्षण आहे. आपले आजपर्यंतचे जीवन मी कर्ता या भावाने व्यापलेले आहे. सर्व काही नियतीनुसार घडते हा भाव एकदम येणे अवघड आहे; कारण मी पूर्ण कर्ता नसेन, पण मी केल्याशिवाय होत नाही असाही आपला अनुभव आहे.

**साधक ड :** आपले कर्तेपण आणि आपले कर्म सगळेच विचित्र आहे. आज पहाटे जपाला बसलो होतो तेव्हा एक स्नेही वारल्याचा फोन आला. फोन करणाराने सकाळी साडेसात वाजता स्मशानात या म्हणून सांगितले. म्हणजे पहाटे त्याबाबत काहीच करायचे नव्हते. तरी देखील जपाकडे लक्ष लागेना. मन उगीचच गोते खात राहिले, त्याचे वाईट वाटले पण जप झाला नाही.

**साधक ब :** काही वेळा जप जमतो आणि काही वेळा तो जमत नाही ही गोष्टच आपले कर्तेपण किती लटके आहे ते दाखवायला पुरेशी आहे. ज्यावेळी जप जमत नाही त्यावेळी तो का जमत नाही, त्याच्या आड काय येते आहे याचा शोध घेऊ लागलो तर आपले वागणे कसे चुकते आणि ते कसे सुधारायला पाहिजे ते समजून येईल. मला वाटते, हा खरा पुरुष प्रयत्न आहे.

**पू. बाबा :** बरोबर आहे. उदाहरणार्थ, रात्री जास्त खाल्ले तर पहाटे जप नीट होत नाही हे लक्षात आले तर माणूस रात्री कमी खाईल.

**साधक ग :** आपण म्हणालात की साधकाला आत जावेच लागेल. मनाचा शोध घेऊ लागणे हीच, मला वाटते आत जाण्याची सुरुवात आहे.

**साधक क :** स्वत:शी विचार करून साधक आपल्या चुका सुधारू लागला की त्याच्या जीवनाचा घाटच बदलेल.

**साधक ब :** मी करून होत नाही हे दिसून आले की प्रार्थनेचा उदय होईल आणि शरणागती येईल.

**पू. बाबा :** आपल्याला शरण जाणे माहीत आहे का?

**साधक प** : जीवनात जेथे आपण काही करू शकत नाही हे लक्षात येते तेथे आपण गप्प बसतो. म्हणजे परिस्थितीला शरणच जातो. उदाहरणार्थ, लोकल गाडीतून जातांना ती मधेच थांबली तर का थांबली कोणास ठाऊक म्हणून गप्प बसतो.

**साधक ग** : हे काही खरे नाही. शरणागती ही मनाची अवस्था आहे. एकदा शरण गेल्यावर मन स्वस्थ झाले पाहिजे.

**पू. बाबा** : आपल्या रोजच्या जीवनात निदान साठ टक्के गोष्टी तरी इनव्हॉलंटरी (अनैच्छिक) असतात; उरलेल्या व्हॉलंटरी (ऐच्छिक) असतात. निदान अनैच्छिक गोष्टी तरी त्याच्यावर सोपवून देणे जमेल का? उदाहरणार्थ, त्याच विषयावरची तीच लेक्चर्स. त्यात मनाचा मोठा भाग नसतो. अशा वेळी लेक्चर देतानाही भगवंताचे स्मरण राहायला काय हरकत आहे?

**साधक प** : त्याच त्या गोष्टी म्हटले तरी देखील त्या करतांना माणसाला त्यात रस वाटत असला पाहिजे. तेच लेक्चर देतांनाही नवा अभिनिवेश असतो.

**साधक ग** : तथापि रूटीनमुळे जीवनात सोपेपणा येतो.

**पू. बाबा** : त्या रूटीनमधून स्वत:ला बाहेर काढता आले पाहिजे. आपला रोजचा जप म्हणजेही रूटीन होते आणि तो झाला नाही तर रूटीन चुकले म्हणून वाईट वाटते. त्या वाईट वाटण्याचा जपापर्यंत संबंध जात नाही. त्यामुळे जप कंटाळवाण होतो. असे का होते? वास्तविक, आत्तापर्यंत जे झाले ते पुरे झाले, आता मला तो हवा असे वाटले पाहिजे. नामस्मरणाचा तो अर्थ आहे.

**साधक ग** : नाम होते पण त्याचे स्मरण होत नाही. तो हवा म्हणजे काय तेही स्पष्ट होत नाही.

**साधक प** : ते शेवटी स्पष्ट होणार आहे. परमार्थ हवा अशी जळजळीत भावना पाहिजे असे मला वाटते. नाम तीन्ही अवस्थांच्या पलीकडे आहे. ते वेगळे dimension (आयाम) आहे. नामाच्या संख्येपेक्षा, मला वाटते, त्याच्या गुणवत्तेकडे quality कडे जास्त लक्ष द्यायला पाहिजे. किती झाले यापेक्षा कसे झाले याला जास्त महत्त्व आहे.

**पू. बाबा** : ते तर आहेच; पण किमान काही व्हावे म्हणून संख्येचा आग्रह. मागे मी तुम्हांला विवेकचूडामणीतला एक श्लोक सांगितला होता. पुन्हा सांगतो :

बाह्ये निरुद्धे मनस: प्रसन्नता।
मन: प्रसादे परमात्मदर्शनम्।

तस्मिन्सुदृष्टे भवबन्धनाशो।
बहिर्निरोध: पदवी विमुक्ते:॥ ३३५॥

बाह्य म्हणजे दृश्य जगताचा मनाने निरास केला की मन प्रसन्न होते आणि (परमात्मा आनंदरूप असल्यामुळे) मनात आनंदाचा उद्रेक झाला की परमात्म्याचा साक्षात्कार होतो. असा साक्षात्कार झाला की संसार बंधनांचा नाश होतो म्हणून दृश्य जगताचा निरास करणे हाच मुक्तीचा मार्ग होय. किती सुसंगत सांगितले आहे! संसारातून खरी निवृत्ती होऊन आता तोच हवा अशी तळमळ लागल्याशिवाय प्रगती होणार नाही. (पहा: अध्यात्म संवाद भाग २ संवाद २२०)

**साधक प** : मला वाटते की मी करेन म्हणून होणारी ही गोष्ट नाही. योगवासिष्ठात सांगितलेला पौरुष प्रयत्न आणि ब्रदर लॉरेन्सची शरणागती हे दोन वेगळे प्रकार वाटतात. प्रयत्न करून थोडे साधले तर मी केले, मी मिळवले असा अहंकार होण्याच धोका आहे.

**साधक ग** : मी केले तरी नेहमीच होऊ शकत नाही हे लक्षात आले की माझ्या करण्याच्या मर्यादा लक्षात येऊन शरणागती येईल.

**पू. बाबा** : आज तरी प्रयत्न करण्यावाचून गत्यंतर नाही. नामाला बसला की आत गेला असे हुकमी झाले पाहिजे. तेथपर्यंत तरी जावे. पुढचा विचार करायची आज आवश्यकता नाही.

## **| २४९ |** (१७ जानेवारी १९९२)

पू. बाबांनी कृष्णमूर्तींच्या Commentaries on Living या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. कृष्णमूर्ती म्हणतात की आपण जगतो पण जीवन जगणे ही एक कला आहे आणि ती कशी साध्य करता येईल याचा क्वचितच कोणी विचार करतो. भूतकाळातील घटनांचे ओझे आणि भविष्यासंबंधीच्या कल्पना, काळज्या यांनीच आपले जीवन व्यापलेले असते. त्यामुळे वर्तमानकाळ केव्हां आणि कसा निसटून गेला याचा पत्ताच लागत नाही. म्हणून भूतकाळ विसरून आणि भविष्यकाळाचा विचार न करता, वर्तमानकाळात जगायला शिकणे ही जीवन खऱ्या अर्थाने जगण्याची कला आहे. ही कला साध्य होण्यासाठी पूर्वग्रह गेले पाहिजेत आणि मन निर्विचार करता आले पाहिजे.

कृष्णमूर्तींचा उतारा वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले की श्रीमहाराज असेच म्हणत. भूतकाळ विसरावा, भविष्याची चिंता करू नये, आज (म्हणजे वर्तमानात) नाम घ्यावे.

**साधक ग** : स्वामी रामदासांनीही असेच सांगितले आहे. एका भक्ताने कर्मासंबंधी प्रश्न विचारला होता तेव्हां ते म्हणाले : **Karma can take care of itself. Let us forget the past and the future. Let us live in the present in the remembrance of God. Otherwise it is all speculation. There is no past or future in Eternity. We must transcend time and space and never bother about them. They produce only diversion of mind. The central aim of life is the realisation of the Self.**

**पू. बाबा** : एकंदरीत कृष्णमूर्तींनी नवीन असे काही सांगितलेले नाही. एल्फिन्स्टन कॉलेजात धोपेश्वरकर नांवाचे एक फिलॉसफीचे प्रोफेसर होते. कृष्णमूर्तींच्या विचारांनी, विशेषत: त्या विचारांत वाटणाऱ्या नवेपणामुळे ते फार प्रभावित झालेले होते. पुढे ते पुण्यात स्थायिक झाले तेव्हा एकदा आग्रह करून ते श्री. अनंतराव आठवले यांना कृष्णमूर्तींच्या व्याख्यानाला घेऊन गेले. (श्री. अनंतराव आठवले हे दासगणूंचे शिष्य. पुण्याच्या ताराचंद रामनाथमधे आयुर्वेदाचे प्राध्यापक व नंतर डीन होते. त्यांनी संन्यास घेतलेला असून वरदानंद नांवाने ते ओळखले जातात. उत्तरकाशी येथे राहातात.) व्याख्यानाहून परत आल्यावर श्री. आठवल्यांनी प्रा. धोपेश्वरकरांना कृष्णमूर्तींनी व्याख्यानात सांगितलेले विचार असलेले विवेकचूडामणीतले काही श्लोक काढून दाखवले आणि म्हणाले की पूर्वीच्या ऋषीमुनींनी आणि आचार्यांनी अध्यात्माच्या बाबतीत अतिशय सूक्ष्म व खोल विचार केलेला होता. त्यामुळे कृष्णमूर्तींच्या मांडणीमधे बदल असला तरी नवे विचार असे नाहीत. पण ते असो. आपल्याला केवळ वर्तमानात जगणे शक्य आहे का? असे जगण्यात आपल्या आड काय येते?

उत्तरादाखल पू. बाबांनीच एक जुनी हकिगत सांगितली. एकदा येथे मालाडलाच श्री. गणपतराव दामले, श्री. आण्णासाहेब घाणेकर आणि मी श्रीमहाराजांसमोर बसलो होतो. श्रीमहाराजांनी मला विचारले की तुमची स्मरणशक्ती फार चांगली आहे ना? मी थोड्याशा अभिमानानेच हो म्हणालो. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की तीच परमार्थाच्या आड येते! नंतर त्यांनी श्री आण्णासाहेबांना विचारले की तुम्हांला जुने काही आठवते का? ते म्हणाले की नोकरीतले काही विशेष आठवत नाही पण गोंदवल्याचे आठवते. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले हे त्यातल्या त्यात बरे. पू. बाबा पुढे म्हणाले की जीवनातील विरोध

नाहीसा केल्याशिवाय काळापलीकडे जाता येणार नाही. हे कसे करता येईल? जीवनात हार्मनी - सुसंवाद पाहिजे. जुन्या स्मृती राहिल्या तरी जुन्या जखमांचे व्रण राहातात तशा त्या राहातील. त्यांपासून काही सुख-दु:ख होणार नाही.

**साधक ज** : विचाराने घटनांचे मूल्य ठरविता येते. होऊन गेलेल्या घटनांच्या बाबतीत काही करायचे राहिलेले नसते आणि पुढे होणाऱ्या घटनाही माहीत नसल्यामुळे त्याबाबत काही करायचे नसते. हे मनात ठसले तर वर्तमानात जगता येईल आणि जीवनामधे सुसंवाद साधेल.

**साधक प** : विचार वरवरचे असतात. ते येतात आणि जातात. एकच विचार सर्वकाळ टिकला असे होत नाही. विचारांपेक्षा मनातच बदल झाला पाहिजे; कारण विचारांच्या चंचलतेपेक्षाही मनाची चंचलता जास्त खोल आणि त्रास देणारी असते. विचार कोण करतो याकडे लक्ष दिले तर मनाची चंचलता कमी होईलसे वाटते.

**साधक ग ('प'ना)** : परवा गोंदवल्याला कोणीतरी प्रश्न विचारला होता की सूक्ष्म देह चंचल असतो तो नामाने स्थिर कसा होतो. तेव्हां तुम्ही म्हणालात की जे चंचल आहे ते चंचलच राहाणार. पण त्यामधे असलेला विसंवाद (disharmony) नाहीसा होऊन सुसंवाद (harmony) निर्माण होतो आणि नामच हा सुसंवाद निर्माण करू शकेल.

**साधक प** : होय, हे बरोबरच आहे. तत्त्व म्हणून हे मान्य करावेच लागेल कारण Name is Reality. प्रश्न आहे की असे असूनही आणि नाम घ्यावे अशी इच्छा असूनही नाम का होत नाही?

**पू. बाबा** : नाम निरुपाधिक आहे. आपण त्याला उपाधी लावतो त्यामुळे ते एक कर्म बनते. एकसारखे नामस्मरणच झाले पाहिजे असे नाही. त्याचे स्मरण किंवा अस्तित्वाचे भान राहिले पाहिजे. परवा एक बाई सांगत होत्या की ऑफिसातून संध्याकाळी घरी परत येतांना वाटेत लोकलगाडी थांबली की घरी असलेल्या मुलाची तीव्रतेने आठवण होते. तो आत्ता काय करत असेल असे वाटू लागते. साधनात एवढी तरी तीव्रता नको का?

**साधक प** : वरवर कारण असे काही दिसले नाही तरी ती तीव्रता, ती ओढ नामात येत नाही. वास्तविक नामाच्या खरेपणाबद्दल आता तसा संशय नाही तरीही ते घडत नाही ही अडचण आहे.

**साधक ड** : तीव्रतेचा किंवा क्वालिटीचा (गुणवत्तेचा) मुद्दा निघाला म्हणून विचारतो. मागे आपण, क्वालिटीकडे लक्ष न देता आज शक्य तितकी जास्त

क्वांटिटी (संख्या) होऊ दे असे म्हटले होते. म्हणून प्रश्न पडतो की लक्ष कशाकडे द्यायचे?

**पू. बाबा :** दोन्ही महत्त्वाची आहेत. Eastern Monk ने दिलेले पक्ष्याचे उदाहरण मागे मी सांगितले होते. (अध्यात्म संवाद भाग पहिला संवाद क्रमांक २४) अगदी वैखरीने नामस्मरण करावे आणि वर जावे. कसेही करून नामाच्या गुणवत्तेची पातळी वर न्यावी.

**साधक क :** ते घडत नाही कारण जीवाची शक्ती अपुरी पडते. नामानेच ती शक्ती जशी वाढेल तशी पातळी वर जाईल. त्यासाठी जीवाची सर्व बाजूंनी वाढ झाली पाहिजे.

**पू. बाबा :** हे तुम्ही म्हणता ते पटले. जीवाची शक्ती अपुरी पडते. ती वाढल्याशिवाय नामाखेरीज दुसरे काहीही महत्त्वाचे नाही असे वाटणार नाही. हे करायला दोहोंपैकी कोणता तरी एक मार्ग स्वीकारावा लागेल. एक म्हणजे, आज मी नामस्मरण करतो आहे. त्याने काय साधणार आहे मला माहीत नाही; पण माझे गुरु माझ्या हिताचेच घडवून आणणार आहेत याबद्दल मला संशय नाही. दुसरा मार्ग म्हणजे सर्व काही 'तो' करतो आहे हा भाव वाढवणे.

**साधक प :** सर्व काही 'तो' करतो आहे; मी कर्ता नाही हे खऱ्या अर्थाने पटले तर आज नामस्मरण झाले नाही तरी त्यामागेही तोच आहे हे लक्षात येऊन निदान आत चाललेली मारामारी तरी थांबेल.

**साधक ब :** हे घडण्यासाठी प्रथम आग्रह सुटला पाहिजे. आग्रह ठेवायचा तर केवळ नामस्मरणाचा ठेवला पाहिजे. मीही चुकू शकतो हे एकदा मान्य केले की पुष्कळसे वाद आणि विरोध (Conflicts) कमी होतील. त्याचबरोबर जिथे विरोध होण्याची शक्यता आहे तेथून शक्य असेल तर पळ काढला पाहिजे. जीवनात पलायनवाद आवश्यकच आहे.

**साधक ग :** साधक 'ब' म्हणतात ते खरे आहे. काही बाबतीत पळूनच जावे लागेल. तथापि आज आपण जेथे आहोत तेथे नामाचा आग्रह ठेवावाच लागेल. कल्याण मासिकात स्वामी श्रीरामसुखदासांचा अहंकारासंबंधी एक लेख होता. त्यात त्यांनी म्हटले आहे की अहंकारातही तादात्म्य असते. लौकिक अहंकार आणि पारमार्थिक अहंकार (उदाहरणार्थ, मी साधक आहे.) असे अहंकाराचे दोन प्रकार मानता येतील. यांपैकी लौकिक अहंकार सोडलाच पाहिजे. पारमार्थिक अहंकार साधन करीत असतांना क्षीण होत जाईल. त्याचे चिंतन करू नये आणि साधन सोडू नये.

**पू. बाबा** : आता झाले एवढे पुरे असे वाटले पाहिजे. व्यवहारात काही गोष्टी कराव्याच लागतील पण आतून वैराग्य आल्याशिवाय परमार्थ नाही. नाम घेतांना आपली वृत्ती प्रसन्न पाहिजे. तथापि त्याकरता अडून बसू नये. श्रीमहाराजांचे स्मरण करावे. पाहिजे तर त्यांच्या जीवनातला एखादा प्रसंग आठवावा. त्यांच्या चरित्रातील एखादी आवडती लीला वाचावी आणि नामस्मरण सुरू करावे. त्याचा खूप फायदा होईल. दिवसातला जास्तीत जास्त वेळ नामस्मरणाला देता आला पाहिजे.

**|२५०|** (२४ जानेवारी १९९२)

**पू. बाबा** : आज मी आनंदात आहे. मी जे. कृष्णमूर्तींचे जवळ जवळ सगळे वाङ्मय वाचले आहे. मला नेहमी वाटत आले आहे की हे अद्वैत सांगतात. ह्या पुस्तिकेत अद्वैत असा शब्द नसला तरी त्यांच्या या उताऱ्यात तसे स्पष्ट आढळते. **Excerpts from J. Krishnamurti's Talks and writings - compiled for distribution at the Annual Gathering 1990 of the Krishnamurti Foundation, India, 64 Greenways Road, Madras 28** ही पुस्तिका मला पूर्वी कृष्णमूर्ती फाउंडेशनचे काम करणाऱ्या एका गृहस्थांनी पाठविली. श्री. दीक्षित नांवाचे एक गृहस्थ कृष्णमूर्तींच्या व्याख्यानांना जात असत आणि नंतर ते श्रीमहाराजांना (पेटीवर) सांगत. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले होते की ते वेगळे असे काही सांगत नाहीत. ले. कर्नल बेलसरे, श्री. भाऊराव आठवले ही कृष्णमूर्तींच्या अंतरंगातली माणसे होती. ले. कर्नल बेलसरे त्यांच्यासंबंधी श्रीमहाराजांना म्हणाले की कृष्णमूर्तींचे बाकी सगळे ठीक आहे पण गुरु नको वगैरे ते जे म्हणतात ते पटत नाही. ते म्हणतात की तुम्हीच तुमचे गुरु व्हा. तेव्हां श्रीमहाराजांनी विचारले, तुम्ही नाथभागवत वाचले आहे का? त्यात श्रीदत्तात्रेयांनी जे चोवीस गुरु केले त्यातला शेवटचा गुरु आपले आपणच असे सांगितले आहे. तेव्हां कृष्णमूर्ती नवीन काही सांगत नाहीत. ज्या लोकांना सांगायचे त्यांना समजेल अशा भाषेत सांगतात इतकेच. आता या पुस्तिकेतील काही उतारे आधी वाचून दाखवतो आणि मग श्रीमहाराजांची काही वचने वाचतो.

कृष्णमूर्ती सांगतात : **"Surely, freedom from the self.... is the true function of man."**

"Though you may feel that your ego is something great, all-inclusive, you will find it is an illusion; it is an emptiness, a bubble that is soon pricked." - (Star Bulletin 1932.)

(खरोखर, स्व पासून मुक्त होणे हे माणसाचे खरे कार्य आहे.

तुम्हांला जरी असे वाटले की आपला मीपणा फार व्यापक, सर्वसमावेशक आहे, तरी तुम्हांलाच दिसून येईल की तो भ्रम आहे; तो निरर्थक आणि सहज फुटणारा बुडबुडा आहे. - स्टार बुलेटिन १९३२.)

The art of living is to bring this "I" process to an end.

(- Newyork city 1936.)

("मी"च्या या प्रक्रियेचा अंत करणे हीच जीवनाची कला आहे.)

"Most human beings are selfish. They are not conscious of their own selfishness; it is the way of their life. And if one is aware that one is selfish, one hides it very carefully and confirms to the pattern of society which is essentially selfish. The selfish mind is very cunning. Either it is brutally and openly selfish or it takes many forms. If you are a politician the selfishness seeks power, status and popularity; it identifies itself with an idea, a mission and all for the public good. If you are a tyran it expresses itself in brutal domination. If you are inclined to be religious it takes the form of adoration, devotion, adherence to some belief, some dogma. It also expresses itself in the family; the father pursues his own selfishness in all the ways of life and so does the mother. (page 3)

(बहुतेक माणसे स्वार्थी असतात, त्यांना त्यांच्या स्वार्थीपणाची जाणीव नसते कारण ती त्यांची जीवनपद्धती असते. आणि एखाद्याला जर आपण स्वार्थी आहोत याची जाणीव असली तर तो ती जाणीव काळजीपूर्वक लपवतो आणि मुख्यत: स्वार्थी असलेल्या समाजाच्या चौकटीतच वावरतो. स्वार्थी मन मोठे लबाड असते. एक तर ते उघड उघड पाशवी स्वार्थपूर्ण असते नाहीतर ते अन्य विविध प्रकारांनी व्यक्त होते. तुम्ही राजकारणी असाल तर तो स्वार्थीपणा सत्ता, पद आणि लोकप्रियतेच्या मागे लागतो. कोणते तरी तत्त्व, जीवनध्येय

यांद्वारा व्यक्त होऊन ते सगळे जनतेच्या हितासाठी आहे असे त्याला वाटते. तुम्ही हुकूमशहा असाल तर तुमचा स्वार्थ पाशवी सत्तेतून व्यक्त होतो. तुमचा धार्मिकतेकडे कल असला तर तो स्वार्थ स्तुती, प्रेम, भक्ती, एखादी श्रद्धा किंवा तत्त्व यांना चिकटलेला असतो. कुटुंबसंस्थेतही तो दिसून येतो. पिता त्याच्या जीवनात सर्व प्रकारे स्वार्थामागे धावतो. मातेचीही तीच स्थिती असते. पृष्ठ ३)

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणत की प्रपंचात सगळेच स्वार्थी असल्याने सुखाची ओढाताण होते. सगळे सुख एकाच्याच वाट्याला येत नाही.

**साधक ग :** प्रवचनातही म्हटले आहे की पाचजणांचा मिळून प्रपंच होतो. त्यात प्रत्येकजण स्वार्थी असतो. मग सगळे सुख एकाच्या वाट्याला कसे येईल.

**पू. बाबा :** पुढे ऐका.

"Fame, prosperity, good looks form a basis for this hidden creeping movement of the self. It is in this hierarchical structure of the priesthood, however much they may proclaim their love of God, their adherence to the self-created image of their deity. The captains of industry and the poor clerk have this expanding and benumbing sensuality of the self. The monk who has renounced the ways of the world may wander the face of the world or may be locked away in some monastery but has not left this unending movement of the self. They may change their names, put on robes or take vows of celibacy or silence, but they burn with some ideal, with some image, some symbol."

"It is the same with the scientists, with the philosophers and the professors in the university. The doer of good works, the saints and gurus, the man or the woman who works endlessly for the poor - they all attempt to lose themselves in their work but the work is part of it. They have transferred the egotism to their labours. It begins in childhood and continues to old age. The conceit of knowledge, the practiced humility of the leader, the submitting wife and dominating man, all have all this disease. The self identifies with the state, with endless

groups, with endless ideas and causes but it remains what it was at the beginning."

"Human beings have tried various practices, methods, meditations to be free of this centre which causes so much misery and confusion, but like a shadow it is never captured. It is always there and it slips through your fingers, through your mind. Sometimes it is strengthened or becomes weak according to circumstances. You corner it here, it turn up there." Letters to the schools Page 3, 4.

(कीर्ती, ऐश्वर्य, सौंदर्य ह्या गोष्टी चोरपावलांनी पुढे सरकणाऱ्या स्वार्थाच्या मुळाशी असतात. परमेश्वरावरील त्यांच्या प्रेमासंबंधी ते कितीही कंठरवाने सांगोत, पण आचार्यांच्या आणि धर्मसत्तेच्या मागे आणि त्यांनी निर्माण केलेल्या मूर्तींच्या आणि प्रतिमांच्या मुळाशी स्वार्थच असतो. मोठे उद्योगपती आणि सामान्य कारकून, दोघांच्याही ठायी विस्तारणारा आणि बधीर करणारा स्वार्थ असतो. संन्यास घेऊन भटकणारा साधू जगाच्या पाठीवर भटकतांना किंवा एखाद्या मठात त्याने स्वतःला कोंडून घेतलेले असतांना, मीपणाच्या अविरत चालीपासून सुटलेला नसतो. ते आपले नांव बदलतील, कफनी धारण करतील, ब्रह्मचर्याच्या वा मौनाच्या शपथा घेतील; तथापि एखादे ध्येय, प्रतिमा, किंवा संकेत यांनी ते पेटलेले असतात.

शास्त्रज्ञ, तत्त्वज्ञ, विद्यापीठातील प्राध्यापक यांचीही तीच स्थिती असते. सत्कार्य करणारे, साधू, गुरु, गरीबांसाठी अविरतपणे झटणारे पुरुष आणि स्त्रिया या सर्वांचा आपल्या कार्यात स्वतःला विसरण्याचा प्रयत्न असतो. पण ते कार्य हा त्यांच्या स्व चा केवळ एक भाग असतो. आपला अहंकार त्यांनी आपल्या कार्यात परिवर्तित केलेला असतो. हा अहंकार किंवा अहंमन्यता बालपणी सुरू होते आणि म्हातारपणापर्यंत टिकून राहाते. ज्ञानाचा अहंभाव, पुढाऱ्यांनी प्रयत्नपूर्वक धारण केलेली नम्रता, आज्ञाधारक पत्नी आणि हुकूमशहा पती, सर्वांना हा रोग आहे. स्व किंवा मी ची ओळख देशाच्या संदर्भात, अनेक व्यक्तिसमूहांच्या संदर्भात, अनेक कल्पनात आणि ध्येयात होते, तथापि त्याचे स्वरूप सुरुवातीला होते तसेच राहाते.

दुःख आणि गोंधळ यांचे कारण असणाऱ्या या केन्द्रापासून मुक्त होण्यासाठी माणसांनी अनेक प्रकारच्या आचारांचा, पद्धतींचा, ध्यानप्रकारांचा प्रयत्न

केलेला असला तरी सावलीसारखेच ते कधीही पकडता आलेले नाही. ते येथे आहे असे वाटते तोंच तुमच्या बोटातून निसटते. परिस्थितीनुसार मीपणा काही वेळा बळकट होतो तर काही वेळा दुर्बळ होतो. तुम्ही त्याला अडचणीत आणता आणि तो तेथून दुसरीकडेच निघतो.)

(- Letters to the schools pages 3, 4)

**पू. बाबा** : श्रीमहाराज एकदा म्हणाले, एक लहान मुलगा आपली सावली पकडायला पहात होता आणि ती सापडत नव्हती. शेवटी बापाने सांगितले, अरे, स्वत:च्या डोक्यावर हात ठेव म्हणजे ती सापडेल. गुरूही असेच करतो. उद्दालकाला 'तत्त्वमसि' म्हणून सांगितले आणि त्याचे काम झाले! तो तें (ब्रह्म) झाला. परमात्मा आतच आहे. बाहेर शोधून कोठे सापडणार?

**साधक ब** : निसर्गदत्त महाराजांचे नाही का? त्यांच्या गुरूंनी त्यांना सांगितलेले त्यांना पटले आणि त्यावर चिंतन करून त्यांना तीन वर्षात ज्ञान झाले.

**पू. बाबा** : अशा माणसांची आधीची तयारी मोठी असते.

कृष्णमूर्ती पुढे काय सांगतात ते ऐका.

"For us life is a process of the continuous expansion of the ego through power, wealth, asceticism or the cultivation of virtue and so on. Not only for the individual but for the group, for the nation this process signifies fulfilling, becoming, growing and has ever led to great disasters and miseries. We are ever striving within the framework of the self, however much it may be enlarged and glorified. We must be very clear and definite as to what we are seeking... Are we craving self-expansion bring about understanding, enlightenment; or is there illumination, liberation only when the process of self-expansion has ceased ?

If you are aware you will realise that your mind is constantly engaged in the activities of the ego and its identification; if you pursue this activity further you will find the deep-seated self-interest. These thoughts of the self-interest arise from the needs of daily life, things you do from

moment to moment, your role in society and so on, all of which build up the structure of the ego...." (Ojai 1946 p. 5)

(सत्ता, संपत्ती, वैराग्य, तपश्चर्या, सद्गुणांची जोपासना इत्यादी माध्यमांतून, जीवन ही अहंकाराच्या वाढीची सतत घडणारी प्रक्रिया आहे. केवळ व्यक्तीच्याच बाबतीत नव्हे तर मानवसमूहांच्या आणि राष्ट्रांच्या बाबतीत ही प्रक्रिया म्हणजे काहीतरी होण्याची, साध्य करण्याची, वाढण्याची खटपट असते आणि त्यामधून मोठी संकटे आणि दुःखच निर्माण होते. ह्या अहंचा आपण कितीही विस्तार केला आणि त्याची प्रशंसा केली तरी आपली सगळी धडपड त्याच्या चौकटीतच असते. आपल्याला काय पाहिजे याची आपल्याला स्पष्ट कल्पना हवी. आपल्याला स्व च्या विस्ताराची उत्कट इच्छा आहे की आपण 'मी' आणि 'माझे' यांद्वारा अहंकाराचे सतत पोषण करीत आहोत की आपण जागरूकतेने स्व च्या प्रक्रियेपलीकडे जाण्याचा प्रयत्न करीत आहोत? स्व च्या विस्तारातून, जाणीव आणि आत्मज्ञान होईल का? की हा विस्तार थांबल्यानंतरच ते प्रकाशित होऊन मुक्ती होईल?

तुम्ही जागरूकतेने पाहिलेत तर तुमच्या लक्षात येईल की तुमचे मन सतत अहंच्या व्यापारात आणि त्याची ओळख करून घेण्यात गुंतलेले असते. हे पाहणे तसेच चालू ठेवलेत तर तुमच्या आत दडलेला स्वार्थ तुम्हांला दिसेल. दैनंदिन जीवनाच्या गरजांतून, प्रतिक्षणी तुम्ही करत असलेल्या क्रियांतून, समाजातील तुमच्या स्थानातून हे स्वार्थी विचार येतात आणि त्यातून अहंकाराची जडण घडण होते. (Ojai 1946 p. 5)

"**Krishnamurti** : The cultivation of the "me" and the "mine" is specialization; the "me" that is special, all important; my work, my action, my success, my virtue, my country, my saviour; this positive and negative striving to become implies specialization. Specialization is death, the lack of infinite pliability." (Ojai 1946 p. 5)

(**कृष्णमूर्ती** : "मी" आणि "माझे" यांच्या जोपासनेतून संकुचितपणा येतो. "मी" हा विशेष आणि सर्वात महत्त्वाचा असतो. माझे कार्य, माझी कृती, माझे यश, माझे सद्गुण, माझा देश, माझा रक्षणकर्ता, काहीतरी होण्यासाठी घडणारी ही सकारात्मक आणि नकारात्मक धडपड हाच संकुचितपणा. अमर्याद लवचिकपणाचा अभाव. संकुचितपणा हाच मृत्यू. (Ojai 1946 page 5)

पू. बाबा : specialization हा संकुचितपणा या अर्थाने येथे वापरला आहे. शास्त्रज्ञ, पंडित आपआपल्या विषयात खोल जातात पण इतर बाबतीत ती फार लहान, अतिसामान्य माणसे असतात. इतर गोष्टींचे कित्येकदा त्यांना भानच नसते. मी आणि माझे या कोषात आपण स्वत:ला कोंडून घेतो. पुढे ऐका.

"**Krishnamurti :** Be aware, without choice, of this process of specialization and you will discover that a deep revolutionary change is taking place within you. Do not say to yourself, that you are going to be aware, or that awareness has to be cultivated, or that it is a matter of growth or craftmanship, which is an indication of postponement, laziness. You are or you are not aware. Be aware now of this specializing process.

**Questioner :** All this implies extensive self-study and self-knowledge, does it not ?

**Krishnamurti :** And that is the very thing we are attempting here; we are exposing to ourselves the ways of our thought-feeling, its cunning, its subtlety, its pride and its so-called intelligence and so on..." (Ojai 1946 page 5)

"You and I have to be free from the causes that are producing conflict in ourselves. And the centre of conflict is the self, the "me". But most of us do not want to be free from that "me". That is the difficulty. Most of us like the pleasures and the pains that the "me" brings; and as long as we are controlled by the pleasures and the pains of the "me", there will be conflict...

Surely, the freedom from the self, and therefore the search of Reality, the discovery and the coming into being of Reality, is the true function of man." (Ojai 1949 page 6)

**कृष्णमूर्ती :** पूर्वग्रहरहित होऊन या संकुचितपणाची प्रक्रिया लक्षात घ्या, आणि मग तुमच्या लक्षात येईल की तुमच्यामध्ये क्रांतिकारी बदल होत आहे. ही जाणीव अद्यापि व्हावयाची आहे, किंवा त्या जाणिवेची जोपासना करावयाची आहे, किंवा या जाणिवेची वाढ करणे हे कौशल्याचे कार्य आहे

असे स्वत:ला सांगू नका कारण असे करणे म्हणजे हे सर्व पुढे ढकलण्याचे, आळसाचे लक्षण आहे. तुम्हांला एकतर जाणीव असेल किंवा नसेल. या संकुचितपणाच्या प्रक्रियेची आत्ताच जाणीव असू द्या.

**प्रश्नकर्ता** : हे सर्व करावयाला चांगले आत्मपरीक्षण आणि स्वत:बद्दल ज्ञान हवे असा याचा अर्थ नाही का ?

**कृष्णमूर्ती** : आपला तोच प्रयत्न चालला आहे. आपण आपली विचारपद्धती, भावना, चातुर्य, मार्मिकता, अभिमान, तथाकथित हुशारी इत्यादी गोष्टी उजेडात आणत आहोत. (Ojai 1946 page 5)

आपल्यामध्ये अंतर्विरोध निर्माण करणाऱ्या कारणांपासून तुम्हांला आणि मला मुक्त व्हावयाचे आहे. "स्व" किंवा "मी" हा या अंतर्विरोधाच्या केन्द्रस्थानी आहे. पण आपणांपैकी बहुतेकांना या "मी" पासून मुक्त व्हावयाचे नसते ही खरी अडचण आहे. "मी" किंवा "स्व" मधून येणारी सुखदु:खे आपल्याला हवी असतात आणि जोपर्यंत "मी" मधून येणाऱ्या सुखदु:खांचा आपल्यावर पगडा आहे तोपर्यंत हा विरोध राहणारच. खरोखर या स्व पासून मुक्ती, त्यासाठी सद्वस्तूचा शोध आणि सद्वस्तू होणे हेच माणसाचे खरे कर्तव्य आहे." (Ojai 1946 page 6)

पुढे म्हणतात :

"It is a journey which must be taken completely alone, without companions, with neither wife, nor husband, nor books. You can set out on this journey only when you really see the truth that you have to walk completely alone - and then you ARE alone; not out of bitterness, not out of cynicism, not out of dispair, but because you see the fact that aloneness is absolutely necessary. It is this fact, and the perceiving of this fact, that sets one free to walk alone. The book, the saviour, the teacher - they are yourself. So you have to investigate yourself, you have to learn about yourself - which does not mean accumulating knowledge about yourself and with that knowledge looking at the movements of your own thought."

"To learn about yourself, to know yourself. You must observe with a freshness, with a freedom. You can't learn

about yourself if you are merely applying knowledge, that is, looking at yourself in terms of what you have learned from some instructor, from some book, or from your own experience. The "you" is an extraordinary entity; it is a complex vital thing, tremendously alive, constantly changing, undergoing all kinds of experiences. It is a vortex of enormous energy, and there is no one who can teach you about it - No one ! That is the first thing to realize. When once you realize that, really see the truth of it, you are already liberated from a heavy burden." - (Saanen 1964 page 7.)

("हा प्रवास अगदी एकट्यानेच करावयाचा आहे. या प्रवासात कोणी सोबती, पत्नी, पती किंवा ग्रंथ किंवा दुसरे कोणीही असणार नाही. जेव्हां हा प्रवास केवळ एकट्यानेच करावयाचा आहे हे सत्य तुम्हांला प्रतीत होईल तेव्हांच तुम्ही या प्रवासाची सुरुवात करू शकाल. आणि मग खरोखर तुम्ही एकटे असाल. कोणताही कडवटपणा, दोषैकदृष्टी किंवा निराशा यातून ही एकटेपणाची जाणीव होणार नाही; तर हा एकटेपणा अत्यावश्यक आहे हे तुम्हांला पटलेले असेल. ही वस्तुस्थिती आणि या वस्तुस्थितीची जाणीव यांमुळे एकटे वाटचाल करण्यास तुम्ही मोकळे व्हाल. ग्रंथ, रक्षणकर्ता, गुरु, सर्वकाही तुम्हीच व्हाल. म्हणून तुम्ही आत्मपरीक्षण करा, स्वतःला ओळखा. याचा अर्थ स्वतःसंबंधी ज्ञान गोळा करून त्याच्या सहाय्याने आपल्या कृती आणि विचार यांचा अभ्यास करावयाचा असा मात्र नव्हे."

"स्वतःला जाणण्यासाठी तुम्ही स्वतःकडे ताजेपणाने आणि मोकळेपणाने पाहिले पाहिजे. एखाद्या शिक्षकाकडून, ग्रंथातून किंवा अनुभवातून मिळविलेल्या माहितीच्या आधारे तुम्हांला स्वतःला जाणता येणार नाही. "तुम्ही" एक असामान्य वस्तू आहात. ती एक गुंतागुंतीची, अत्यावश्यक, अतिशय जिवंत, सतत बदलणारी आणि सर्व प्रकारचे अनुभव घेणारी वस्तू आहे. तो प्रचंड ऊर्जेचा भोवरा आहे आणि त्याच्यासंबंधी तुम्हांला कोणीही - अगदी कोणीही ज्ञान देऊ शकणार नाही; हे सर्वप्रथम जाणले पाहिजे. तुम्ही हे जाणलेत, त्यातील सत्य तुम्हांला प्रतीत झाले की तुम्ही मोठ्या ओझ्याखालून मुक्त झालेलेच आहात." - (Saanen 1964 page 7)

हे वाचून झाल्यानंतर पू. बाबांनी विचारले की हा choiceless awareness, हे पूर्वग्रहरहित होऊन स्वत:कडे लक्ष देणे शक्य आहे काय? कृष्णमूर्तींना नेमके काय म्हणायचे आहे?

**साधक प** : अन्य कोणताही विचार न करता गुरूंनी सांगितलेले नाम घेणे म्हणता येईल. नाम आणि choiceless awareness एकच आहेत. भाषा वेगळी आहे इतकेच.

**पू. बाबा** : आता श्रीमहाराजांची ही वचने पहा :

१) सद्गुरूच्या इच्छेनें मी करतो. तेच करवून घेतात अशी भावना ठेवावी.

२) आपण रामनाम घेतो तें तो रामच घेत असतो.

३) ज्याच्या सांगण्यावरून आपण पत्र लिहितो तो आपली सही तरी करतो - म्हणजे आपले नांव आपण लिहितो. तें जर दुसऱ्यानें लिहिलें तर खोटी सही केल्याचा आरोप येतो, तसें रामच आपलें नाम घेतो. पण माणूस मी घेतो असें म्हणतो. हें खोटे नव्हे का?

४) आपल्यात राम पाहिला की जें आपण करतो तें सर्व राम करतो असें होतें.

**साधक प** : माझ्या बाबतीत तरी मी पाहिले आहे की कर्तृत्व एक वेळ सोडता येईल. ते सोडण्याच्या आड इतर कोणी येत नाही; मीच त्याच्या आड येतो. नामस्मरणाखेरीज दुसरे काही करायचे नाही असे मी ठरवले तर काय होणार आहे? पण ही उडी मारवत नाही. कसली भीती वाटते तेही समजत नाही. तथापि कर्तृत्वापेक्षाही भोक्तृत्वातून बाहेर पडणे जास्त कठीण आहे असे वाटते.

**पू. बाबा** : कर्तृत्व आणि भोक्तृत्व बरोबरच असतात. मी कर्ता आहे म्हणूनच भोक्ताही आहे.

**साधक प.** : या जन्मात मी जे काही करतो त्याचे भोक्तेपण समजू शकते. गोड पदार्थ खाल्ले तर बाधतात हे माहीत असूनही मी ते आवडतात म्हणून खाल्ले की त्याचे परिणाम भोगावे लागणारच. पण ज्या भोगांचे कारण समजत नाही त्यांचे कर्तृत्व आपण पूर्वजन्मांवर - प्रारब्धावर सोपवतो. तथापि या जन्मी ते भोगतांना त्याचा साधनावर प्रतिकूल परिणाम होतो त्याला काय करायचे?

**पू. बाबा** : आपल्याला काही प्रमाणात तरी देहापासून वेगळे व्हावेच लागेल.

**साधक प** : शरीराच्या भोगांबद्दल मी म्हणत नाही. मनावर होणारा त्यांचा परिणाम जास्त त्रासदायक असतो.

**साधक ज** : मी देह आहे हे मनात पक्के ठसलेले असल्यामुळे शरीराचे भोगही मनावर परिणाम करतातच.

**साधक प :** तसे असेल, पण त्यातून बाहेर कसे पडायचे? आज इतकी वर्षे आपण नाम घेतो म्हणजे नाम हे सत्य आहे हे आत कोठेतरी पटलेले आहे. पण इच्छा असूनही वाटते तितके नामस्मरण होत नाही.

**पू. बाबा :** या बाबतीत गीतेत सहाव्या अध्यायात स्पष्ट सांगितले आहे.

शनैः शनैः उपरमेत् बुध्दया धृतिगृहीतया।

आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत्॥६.२५॥

मन उच्छृंखल आहे. ते हळू हळू शांत करावे. त्यासाठी बुद्धीचा उपयोग करावा. चांगला विचार करून दृढ धारणेने मन आत्म्याच्या ठायी केंद्रित करून कोणताही विचार करू नये. केवळ आत जावे. कृष्णमूर्ती सांगतात तो **choiceless awareness** हा आहे. यासाठी लागणारी जीवाची शक्ती कमी पडते, ती वाढविली पाहिजे.

**साधक क :** मागे साधक प म्हणाले होते तसे सिस्टिमच्या बाहेर पडल्याशिवाय ती सिस्टिम समजू शकत नाही. त्यासाठी पूर्वग्रहरहित (unbiased) झाले पाहिजे. आपल्या मनाचे सर्व कार्य मायेमधून आहे हे ओळखले पाहिजे. त्याखेरीज त्यातून बाहेर पडून मनाकडे पाहता येणार नाही. हा उपाय (Godel's theorem) हाच choiceless awareness. जीवाला जेव्हां कळेल की हे आपल्या हातून होत नाही तेव्हां शरणागती येईल. आज आम्हांला खरी तळमळ नाही.

**साधक ब :** साधक प म्हणतात त्याप्रमाणे नामाने काम झाले आहे हे तत्त्व म्हणून मान्य केले तरी प्रत्यक्षात आज काम झालेले नाही हेही खरे आहे. त्यासाठी जीवाची शक्ती कशी वाढवावयाची? मला तरी प्रार्थनेशिवाय दुसरा मार्ग दिसत नाही, त्यासाठी त्याची कृपा झाली पाहिजे.

**पू. बाबा :** कृपा आहेच; पण त्याचबरोबर अनेक वाटांनी होणारी शक्तीची गळती जाणीवपूर्वक थांबवली पाहिजे.

**साधक ग :** आपले नामस्मरण हे कर्म होते असे आपण म्हणतो. त्या बाबतीत असे वाटते की विवेकचूडामणीमध्ये शंकराचार्यांनी 'चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये' असे म्हटले आहे. कर्माने चित्तशुद्धी होते. त्याने आत्मज्ञान होत नाही. जोपर्यंत चित्तशुद्धी झालेली नाही तोपर्यंत नाम हे कर्मच राहाणार. पण तेच नामस्मरण चित्तशुद्धी घडवून नंतर आत्मज्ञान करून देईल. साधनच साध्य होईल.

**पू. बाबा :** चित्तशुद्धी म्हणजे काय ते आपण निश्चित ठरवले पाहिजे.

**साधक क :** स्थूलमानाने सांगायचे तर वासना क्षीण होणे म्हणता येईल.

**पू. बाबा :** क्षीण नव्हे, नाहीशा होणे.

**साधक ब :** व्यवहारात आम्हांला साधनच साध्य बनते असे काही माहीत नाही. त्यामुळे नाम हेच साधन आणि नाम हेच साध्य कसे ते कळत नाही.

**साधक प :** असे कां? नाम हेच सत्य आहे म्हणून तेच साध्य आहे हे मान्य करून - ही दृढ श्रद्धा ठेवूनच पुढे गेले पाहिजे.

**साधक क :** साधक प भोक्तृत्वाबद्दल म्हणतात त्या बाबतीत मला म्हणायचे आहे की ज्ञातृत्व, भोक्तृत्व आणि कर्तृत्व ह्या जीवाच्या अवस्था आहेत. जोपर्यंत जीवाला वेगळेपणाने ज्ञान होते तोपर्यंत तो ज्ञाता नाही. प्रथम त्याला मी कर्ता नाही हे पटेल. देहतादात्म्य सुटले की भोक्ता नाही हे पटेल आणि शेवटी तादात्म्याने म्हणजे ज्ञाता आणि ज्ञेय वेगळे न राहाता ज्ञान होईल. तथापि आज तरी श्रीमहाराज म्हणायचे तसे हवेनकोपण कमी होऊनच सुरुवात होईल.

**साधक प :** हवेपण एकवेळ कमी करता येईल पण नकोपण कसे सोडायचे? मला नको असणाऱ्या पुष्कळ गोष्टी असतात पण त्या येतात आणि त्यांचा त्रासही होतो. हवेपणाला मर्यादा आहेत पण नकोपणाला मर्यादाच नाही.

**साधक ज :** असे कसे? नकोपणालाही मर्यादा असलीच पाहिजे.

**साधक प :** तुम्ही हवे, नको आणि ज्या बाबतीत आपण indifferent - उदासीन आहोत असे तीन वर्ग केलेत तर तुमचे म्हणणे बरोबर आहे.

**साधक ग :** मागे एका शिबिरात याबद्दल चर्चा झाली होती. श्रीमहाराजांनी हवे आणि नको अशी वेगवेगळी पदे न घेता हवेनकोपण हे एकच पद वासना या अर्थाने घेतले आहे. हवेनकोपण जाणे म्हणजे वासना जाणे असा सरळ अर्थ घेतला पाहिजे.

**पू. बाबा :** कृष्णमूर्ती एकांताबद्दल सांगतात. त्याबाबतीत तुम्हांला काय वाटते?

**साधक प :** एकांतात थोडा वेळ साधन चांगले होते पण नंतर मन एकाग्र राहात नाही. एकांत सोसला पाहिजे. एकांत हा मनाचा धर्म आहे. घरात राहूनच एकांत साधला पाहिजे.

**साधक ब :** कृष्णमूर्तीही मी आणि मीपण गेले पाहिजे म्हणून सांगतात.

**पू. बाबा :** कृष्णमूर्तींनी एका ठिकाणी Dig deep into me असे म्हटले आहे. घ्या, पाहिजे तितके घ्या. तुमची शक्ती असेल तितके तुम्हांला मिळेल. श्रीमहाराजही म्हणाले, मला लुटा. तेच हे आहे.

**साधक ब :** कृष्णमूर्ती कोणाला पाया पडू देत नसत. पण श्रीमती पुपुल जयकर त्यांच्या पाया पडत. त्या म्हणत की you are still a stranger to us. आपली भेट केवळ image meets an image आहे. खरी तुमच्या पातळीवर येऊन भेट होतच नाही. त्या म्हणत तशी आमची बापाशी भेटच होत नाहीये!

पू. बाबा समजून नुसते हसले.

**।२५१।** (३१ जानेवारी १९९२)

पू. बाबांनी सांगितले होते म्हणून मागच्या शुक्रवारच्या (दि. २४) चर्चेची टिपणे पू. बाबांना दाखविली. पू. बाबांनी ती वाचून ठीक आहे म्हणून सांगितले.

**पू. बाबा :** चार दिवसांपूर्वी पुण्याच्या श्रीमाधवनाथांचे एक शिष्य, त्यांच्या सांगण्यावरून मला भेटायला आले होते. त्यांनी माधवनाथांकडून अनुग्रह घेतला तेव्हां माधवनाथांनी त्यांना सोऽहं जप अनाहत करा म्हणून सांगितले. ते नाथपंथी असल्याने ते बरोबरच आहे. तथापि अनाहत जप करायचा म्हणजे काय करायचे ते त्या गृहस्थांना समजले नाही म्हणून काही दिवसांनी ते पुन्हा माधवनाथांकडे गेले व हा जप कसा करायचा ते दाखवा म्हणाले. माधवनाथांनी त्यांना मला भेटायला सांगितले म्हणून ते माझ्याकडे आले होते. पू. बाबा म्हणाले की श्वासोच्छ्वासावर म्हणजे श्वास घेतांना सो आणि सोडतांना हं हा अनाहत जप होतो. (पहा : अजपाजपाचे वर्णन अध्यात्म संवाद भाग दुसरा, संवाद १८४). बरी आठवण झाली; गुरुदेव रानड्यांकडचे एक गृहस्थ श्री. काकासाहेब तुळपुळ्यांच्या बरोबर श्रीमहाराजांकडे आले होते, तेव्हां त्यांनी हाच प्रश्न विचारला होता. त्यांना श्रीमहाराज म्हणाले, मला हा शब्द - अनाहत - आणि त्याचा अर्थ माहीत नाही. श्री. तुळपुळे म्हणाले, आपल्याला माहीत नाही असे असणे शक्यच नाही; तथापि, आहत म्हणजे आघात होणारा आणि अनाहत म्हणजे ज्यात आघात होत नाही असा. त्यावर श्रीमहाराजांनी विचारले की आपण विचार कसा करतो? त्यासाठी शब्द लागतात. शब्द म्हणजे आघात झाला. म्हणून शब्दाशिवाय - नव्हे विचाराशिवाय म्हणजेच मन पूर्णपणे निर्विचार असतांना होणारा जप हा अनाहत जप होय.

पू. बाबांनी आम्हांला विचारले, आपल्याला हे करणे शक्य आहे काय? निदान एकाच वेळी विचारांचा प्रवाह आणि नामाचा अखंड प्रवाह चालू ठेवणे शक्य आहे काय? व्यवहारात आपण एका वेळी दोन किंवा अधिक अवधाने

ठेवतो. बायका पोळ्या करतांना लाटत असलेली पोळी, तव्यावरची पोळी यांकडे लक्ष देतानाच जेवावयाला बसलेल्यांना काय पाहिजे, विशेषत: पाहुण्याच्या पानात काय आहे काय नाही इकडेही लक्ष देतात. तसे नामाकडे जास्त लक्ष देऊन विचारांचा प्रवाह क्षीण करता येईल. श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे की आपण रस्त्याने जात असतांना अनेक माणसे दिसतात, भेटतात पण आपण तिकडे दुर्लक्ष करतो आणि पुढे जातो. तसे मनात येणाऱ्या अन्य विचारांकडे दुर्लक्ष करावे आणि नाम घ्यावे. मी 'नामसाधना' हे पुस्तक लिहिले तेव्हां नाम वैखरीतून मध्यमेत, तेथून पश्यंतीमधे आणि नंतर परावाणीत जाते असे लिहिले होते. ते वाचून दाखविल्यावर श्रीमहाराज म्हणाले, तसे लिहू नका. लोक तेवढेच सत्य धरून चालतील. (पहा, अध्यात्म संवाद भाग पहिला, संवाद ७३) श्रीमहाराज म्हणाले की येणारे प्रत्येक नाम हे परावाणीतूनच येते. तेथेच त्याचा उगम असतो. म्हणून वैखरीने नाम घेणे देखील महत्त्वाचे आहे असे लिहा. विहिरीतील पाण्यात सोडलेली घागर दिसत नसली तरी जोपर्यंत तिला बांधलेली दोरी आपल्या हातात आहे तोपर्यंत घागर आपल्या हातात आहे. तसे वैखरीने नाम घेतले तरी त्याचा संबंध परेशी आहे.

**साधक क :** परावाणीत केवळ स्फुरण आहे. तेथून वर चढत वैखरीत उच्चार होऊन शब्द ऐकू येतो. अनाहत जपाबद्दल नाथभागवतात बाराव्या अध्यायात त्यांनी श्वासाचा अवरोध करून अनाहत जप कसा करायचा ते सांगितले आहे.

(योगमार्गाने षट्चक्रे पार करतांना आज्ञाचक्रात पोचण्याची योगी कशी खटपट करतात ते सांगून नाथ पुढे म्हणतात : "हें स्थान पावावयासाठीं। योगी झाले महाहटी। अभ्यास करितां अतिसंकटीं। तेही शेवटी न पावती॥ १२.३४४॥ हें पावावया माझें स्थान। अतिगुह्य आहे अनुष्ठान। सोहं हंसाचे साधन। सावधान जो साधी॥ ३४५॥ प्राणाचेनि गमनागमनें। सोहं हंसाचेनि स्मरणें। सावधानें जो साधू जाणे। तेणें पावणें हें स्थान॥ ३४६॥ त्यासीच पवनजयो घडे। तोचि आज्ञाचक्रामाजीं चढे। तेथूनिही मार्ग काढी पुढें। अतिनिवाडे अचूक॥ ३४७॥)

आकाश तत्त्वापर्यंत नाम सूक्ष्म झाले की ते अनाहत होत असावे.

**पू. बाबा :** आकाश हे पंचमहाभूतातील सर्वात सूक्ष्म तत्त्व आहे. शब्द हा त्याचा गुण आहे. गवई गातात त्यात एक लय असते. ती त्यांना आत जाणवत असते. तिच्यात हार्मनी (सुसंवाद) आहे. गवई समेवर येतो तेव्हां आपण देखील ही लय अनुभवतो आणि दाद देतो. नादामधे एक लय आहे.

**साधक ग** : नादामध्ये शब्द आहे व त्यात हार्मनी आहे. त्यातून आपण नादाच्या पलीकडे असलेल्या हार्मनीत अनाहत जपाने जातो का?

**पू. बाबा** : नाही, उलट असे म्हणता येईल की जसा परेतून वैखरीत शब्द ऐकू येतो तसे अनाहत नाद आणि त्याच्या लयीतून आहत नाद व लय येतात. तथापि, मला सांगा, शब्दाखेरीज असणारा असा आपला एखादा अनुभव आहे का?

**साधक प** : 'मी आहे' हा अनुभव असा आहे की त्याचे मला एकसारखे स्मरण करावे लागत नाही. देहाशी तादात्म्य पावून 'मी आहे' असे म्हणत असलो तरी देहापलीकडे मी आहे हेही आत जाणवलेले असतेच. आज आपण अनेक ठिकाणी वाटले गेलो आहोत. आपल्याला अनेक गोष्टींत थोडा थोडा रस आहे. हा अनेकपणा जाऊन प्रथम फक्त मी आणि श्रीमहाराज असा भाव आला पाहिजे. त्यातूनच पुढे माझे खरे आतले स्वरूप तेच आहेत हे जाणवेल.

**पू. बाबा** : होय, हे खरे आहे. मी खरा वाटतो तसे महाराज किंवा नाम खरे वाटले पाहिजे. श्रीमहाराजांनी तीन प्रकारची संगत सांगितली आहे. (एक) सत्पुरुषाच्या देहाची संगत. ही दुर्मिळ आहे. (दोन) सद्विचारांची संगत आणि (तीन) नामाची संगत. सद्विचारांची संगत ठेवणे हे मोठ्या विचारी आणि बळकट धारणा असणाऱ्या माणसाचे काम आहे. म्हणून नामाची संगत ठेवायचा आपण प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठी नाम खरे वाटले पाहिजे. ते कसे वाटायचे?

**साधक प** : नाम खरे आहे हे आत पटलेले आहे. त्याखेरीज ते इतके दिवस घेतलेच नसते. तथापि ते खरेपण एकसारखे जाणवत नाही.

**साधक ज** : संगतीसाठी किंवा सहवासासाठी मी जितका खरा आहे तितके ते खरे वाटले पाहिजे.

**साधक ग** : नाम घेतांना 'जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती' असे तुकाराम महाराजांना वाटू लागले आणि शेवटी 'तुका झाला पांडुरंग' अशी त्यांची अवस्था झाली.

**साधक ख** : आणि तरीदेखील 'अद्वैती तो नाहीं माझें समाधान। गोड हे चरण सेवा तुझी।' असे ते म्हणतात.

**पू. बाबा** : ते भक्तीचे सुख भोगण्यासाठी. तथापि नाम खरे का वाटत नाही?

**साधक ख** : त्याची खरी आतून आवड नाही ना! नाम आवडू लागले पाहिजे.

**पू. बाबा :** ही आवड कशी निर्माण करायची?

**साधक प :** परत आपण त्याच मुद्द्यावर येतो. प्रेम असले की आवड आहेच. नामाचे किंवा श्रीमहाराजांचे प्रेम वाटले पाहिजे. त्यांच्या जीवनाकडे लीला या दृष्टीने पाहिले पाहिजे.

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. श्रीमहाराजांच्या जीवनातले कर्म हे दिव्य कर्म आहे. तसे आज नाम हे कर्म असेल. पण ते दिव्य कर्म झाले पाहिजे.

**साधक क :** ते काही तरी पवित्र आहे अशी भावना पाहिजे.

**साधक ज :** साधे पाणी पिणे आणि तीर्थ घेणे यामधील फरकासारखे ते आहे. नाम घ्यायला बसायचे म्हणजे आता आपण काहीतरी पवित्र करतो आहोत अशी भावना पाहिजे.

**साधक ज :** 'आवडीनें भावें हरिनाम घेसी' म्हणतांना एकनाथ महाराजांनी नाम कसे घ्यावे तेच सांगितले आहे.

**पू. बाबा :** ते सवयीचे होता कामा नये. नाहीतर पूजा करतांना कोठे पूजेकडे लक्ष असते? त्यात नित्य ताजेपणा पाहिजे. मागे तुम्हांला सांगितले होते; कासेगांवकरांना नामाबद्दल सांगतांना श्रीमहाराजांना बोलवेना. त्यांचा घसा दाटून आला. इतके नामाचे महत्त्व आहे. भाऊसाहेब कसे दर तास-अर्धातासाने महाराज कोठे आहेत, काय करताहेत ते पाहून यायचे तसे नामाचे अनुसंधान पाहिजे. गुरु देहात असतांना त्यांची सेवा करता येते, पण ते देहात नसतांनाही तोच भाव पाहिजे.

**साधक ब :** होय. मध्यंतरी खूप थंडी पडली होती आणि एकदम लक्षात आले की श्रीमहाराजांचा फोटो गॅलरीत आहे. त्यांना थंडी वाजत असेल असे इतके तीव्रतेने वाटू लागले की मी उठलो, तो फोटो आत आणला आणि त्याला पांघरूण घातले! असे होते खरे!

**पू. बाबा :** मला वाटते, त्याचबरोबर आपले आचरण आणि विचारही शुद्ध झाले पाहिजेत.

**साधक ग :** आपण शुद्ध झाल्याखेरीज त्यांना आपल्याजवळ यावे असे कसे वाटेल?

**पू. बाबा :** होय, हे खरे आहे. माझे तोंड फार वाईट होते; म्हणजे तोंडात खूप शिव्या असत. तेव्हां एकदा श्रीमहाराज म्हणाले की ज्या तोंडाने भगवंताचे नांव घ्यायचे त्याने अपशब्द उच्चारणे योग्य नाही. आपले मन आणि वाणी पवित्र पाहिजे. बरी आठवण झाली. तुकाराम महाराजांचा हा अभंग पहा :

होऊं नको कांहीं या मनाआधीन। नाइकें वचन याचें कांहीं॥ १॥
हटियाची गोष्टी मोडून टाकावी। सोई ही धरावी विठोबाची॥ २॥
आपुलें आधीन करूनियां ठेवा। नाहीं तरी जीवा घातक हें॥ ३॥
तुका म्हणे झाले जे मनाआधीन। तयांसी बंधन यम करी॥ ४॥

**साधक ब** : अगदी बरोबर आहे. हे मनच बदमाष आहे. त्याला ठेचलेच पाहिजे.

**साधक प** : मला वाटते, आपण मन शब्द वेगवेगळ्या अर्थाने वापरतो. मनाच्याही वेगवेगळ्या पातळ्या असल्या पाहिजेत. रोजच्या व्यवहारात आपल्याला ज्या गोष्टी कराव्या लागतात त्यात मन आपल्याला त्रास देत नाही, उलट मदतच करते. पण मनाची अशी दुसरी पातळी असली पाहिजे की ज्याच्या मदतीनेच साधनात पाऊल पुढे पडेल.

**साधक ब** : हे खरे आहे. रोजचे जे रूटीन लाइफ आहे त्यात मनाचा काही त्रास होत नाही. मात्र त्यात मन गुंतवून साधनाकडे दुर्लक्ष होता कामा नये. तसे झाले आणि मनाचा महत्त्वाचा भाग साधनाने व्यापला तर मनाचा संसाराकडील प्रवाह कमी होईल आणि मग साधन वाढेल.

**पू. बाबा** : यासाठी ध्येयाची सतत आठवण - सावधानता हवी. त्यासाठी रोज झोपण्यापूर्वी आत्मपरीक्षण करावे.

## |२५२| (६ फेब्रुवारी १९९२)

स्वामी रामसुखदास यांचा गीता प्रेसने प्रसिद्ध केलेला 'श्रीमद्भगवद्गीता - साधक संजीवनी टीका' हा ग्रंथ पू. बाबांना देण्यासाठी साधक ब आणि साधक ख यांच्याबरोबर संध्याकाळी साधक ग मालाडला गेले होते.

**पू. बाबा** : आपल्या कल्पनेपलीकडे श्रीमहाराजांनी आपल्याला सुखात ठेवले आहे.

**सर्वजण** : होय हे खरे आहे.

**साधक ब** : नाम म्हणजेच श्रीमहाराज हे कसे समजायचे असे बरेच दिवस मला कोडे पडले होते. पण मध्यंतरी जप करतांना मनात विचार आला की स्वामी रामदासांनी गोंदवलेकर महाराज हे नामावतार होते असे म्हटले आहे. अवतार म्हणजे खाली येणे. मूळ नामातून देहाने श्रीमहाराज खाली आले व नंतर पुन्हा सूक्ष्मात गेले. पण जातांना त्यांनी नाम ही आपली खूण आमच्यासाठी ठेवली. म्हणून मला नामात पहा असे ते म्हणतात.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे.

**साधक ग** : व्यक्त आणि अव्यक्ताला जोडणारी साखळी म्हणजेच नाम.

**साधक ब** : म्हणून नाम आहे म्हणजे श्रीमहाराज आहेतच. हातात दोरी आहे तोपर्यंत आडातील घागर हातात आहे. साधक ग नामाला साखळी म्हणतात ते बरोबर आहे. तथापि ही साखळी horizontal (समस्तर) नसून vertical (ऊर्ध्वाधर) आहे. म्हणून आपण जितके हलके होऊ, मोकळे होऊ तितके वर जाणे सोपे होईल. आपल्याला जडातून सूक्ष्मात जायचे आहे. आपण जितके सूक्ष्म होऊ तितके आपले नामस्मरण सूक्ष्मातील होईल.

**पू. बाबा** : हा विचार एकसारखा टिकला पाहिजे. पू. तात्यासाहेब आणि त्यांच्या पत्नी यांना श्रीमहाराजांबद्दल जो कृतज्ञ भाव होता तो भाव आला पाहिजे. ते दोघेही म्हणत की हे सगळे आहे ते श्रीमहाराजांचे आहे. लग्न झाले तेव्हां श्रीमहाराजांच्या अनेक राममंदिरांपैकी एखाद्या मंदिरातील पूजाअर्चा वाट्याला आली तर दोन वेळच्या भाताला कमी पडणार नाही इतकी माफक अपेक्षा असतांना केवढे वैभव, लोकसंग्रह झाला. चार लोकांपुढे दोन शब्द बोलायचे म्हणजे पू. तात्यासाहेबांची जीभ रेटत नसे. पण महाराजांनी कृपा करतांच केवढे ज्ञान त्यांच्या मुखातून लोकांना मिळाले! ही जाणीव पाहिजे.

**साधक ग** : जे काही आहे ते त्याने केले आहे ही जाणीव म्हणजे मी कर्ता नाहीच.

**साधक ब** : अशा रीतीने कर्तृत्व गेले की भोक्तृत्वही जाईल.

**पू. बाबा** (आमच्यापैकी एका साधकांना) : तुमच्यावर किती प्रसंग आले, पण श्रीमहाराजांनी सांभाळले! श्री. बापूसाहेब साठ्यांचा जीव घरात, मुलामध्ये गुंतला असता पण श्रीमहाराज त्यांना हर्द्याला घेऊन गेले आणि रामस्मरणात त्यांचा अंत झाला. (पहा : अध्यात्म संवाद भाग पहिला, संवाद क्रमांक ७)

**साधक ग** : श्रीमहाराज अंतकाळ साधतात तो असा!

**पू. बाबा** : मी एल्फिन्स्टन कॉलेजमधे शिकत होतो तेव्हां मॅजेस्टिक हॉटेलजवळ कॉलेजचे होस्टेल होते तेथे राहात असे. एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो की मी खूप दूर राहातो, माझ्यावर लक्ष असावे. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, माझ्या गुरूंनी मला दोन विद्या शिकवल्या आहेत. (१) पाहिजे तेव्हां पाहिजे तेथे जाता येते (सर्वव्यापित्व) आणि (२) अंतकाळ साधता येतो.

परवा साधक क म्हणाले ते खरे आहे. जीवाची शक्ती कमी पडते; ती वाढली पाहिजे. त्यासाठी पुण्यसंचय झाला पाहिजे. तो पुण्यसंचय नामानें होतो. हा बदल हळूहळू होत जातो.

**साधक ग :** खरोखर, किती चांगली माणसे आयुष्यात भेटली! हे सुदैवच. आता दुसऱ्यांचे दोष हे तसे दोष वाटत नाहीत. तेवढी तीव्र प्रतिक्रिया होत नाही. वाटते की त्याचे आयुष्य तो कसे ते जगतो आहे. त्याने असे करावे किंवा करू नये हे ठरविणारा मी कोण?

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. हा नामाचा परिणाम आहे. आपण ते निष्ठेने घेत राहिले पाहिजे. एकदा श्रीमहाराजांनी प्रश्न केला की मुक्त कोण आणि तो केव्हां मुक्त होतो? उत्तरादाखल तेच पुढे म्हणाले की फळ हे झाडाचे सर्वस्व असते. ते पिकले की अलगद झाडापासून वेगळे होते आणि झाड मुक्त होते. तशी आपली सर्व कर्मे, आपले सर्वस्व जो भगवंताला अर्पण करतो तो विनासायास मुक्त होतो.

नाम निरुपाधिक आहे आणि शरीराच्या कोणत्याही अवस्थेत घेता येणे शक्य आहे हे सांगतांना पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. श्री. डी. जी. जोशी यांना दमा होता. दम्याचा जोर वाढला की त्यांचे नामस्मरण होत नसे. श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर ते उद्गारले, दम्याचा आणि नामस्मरणाचा काय संबंध! पू. बाबा म्हणाले, वय झाल्यावर श्रीमहाराजांना दम्याचा त्रास सुरू झाला होता हे लक्षात घेतले की त्यांचे हे म्हणणे किती खरे आणि स्वानुभवावर आधारलेले होते ते लक्षात येते.

श्रीमहाराज किंवा कोणीही सत्पुरुष काही सांगतात तेव्हां ऐकणारा त्याला व्यक्तिनिष्ठ रंग (subjective colour) देतो म्हणून श्रीमहाराजांकडे नेहमी येणारे एक साधक जेव्हां श्रीमहाराजांना काही विचारत असत तेव्हां मला सांगत की तुम्ही ऐका आणि मग सांगा. त्यांच्या मुलीच्या लग्नाच्या वेळी सासरची माणसे जास्त पैसे मागत होती. काय करावे म्हणून श्रीमहाराजांना विचारल्यावर इतके पैसे मागणे कसे अयोग्य आहे ते सांगून पुढे श्रीमहाराज म्हणाले की असे असले तरी हो म्हणावे, हातचे स्थळ सोडू नये. इतके पैसे कसे द्यायचे म्हटल्यावर म्हणाले की बसेल बेंबीला कळ, पण करून टाकावे!

## |२५३| (७ फेब्रुवारी १९९२)

**पू. बाबा :** चार दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांनी काही लिहून आणले होते ते वाचून दाखवतो. हे गृहस्थ ठाण्याच्या कॉलेजात

प्राध्यापक होते. विलेपार्ल्याला राहातात. काही वर्षांपूर्वी बायको वारली. एकटेच असतात. आता सेवानिवृत्त झाले आहेत. प्रकृती चांगली आहे. जे. कृष्णमूर्ती, रमणमहर्षी, योगी अरविंद इत्यादींचे ग्रंथ वाचलेले आहेत. माझीही काही पुस्तके वाचलेली आहेत. ज्ञानमार्गाकडे मनाची ओढ आहे. राजगुरूनगरला सहा महिने झोपडी बांधून एकांतात मौन साधून राहिले होते. पण तेथे गुंडांचा त्रास होऊ लागला म्हणून परत आले. पार्ल्याला मित्रमंडळीत मन रमत नाही. त्याचबरोबर नामस्मरण हे थोतांड वाटते कारण ज्ञानमार्गच खरा अशी धारणा आहे. तथापि त्याचाही ध्यास नाही. त्यामुळे काय करावे म्हणून त्यांनी विचारले. (साधक प ना) त्यांना मी तुमच्याकडे पाठवणार होतो.

**साधक प** : नामस्मरण म्हणजे भक्तिमार्ग आहे, ज्ञानमार्ग नाही ही त्यांची चुकीची समजूत आहे. तथापि त्यांची स्थिती म्हणजे आमची सर्वांचीच स्थिती त्यांनी वर्णन केली आहे.

**पू. बाबा** : मी त्यांना सुचवले की काही दिवस त्यांनी एखाद्या बैराग्यासारखे हिंडावे. पण आपल्याला ते शक्य नाही असे त्यांनी प्रामाणिकपणे सांगितले.

**साधक क** : स्वामी रामदास हिंडले तसे!

**साधक प** : त्यांची गोष्टच वेगळी होती. त्यांना तळमळ लागली. केवळ नामच सत्य आहे असे वाटू लागले; त्यानंतरची ती स्थिती होती.

**पू. बाबा** : त्यांना आतूनच प्रेरणा मिळत होती.

**साधक प** : ते म्हणतात की भ्रमंतीची ती दोन वर्षे अतिशय आनंदाची होती. वास्तविक त्या काळात शरीराने ते किती दुबळे झालेले होते.

**पू. बाबा** : मला वाटते, मला भेटलेल्या या गृहस्थांच्या परमार्थासंबंधीच्या मूलभूत संकल्पनाच (basic concepts) स्पष्ट नाहीत. त्या आधी स्पष्ट केल्या पाहिजेत. श्रीमहाराज म्हणत की नाम हे उपाधिरहित आहे आणि तुम्ही त्याला उपाधि लावता.

**साधक क** : नाम हेच सत्य आहे असे वाटत नाही हीच खरी अडचण आहे.

**पू. बाबा** : नामात माणूस रंगला की बाकीच्या सगळ्या गोष्टी त्याला बेचव वाटू लागतात.

**साधक ड** : त्यासाठीच आपण म्हणालात तशी नामाची संगत झाली पाहिजे. संसार खोटा आहे हे बुद्धीला पटले तरी ते अजून आत शिरत नाही.

**साधक ग** : नामाची सत्यता (Reality) जाणवली की आपोआपच बाकीचे सगळे मिथ्या (unreal) आहे हे जाणवेल.

**साधक प** : बरोबर आहे. नामाची सत्यता आणि बाकी सगळ्याचे मिथ्यापण एकाच वेळी होणार आहे. आपली जाणीव जसजशी वाढत जाईल तसतशी खऱ्या स्वरूपाची ओळख होईल. कारण तो आरसा आहे. त्यात मी जेवढ्या मला पाहण्याचा प्रयत्न करेन तेवढाच मी दिसेन.

बोलण्याच्या ओघात पू. बाबा म्हणाले की सत्पुरुषांच्या ठिकाणी समत्व असले तरी देखील त्यांचे एक inner circle (अंतरंगातील माणसे) असतेच. श्रीमहाराजांच्या अंतरंगातल्या अशाच एका साधकांची पत्नी वारल्यानंतर त्यांची भावजय त्यांना नीट वागवत नसे. खाण्यापिण्याचे हाल होत. त्यासंबंधी श्रीमहाराजांना सांगतांना त्यांच्या डोळ्यात पाणी आले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की काळजी करू नये; 'मी' सगळे नीट करीन. महाराजांच्या या उद्गाराचे मला आश्चर्य वाटले. नंतर याबद्दल मी श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले की inner circle मधल्या काहींना असे सांगावे लागते. राम करील म्हणून त्यांचे समाधान होत नाही!

एकांतासंबंधी बोलणे निघाले तेव्हां पू. बाबांनी जी. डी. बिर्लांची हकिगत सांगितली. पहाटे चार वाजता त्यांची गाडी श्री. शंकरराव देशपांड्यांना दादरहून घेऊन जाई. मरीन ड्राइव्हवर एक शब्दही न बोलता बिर्ला आणि ते तासभर फिरत आणि शंकरराव गाडीतून पुन्हा घरी येत. असे पंधरा-पंधरा दिवस होत असे!

नंतर पू. बाबांनी त्यांच्या नोटबुकातली श्रीमहाराजांची काही वचने वाचून दाखवली ती अशी :

१) नामापरतें सत्य नाहीं असें ठाम वाटून त्याकरता वागले पाहिजे. नामाची गोडी आपल्याला लागली पाहिजे.

२) आपण निरुपाधिक झाले पाहिजे. पण ही इतकी उपाधि कशी काय जावी? ती सर्व उपाधि देहाची आहे. तेथें मनाची आसक्ति खरी उपाधि आहे.

३) देहाची आसक्ति किंवा आपलेपणा काढून टाकला की सर्व उपाधि जाते.

४) ती सुटणें कठिण खरें. पण भगवंताची उपाधि आपण जवळ ठेवू, म्हणजे ती आपोआप जाईल.

**साधक क** : उपाधि सहजासहजी सुटत नाहीत म्हणून त्यांचाच उपयोग करून सगुण भक्ती करावी. त्यातूनच निर्गुणात जाता येईल. देहाची उपाधि कमी करून भगवंताची उपाधि लावून घेण्याचे हेच मर्म आहे.

**साधक ब** : भगवंताची उपाधि लावून घ्यायची म्हणजे तो मला हवा असा निश्चय करायचा; आणि त्याची खूण म्हणजे नामस्मरण.

## ।२५४। (८ फेब्रुवारी १९९२)

पू. बाबांचा आज वाढदिवस. ८ फेब्रुवारी १९०९ हा त्यांचा जन्मदिवस. आज त्यांना ८४वे वर्ष लागले. दर शुक्रवारी जमणारे आम्ही सर्वजण वाढदिवसानिमित्त आज संध्याकाळी सव्वापाच वाजता त्यांच्या घरी गेलो. आज पू. बाबा विशेष प्रसन्न होते. सकाळपासूनच माणसे भेटायला येत होती. रात्री साडेनऊपर्यंत लोक येत होते असे नंतर समजले.

साधारण सव्वासहाच्या सुमारास पू. बाबांनी आम्हांला पुढे या म्हणून सांगितले. त्याचवेळी श्री. मोघे-पाध्ये गुरुजीही आले. पू. बाबांच्या भोवती भेटवस्तू, मिठाई इत्यादी होती. तिकडे पाहून पू. बाबा गुरुजींना विनोदाने म्हणाले, आता मी मठपती होऊ शकेन नाही? लोक पाया पडतात, भेटी आणून देतात. लगेच गंभीरपणे म्हणाले, पण तुम्हांला सांगतो हे सगळे खोटे आहे. श्रीमहाराजांनी मला अमानित्वाचा अभ्यास करायला सांगितले. म्हणाले, तुम्ही प्रोफेसर, तेव्हां विद्यार्थी तुम्हांला मान देणार. लोक पाया पडतात, तथापि, श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे, लोक नमस्कार करतात त्याच्या आधीच मी मनाने त्यांना नमस्कार करतो. ज्ञानेश्वर महाराजांचा अधिकार केवढा आणि तरीदेखील त्यांची लीनता किती! मी गीता सांगायची म्हणजे टिटवीने समुद्र रिकामा करायचा प्रयत्न करण्यासारखे आहे. (कीं टिटिभू चांचुवरी। माप सूये सागरीं। मी नेणतु त्यापरी। प्रवर्ते येथ॥ १.६८॥) तथापि मला दोन गोष्टींनी बळ आले आहे. एक म्हणजे तुम्ही संतांनी मला आपला म्हटले आहे, (तैसा तुम्हीं मी अंगीकारिलां। सज्जनीं आपुला म्हणितला। १.६५।) आणि दुसरे म्हणजे माझे गुरु निवृत्तिनाथ मला अनुकूल आहेत. (परी एथ असे एकु आधारु। तेणेंचि बोलें मी सधरु। जे सानुकूळ श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे॥ १.७५॥) त्यांनीच म्हटल्याप्रमाणे 'हा अमुका ऐसी नोहावी। सेचि लोकां। १३.१८८।' आणि त्याऐवजी ही इतकी माणसे येऊन मला आठवण करून देतात याला तुम्ही काय म्हणाल?

गुरुजी जरा विचार करून म्हणाले, लोकेच्छा.

**पू. बाबा :** त्याऐवजी मी म्हणतो की श्रीमहाराजांची इच्छा. (आमच्याकडे वळून) या इतक्या प्रपंचात अनुसंधान टिकणे फार कठीण आहे. ते श्रीमहाराजांनी करून दाखवले. जळण नव्हते तर पोळपाट फोडून आणि नवीन बांधकाम चाललेल्या खोलीच्या आढ्याची कैची जाळून वेळ निभावली! डॉ. कूर्तकोटी म्हणाले की ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या हे त्यांनी आचरून दाखवले.

आम्ही चिंतामणीला गेलो होतो. तेथून बंगलोरला जाण्यासाठी गाडीत बसलो. स्टेशनवर नांजुडय्या आणि इतर काही मंडळी आली होती. त्यांनी गाडी सुटायच्या वेळी 'केतकर महाराज की जय' असा गजर चालू केला तेव्हां पू. तात्यासाहेबांनी डोळे झाकून घेतले. गाडी बंगलोरच्या जवळ गेल्यावर मी त्यांना याचे कारण विचारल्यावर ते म्हणाले की जयजयकार श्रीमहाराजांचा करायचा. श्री. दिनकररावांनाही त्यांनी सांगून ठेवले होते की श्रीमहाराजांचे महत्त्व वाढवा. हे खरे अमानित्व.

**साधक ग** : ब्रह्मानंद महाराजांनी नाही का, वेंकटापूरला समाधी न घेता कागवाडला (नवबाग) घेतली.

**पू. बाबा** : होय. त्यांच्या पायावर कोड होते. श्रीमहाराजांनी त्यांना हे बरे करू का म्हणून विचारले तेव्हां ते नको म्हणाले. पुढे श्री. भीमरावांनी त्यांना याचे कारण विचारले असतां ते म्हणाले की बरे आहे, कोड पाहून लोक पाया पडायला येत नाहीत, दुरूनच नमस्कार करतात.

श्रीमहाराज म्हणत की पैसा हा प्रापंचिकाचा प्राण आहे. त्याला मी कधी हात लावला नाही. त्या काळात एका व्यापाऱ्याने एक हजार रुपये चांदीच्या ताटात ठेवून ते ताट त्यांच्यापुढे ठेवले. तेव्हां श्रीमहाराज नको म्हणाले. घ्या, घ्या म्हणून तो फार आग्रह करू लागला तेव्हां नाइलाजाने तोंड वाकडे करून त्यांनी फक्त एक रुपया उचलला आणि एवढा पुरे म्हणाले. श्रीरामकृष्णांचे असेच होते. धातूला स्पर्श झाला की त्यांचे हात वाकडे होत असत.

पू. बाबा पुढे म्हणाले, जीवनात पैसा dispensable (त्याग करण्यायोग्य, अनावश्यक) आहे, प्रकृती dispensable आहे, सर्व नातेवाईक, मित्र इत्यादी dispensable आहेत; फक्त एक नाम dispensable नाही. त्याच्याशिवाय जगूच शकणार नाही असे झाले पाहिजे.

**साधक क** : महाराज म्हणाले, पैसा ही अशी गोष्ट आहे की ती जवळ असली तरी दु:ख देते आणि जवळ नसली तरी दु:ख देते. म्हणजे ती दु:खरूपच असली पाहिजे. असे असून देखील माणसाला पैशाची किती ओढ वाटते. श्रीमहाराजांच्या चरित्रातच एक गोष्ट आहे. एक लहान मूल रडत होते. काही केल्या रडायचे थांबेना तेव्हां श्रीमहाराजांनी कोणाला तरी रुपयाचा आवाज करायला सांगितले. रुपयाचे नाणे जमिनीवर टाकून वाजवतांच तो आवाज ऐकून ते मूल रडायचे थांबले! यावरून पैशाची ओढ आपल्या किती आतमध्ये आहे हे लक्षात येते.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांनी स्वत:च्या देहाचा कधी विचार केला नाही पण पू. तात्यासाहेबांना ते अतिशय जपत. पण लोकही अतीच करत. एका गृहस्थांच्या घरी आग्रहाने पोहे खायला घातल्यावर त्यांना किती त्रास झाला. (पहा : अध्यात्म संवाद भाग पहिला, संवाद क्र. ७१) ही बहुधा आम्हांला उठायची सूचना होती. कारण बोलण्याच्या ओघात जास्त बोलण्याच्या त्रासापेक्षा बसण्याचा त्रास होतो. पाठ दुखू लागते असे पू. बाबा म्हणाले होते. म्हणून आम्ही लगेच उठलो आणि त्यांना नमस्कार केला.

सर्वांना निरोप देतांना पू. बाबा म्हणाले, आता उद्या ज्ञानेश्वरीत महत्त्वाचा विषय आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी अर्जुनाच्या रथाचे वर्णन केले आहे आणि ते करतांना त्यांना श्रीकृष्णाच्या प्रेमाचे भरते आले आहे.

**|२५५|** (१४ फेब्रुवारी १९९२)

पू. बाबांनी कबीराचा एक दोहा सांगितला

लौन गला पानी मिला फिरही न भरि है गौन।
सुरत शब्द मेला भया काल रहा गहि मौन॥

पू. बाबा म्हणाले, गुरुदेव रानडे यांना हा दोहा फार आवडत असे. मीठ पाण्यात मिसळले की पुन्हा पोत्यात भरता येत नाही. तद्वत जीव आणि नाम यांचे ऐक्य झाले की काल मूक होतो. काल ही संकल्पनाच मग नाहीशी होते. बाहेरचे जग देहाच्या खरेपणामुळे खरे वाटते. देहबुद्धी गेली, म्हणजे देहाचे खरेपण गेले आणि त्याचे खोटेपण समजले की मग जग खोटे वाटेल आणि काम होईल. मग केवळ भगवंताचे किंवा श्रीमहाराजांचे ख़रेपण राहील.

**साधक ब :** देहाच्या खोटेपणामुळे म्हणजेच पुढे निश्चित असलेल्या मृत्यूच्या आठवणीने साधकाला मधूनच उदासीनता येते आणि आपला कर्तेपणा किती अपूर्ण, लटका आहे हे लक्षात येते. पण पाऊल पुढे पडत नाही.

**पू. बाबा :** मृत्यूची खरी जाणीव होऊन सारखी आठवण राहात नाही. देहबुद्धी कमी झालेली आपल्या कृतीतून दिसली पाहिजे. मृत्यूबद्दल आपला विचार बरोबर होतो पण तो कृतीत उतरायला पाहिजे. बाह्य वागणुकीत बदल नको. मनाचा दृष्टिकोन - attitude बदलायला पाहिजे. यामुळे उत्तरोत्तर देहबुद्धी कमी होत जाईल.

**साधक प :** सध्या आपण जे कर्म करतो ते देहाच्या पातळीवर असते. त्याचबरोबर त्याच्या मागे मनही दृश्याच्या पातळीवरच असते. बाह्य कृती तशीच ठेवून मन बदलणे कसे शक्य होईल?

**पू. बाबा :** आपण जे कर्म करतो ते, हे सर्व श्रीमहाराजांचे आहे म्हणून करू शकतो का? हे शक्य झाल्यास प्रत्येक कर्मात त्यांची इच्छा दिसू लागेल व हळूहळू मनाचा दृष्टिकोन बदलेल.

**साधक ड :** प्रकृती ठीक नसतांना जेव्हां आपण औषध घेतो तेव्हां ते बरे होण्यासाठीच घेतो. अशा वेळी त्यांची इच्छा असली तर बरा होईन त्यामुळे बरा झालो काय किंवा न झालो काय दोन्ही सारखेच अशा प्रकारची मनाची धारणा करणे शक्य आहे काय?

**पू. बाबा :** आपल्याला अभिप्रेत असलेला बदल हळूहळूच होणार आहे आणि त्यासाठी आजचे मन बदलायला पाहिजे. त्यासाठी नाम घ्यायचे. ते नामच हा बदल घडवून आणेल.

**साधक क :** सध्या जे बौद्धिक पातळीवरचे 'समजणे' आहे ते भावनेत आणले पाहिजे. या बाबतीत श्रीमहाराजांनी दोन उदाहरणे दिलेली आहेत. यात्रेला जाणे म्हणजे त्यामधे ऑफिसातून रजा घेणे, तिकीट काढणे, प्रवासाला सुरुवात करणे हे सर्व आवश्यकच आहे पण या गोष्टी म्हणजे यात्रा नव्हे. तसेच नवीन लग्न झालेली मुलगी सासरी सर्वांचे करते; ती कदाचित नवऱ्याचे काही करीतही नसेल. परंतु तरीही ती सर्व काही नवऱ्यासाठीच करते. त्याप्रमाणे आपली दैनंदिन कर्मे कोणतीही असोत, ती एका परमेश्वरासाठी आहेत असा भाव ठेवल्यास मन पालटत जाईल. सध्या तसे होत नाही; पण तसे करणे जरूर आहे. त्यासाठी प्रार्थना हवी.

**साधक ब :** उदासीनतेच्या वेळी आपण प्रार्थनेने बाहेर पडू शकतो.

**साधक ड :** अशा उदासीनतेच्या वेळी उदासीनतेचे कारण दूर करा अशी प्रार्थना न करता जास्त वरच्या दर्जाचे मागणे मागितल्यास, म्हणजे वासना आणि अहंकार नाहीसे करा अशी श्रीमहाराजाजवळ प्रार्थना केल्यास त्याची देहबुद्धी कमी होण्यास मदत होईल.

**साधक प :** मागायचेच तर जे मुख्य आणि सगळ्याच्या पलीकडे आहे तेच कां मागू नये? म्हणजे साक्षित्वाने स्वत:कडे पहाणे जमले पाहिजे तरच खरी सुधारणा होईल.

**पू. बाबा** : मनाच्या प्रतिक्रिया बदलल्या पाहिजेत. त्या बदलल्या तर प्रगती होते आहे असे समजण्यास हरकत नाही. त्यासाठी नाम घ्यावे. खरे नामस्मरण भाऊसाहेब, ब्रह्मानंद महाराज आणि आनंद सागर यांनी केले. त्यांनी खरे आज्ञापालन केले. यातून काय होणार याचा त्यांनी विचार केला नाही. आज्ञापालन हे फार कठीण परंतु हुकुमी साधन आहे.

## |२५६| (२१ फेब्रुवारी १९९२)

**पू. बाबा** : परमार्थाच्या मार्गावर निरनिराळ्या लोकांनी निरनिराळ्या पायऱ्या सांगितलेल्या आहेत. योगवासिष्ठात ज्ञानाच्या सात भूमिका सांगितल्या आहेत. Underhill बाईंनी पाच पायऱ्या सांगितल्या आहेत त्या अशा : १) Awakening of the soul २) Purity of the soul ३) Introversion ४) Quiet आणि ५) Ecstacy. नाथांनी भावार्थ रामायणात सात पायऱ्या सांगितल्या आहेत. श्रीमहाराजांनीही सात पायऱ्या सांगितल्या आहेत. वास्तविक त्यांना पायऱ्या न म्हणता, चढण किंवा slope म्हणता येईल आणि कोणता साधक कोणत्या टप्प्यावर किती काळ राहातो ते प्रत्येक व्यक्तीगणिक भिन्न राहील. त्याचे निश्चित गणित सांगता येणार नाही.

**साधक ड** : बराच काळ टिकणारी एक अवस्था आणि तेथून नंतर येणारी वरची अवस्था असे काहीतरी असावे म्हणून कदाचित पायऱ्या म्हटले असेल.

**पू. बाबा** : मला, विशेषत: पुस्तके लिहितांना याचा फार उपयोग झाला. भावार्थ रामायण लिहावे असे नाथांना वाटत नव्हते पण श्रीरामप्रभूंची त्यांना आज्ञा झाली. इतकेच नव्हे तर त्यांनी म्हटले आहे की मी झोपलो तर थापट्या मारून श्रीराम मला उठवीत आणि रामकथा लिहायला सांगत. लोकांशी शिळोप्याच्या गप्पा माराव्या म्हटले तर रामकथाच सुरू होत असे.

(तात्पर्य : पू. बाबांची देखील अशी अवस्था होते तेव्हांच ते लिहितात.)

भावार्थ रामायणात अयोध्याकांडाच्या पाचव्या अध्यायात सांगितलेल्या पायऱ्या अशा : रामाला राज्याभिषेक व्हावयाचा आहे आणि म्हणून सुमंत त्याला भेटायला त्याच्या महालाकडे जात आहे. तो (किंवा कोणीही साधक) रामापर्यंत कसा पोचला याचे वर्णन नाथांनी केले आहे. पूर्वी चौसोपी वाडे असत. एका चौकातून दुसऱ्या चौकात दारे आणि उंबरठे ओलांडून जावे लागत असे. एकनाथ महाराजांनी प्रथम दारांचे आणि नंतर उंबरठ्यांचे वर्णन केले आहे.

"रथ सांडिती पहिले द्वारीं। छत्र चामर दुसरें द्वारीं। पादत्राणादि सामग्री। तिसरें द्वारीं पैं राहे॥५.४८॥ चौथें द्वारीं सांडिती अर्थ। पांचवे द्वारीं निःशेष स्वार्थ। साहाविया द्वाराआंत। साधनें समस्त स्वयें राहाती॥४९॥ सांडूनि मी तूंचा सांघात। रिघावें सातव्या द्वारांत। तैंच भेटे रघुनाथ। मुख्य परमार्थ या नांव॥५०॥ भावार्थ तें राजभवन। प्रथम दारवंठा ते श्रवण। दुजा दारवंठा साधन। नित्यानित्यज्ञान तो तिजा॥५१॥ चौथा दारवंठा मनन। पांचवा निदिध्यासन। साहावा तो वैराग्य पूर्ण। सातवा तो जाण साक्षात्कार॥५.५२॥

श्रवणानंतर कीर्तन न सांगता साधन (उदाहरणार्थ, नामस्मरण) आणि त्यानंतर नित्यानित्यविवेक सांगितला आहे. वैराग्याला सहावा उंबरा म्हटले आहे, इतके ते उशीरा येते! तथापि सर्व साधनात सत्संगाचे महत्त्व फार आहे. माझा स्वभाव फार रागीट होता. आतादेखील मी रागाचा चांगला आविर्भाव आणू शकतो. वेळप्रसंगी चांगला भांडूही शकेन. पण पूर्वी यावयाची तशी आतून रागाची ऊर्मि येत नाही. हा सत्संगाचा आणि नामस्मरणाचा परिणाम आहे.

**साधक ब** : रागावू शकतो पण रागाची ऊर्मि येत नाही म्हणजे काय?

**पू. बाबा** : म्हणजे असे की एखाद्याला एकदम कडक बोलेन. पण त्याचा अर्थ आतमधे काही खळबळ झाली आहे किंवा ज्याला बोललो त्या माणसाविषयी मनात काही वाईट असते असा नाही. आतून मी पूर्वीइतकाच शांत असतो; ते असो. आता श्रीमहाराजांनी सागितलेल्या पायऱ्या पहा :

**(एक)** : सत्समागम व सत्समागमामध्ये भगवंताचे गुणश्रवण. श्रीमहाराजांनी सत्समागमाला फार महत्त्व दिले आहे; आणि ते तसे आहेच. सत्समागमात भगवंताचे किंवा सद्ग्रंथाचे श्रवण केले तर ते जास्त परिणाम करते. आपण दासबोध किंवा ज्ञानेश्वरी वाचतोच. पण सत्पुरुषाने सांगितलेले त्याच्या तोंडून श्रवण करायला मिळाले तर ते जास्त परिणाम करते, कारण ते आतपर्यंत जाते. आपण ग्रंथ वाचतो तेव्हां तो कळणे कित्येकदा आपल्या त्यावेळेच्या मनस्थितीवर अवलंबून असते. पण सत्समागमात आपली वृत्ती ते विचार ग्रहण करायला अनुकूल होते. त्यासाठी वेगळे प्रयास करावे लागत नाहीत. म्हणून सत्समागमात भगवंताचे गुणश्रवण होण्यास फार महत्त्व आहे.

**(दोन)** : भगवंताचें दर्शन व्हावे अशी खरी इच्छा होणे. म्हणजेच ध्येय ठरणे म्हणा. ते ठरले की तिसरी पायरी येते. आपले प्रत्येक कर्म भगवत्प्रातीला पोषक आहे का याची साधक परीक्षा करू लागतो. त्याबाबतीत तो सावध होतो. मग

**(तीन)** : भगवंतासाठीं कर्म करणें.

या तिसऱ्या पायरीवर तो येतो. जगण्यासाठी कर्मे करावी लागतीलच; पण भगवत्प्राप्तीसाठी जगायचे आहे असा निश्चय झाला की त्या कर्मांना तसे महत्त्व राहाणार नाही.

**(चार)** : शुद्धबुद्धि म्हणजे वैराग्यप्राप्ति.

शुद्धबुद्धीचा श्रीमहाराजांनी केलेला हा अर्थ अप्रतिम आहे. शुद्धबुद्धि हा शब्द आपण वापरतो. काही वेळा वासनारहित होणे असाही त्याचा अर्थ करतो. गीतेच्या सोळाव्या अध्यायात सत्त्वशुद्धीबद्दल सांगतांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात - ''तेविं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धी जें ऐसें अनन्य होणें। ते सत्त्वशुद्धि म्हणे। केशिहंता॥ १६.८०॥'' त्याचप्रमाणे दुसऱ्या अध्यायात सांगतात - ''जैसी दीपकळिका धाकुटी। परी बहु तेजातें प्रगटी। तैसी सद्बुद्धी हे थेकुटी। म्हणों नये॥ २.२३८॥''

वैराग्यप्राप्ती ही इतकी वरची पायरी आहे. भगवंतासाठी म्हणून कर्म करू लागला आणि वैराग्याचा उदय झाला की कर्म घडत राहील पण त्याच्या फळात साधक गुंतणार नाही. म्हणून शंकराचार्यांनी तिसऱ्या अध्यायातील एकोणिसाव्या श्लोकावर (तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर। असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः॥) भाष्य करतांना मूळ गीतेत नसलेला 'ईश्वरार्थं कर्म कुर्वन्' हा शब्दप्रयोग उपयोगात आणला आहे.

मी बरेच दिवस ज्ञानेश्वरीतल्या एका ओवीचा नीट अर्थ लागत नाही म्हणत होतो. ''वन्हीची ज्वाळा जैसी। वायां जाय आकाशीं। क्रिया जिरों दे तैसी। शून्यामाजीं॥ १२.१३३॥'' पण मग श्रीमहाराजांनी सांगितलेला अर्थ आठवला. श्रीमहाराज म्हणाले, वन्हीची ज्वाळा कितीही मोठी असली तरी ती आकाशाला कशी जाळू शकेल? ती फुकटच जाणार. त्यातून काहीही निष्पन्न होणार नाही. त्याप्रमाणे तू केलेल्या कर्मातून कोणतेही फळ निर्माण होईल अशी इच्छा तू धरू नकोस. म्हणजेच अनासक्त बुद्धीने कर्म कर. बुद्धी शुद्ध झाल्याखेरीज हे होणार नाही. बुद्धी शुद्ध होऊन वैराग्य आल्यानंतर पाचवी पायरी सांगितली आहे.

**(पांच)** : सद्गुरूची भेट व अनुसंधानाचा आरंभ - नामस्मरण. पाचव्या पायरीवर खरें अनुसंधान चालू होते. तोपर्यंत आपण नामस्मरण करतो इतकेच. खरोखर अनुसंधानाचा अर्थच आपल्या लक्षात येत नाही. अनुसंधानात सारखा तोच विषय मानत राहातो. तो आपले सर्व व्यक्तिमत्त्व व्यापून टाकतो. ऱ्हाइन नांवाच्या एका स्पॅनिश विचारवंताने न्यूटनच्या बाबतीत म्हटले आहे की

न्यूटनला जेव्हां त्याच्या संशोधनासंबंधी तो इतके संशोधन कसे करू शकतो म्हणून विचारले तेव्हां तो म्हणाला की I think about it all night and day. यानंतर सहावी पायरी.

**(सहा)** : ध्यानाचा अभ्यास - अनुसंधानाचे स्थैर्य.

श्रीमहाराजांनी म्हटले आहे की काशीविश्वेश्वराचे दर्शन घ्यायला लोक निरनिराळ्या दिशांतून येतात पण शेवटी सर्वांना एकाच दारातून दर्शनासाठी आत जावे लागते; तसे भगवंताच्या प्राप्तीसाठी वेगवेगळे मार्ग असले तरी शेवटी सर्वांना ध्यानाच्या दरवाजातूनच जावे लागते. आणि त्यानंतर

**(सात)** : भगवंताचें दर्शन.

या सर्व पायऱ्यांत श्रीमहाराजांनी सत्समागमास अतिशय महत्त्वाचे स्थान दिले आहे. या पायऱ्यांपैकी आपण कोणत्या पायरीवर आहोत?

**साधक प** : अमुक एका पायरीवर असे निश्चितपणे सांगता येणार नाही. कारण बरेचदा थोडे वर जाणे, परत खाली येणे हे चालूच असते. स्थूलमानाने आपण पहिल्या तीन पायऱ्यांत घोटाळतो आहोत असे म्हणता येईल.

**पू. बाबा** : मला वाटते, यातली पहिली पायरी (सत्समागम व त्यात भगवंताचे गुणश्रवण) सर्वस्वी आपल्या हातातली नाही. म्हणून दुसरी पायरी महत्त्वाची आहे. मला भगवंत पाहिजे असे वाटू लागणे महत्त्वाचे आहे. त्यालाच ध्येय निश्चित होणे म्हणता येईल. भगवंतासाठी कर्म करणे म्हणजे काय?

**साधक ब** : कर्म तर एकसारखे घडणारच. त्याचा संबंध भगवत् प्राप्तीशी जोडणे म्हणजे भगवंतासाठी कर्म करणे.

**पू. बाबा** : मग रोजच्या व्यवहारात जी कर्मे करावी लागतात त्याचे काय?

**साधक प** : ती चालू राहतीलच पण त्यात मन गुंतून राहाणार नाही. भूक लागली की माणूस खाणारच पण त्या खाण्यात जे मन गुंतून राहात असे ते तसे राहाणार नाही. खाणे आणि जगणे भगवत्प्राप्तीसाठी आहे अशी त्या कर्माला पार्श्वभूमी राहील.

**पू. बाबा** : चैतन्यगीतेत श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे "भगवंताचे स्मरण संभाळून। कोणताहि करावा व्यवसाय जपून। हेंच प्रापंचिकास मुख्य साधन॥७.१८॥"

**साधक प** : श्रीमहाराजांनी अनेक प्रसंगी अनेकांना वेगवेगळ्या गोष्टी सांगितल्या आहेत त्यामुळे कोणत्याही प्रसंगाला योग्य असे वचन सापडतेच.

पण मला वाटते, त्यात जास्त न गुंतता आपल्याला पटणारे एखादे वचन घ्यावे आणि ते महावाक्य समजून त्यावर चिंतन करावे. ते वचन एकसारखे कानांना ऐकू येत राहिले पाहिजे.

**पू. बाबा :** तुमचे हे म्हणणे मला पटले. ते वचन म्हणजे महावाक्य अशी श्रद्धा उत्पन्न झाली पाहिजे.

**साधक प :** निसर्गदत्त महाराजांना विचारले की तुमच्या गुरूंनी तुम्हांला काय उपदेश केला आणि तुम्ही काय साधन केले. यावर ते म्हणाले की माझ्या गुरूंनी तू आणि मी एकच आहोत म्हणून सांगितले आणि त्यावर पूर्ण विश्वास ठेवून मी चिंतन केले.

**साधक ब :** आणि तीन वर्षात त्यांना आत्मज्ञान झाले!

**पू. बाबा :** गुरूंनी तत्त्वमसि म्हणून सांगितले आणि शिष्य ते झाला कारण तो श्रद्धा आणि चित्तशुद्धी म्हणजे वैराग्यसंपन्न होता. (साधक ब ना) तुमचा मनावर कटाक्ष आहे ते बरोबर आहे. आज आपले जे मन आहे त्या मनाने काम होणार नाहीच. म्हणून "सगुणचरित्रें परमपवित्रें सादर वर्णावी। सज्जनवृंदे मनोभावें आधी वंदावी।" सगुण भक्ती आणि सत्संगतीचे फार महत्त्व आहे. निंबाळला श्रावणात नामसप्ताह असतो. पूर्वी तो इंचगिरीला असे. तेव्हां सप्ताह संपल्यानंतर सप्ताहासाठी आलेली मंडळी परत निघाली की पू. भाऊसाहेब उमदीकर (गु. रानडे यांचे गुरु) घराच्या छपरावर चढून जात आणि परत जाणाऱ्या मंडळींकडे भरल्या डोळ्यांनी पहात उभे राहात असत. त्यांना याचे कारण विचारल्यावर ते म्हणाले, किती चांगली माणसे आहेत ही; मला यांचा सत्संग घडला.

**साधक ब :** पूजा करतांना किंवा श्रीमहाराजांची तसबीर पुसतांना आपण प्रत्यक्ष महाराजांचे अंग पुसतो आहोत असा भाव असला पाहिजे.

**पू. बाबा :** भावच सर्वकाही आहे. प्रयत्न पाहिजेतच पण मला वाटते, त्यापेक्षाही तळमळ महत्त्वाची आहे.

### |२५७| (२८ फेब्रुवारी १९९२)

**पू. बाबा :** परवा म्हणजे बुधवारी पुण्याच्या स्वामी माधवनाथांकडून एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांना सारखी भीती वाटते. त्यांना मी काय ते सांगितले पण नंतर त्यावर मी बराच विचार केला. कृष्णमूर्तींनी Fear - भीतीबद्दल पुष्कळ सांगितले आहे. The Awakening of Intelligence

मध्ये ते म्हणतात, तुम्हांला भीती कां वाटते? पुढे काय होईल याचा तुम्ही विचार करीत राहता आणि त्या विचारातून काळजी निर्माण होते. म्हणून विचार बंद करा की भीती जाईल आणि त्याबरोबर काळजीही नाहीशी होईल. विचार काळामध्ये चालतात. म्हणून विचार थांबवण्यासाठी काळाच्या पलीकडे गेले पाहिजे. भीतीतूनच काळजी निर्माण होते. **Anxiety is the child of fear** असे रसेलने म्हटले आहे.

आता याबाबतीत श्रीमहाराजांनी काय सांगितले आहे ते सांगतो. ते म्हणतात, माणसाला भीती आणि काळजी का आहेत? लक्षात येईल की माणसाला जीवनात आशा असते. अमुक व्हावे आणि तमुक होऊ नये असे त्याला नेहमी वाटत असते. हवे ते मिळत नाही आणि नको ते टळत नाही असा अनुभव असून देखील तो आशा करीत असतो. आशेचे मूळ वासनांमधे आहे. वेदान्ताच्या भाषेत माणूस हा वासनांचा पुंज आहे. Man is a bundle of desires असे ब्रॅडले म्हणतो. बरे, या वासनाही देहबुद्धीवर म्हणजे मी देह आहे या श्रद्धेवर आधारलेल्या असतात. जी दृश्यात नेऊन बसवते ती वासना होय. विहिरीतून खारे पाणी उपसून टाकून विहीर कोरडी केली तरी झऱ्यातून पुन्हा खारे पाणीच यावे त्याप्रमाणे काही वासना पूर्ण होऊन किंवा अन्य कारणाने नाहीशा झाल्या तरी नवीन वासना तशाच म्हणजे देहबुद्धीच्याच येतात. माणसाच्या अपूर्णपणात वासनांचा उगम आहे. वासना पूर्ण झाल्या की आपण सुखी होऊ असे त्याला वाटते. त्या पूर्ण होतीलच अशी खात्री नसते म्हणून काळजी आणि भीती पाठ सोडत नाहीत.

**साधक ब :** वासना देहबुद्धीवर आधारलेल्या आहेत. त्या कधीही पूर्ण होणार नाहीत, त्यातून मला खरे सुख मिळणार नाही हे ओळखले पाहिजे.

**साधक ग :** ती पुढची गोष्ट झाली. आज मला अमुक एक गोष्ट झाली, उदाहरणार्थ, मुलाला पाहिजे त्या कॉलेजात ॲडमिशन मिळाली की मी सुखी होईनसे वाटते आणि ते झाले की आणखी काही तरी नवी वासना पुढे उभी राहाते.

**साधक ब :** वासनांचे हे स्वरूप ओळखूनच त्यांच्या मागे जाता कामा नये.

**साधक ग :** पण प्रत्येक वेळी मी पुढच्या क्षणाचाच विचार करत असतो. त्यातून नव्या वासना निर्माण होणार असा विचार माझ्या मनात येत नाही. ज्याला receding horizen ची (मागे मागे सरकणाऱ्या क्षितिजाची) कल्पना आहे त्याच्या बाबतीत तुम्ही म्हणता ते ठीक आहे.

**पू. बाबा :** बरोबर आहे. सामान्य माणूस लांबचा विचार करत नाही. (साधक ब ना) तुम्ही जे म्हणत आहात त्यामधे वासनांसंबंधीचा विचार आणि विवेक अभिप्रेत आहे. पण ती पुढची गोष्ट झाली. देहबुद्धीमधे वासनांचे मूळ आहे. ही देहबुद्धी कशी जायची?

**साधक क :** ह्या वासना आणि देहबुद्धी काही एका जन्मातली नाही. अनेक जन्म तिचा सहवास आहे. आपला जन्मच वासनांमुळे होतो आणि अनेक जन्मांचे संचित संस्काररूपाने जागे होत असते.

**साधक ग :** शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे पूर्वपूर्वसंस्कार असतात.

**पू. बाबा :** होय, पण त्यातून बाहेर कसे पडायचे?

**साधक ड :** मला वाटते, सत्संगतीने आणि नामस्मरणानेच हे घडेल. आपण अपूर्ण आहोत, आपले साधन पाहिजे तसे होत नाही हे समजत असले तरी त्यांची प्रार्थना करून होईल तसे साधन करणे हाच आज तरी मार्ग दिसतो.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांना एकदा म्हटले की आम्हांला काळजी वाटते ती का वाटते ते सांगा. तेव्हां ते म्हणाले की तुम्हीच सांगा कारण मला त्याचा अनुभवच नाही तर मी काय सांगणार? ज्याला देहबुद्धी नाही त्याला काळजी नाही हा भावार्थ.

**साधक ज :** ही देहबुद्धी आपल्या प्रयत्नांनी नाहीशी करता येईल का?

**पू. बाबा :** मी करतो म्हणून काहीच होणार नाही. साधन तर नाहीच नाही. तथापि जोपर्यंत आपण देहबुद्धीत आहोत तोपर्यंत प्रयत्न केलेच पाहिजेत. देहबुद्धीच्या बाहेर कसे पडायचे यावर मी बराच विचार केला. दोन-तीन मार्गांनी हे करता येईल. वासना तृप्त करून खरे सुख मिळत नाही. एक वासना पूर्ण झाली तर लगेच दुसरी वासना पुढे येते. म्हणून वासनातृप्ती हा खऱ्या समाधानाचा मार्गच नव्हे. जसे कोठेही गेलात तरी मीठ खारटच असणार तसे देहातून पूर्ण सुख मिळणे शक्यच नाही. वासनेचे, आशेचे हे स्वरूप शंकराचार्यांनी त्यांच्या चर्पटपञ्जरिका स्तोत्रात चांगले सांगितले आहे. ते म्हणतात, "अंगं गलितं पलितं मुण्डं दशनविहीनं जातं तुण्डम्। वृद्धो याति गृहीत्वा दण्डं तदपि न मुञ्चत्याशापिण्डम्॥" वासनापूर्तीत समाधान नाही असा ठाम विचार होऊन वासनानिवृत्ती होणे म्हणजेच देहबुद्धी नाहीशी होणे हा पहिला मार्ग. हा विचाराचा आणि दृढनिश्चयाचा मार्ग आहे. ते आपल्याजवळ नाही. आपण अनुभवाने शहाणे होत नाही.

दुसरा मार्ग - मी अपूर्ण आहे. माझे कर्तेपण अपूर्ण, लंगडे आहे हे जाणून माझ्या जीवनात जे जे काही चांगले-वाईट, शुभ-अशुभ घडते ते तो (भगवंत अथवा सद्गुरु) करतो अशी दृढ श्रद्धा होऊन जीवन त्याच्यावर सोपवून देणे. हे करतांना तो जे करतो ते माझ्या अंतिम हिताचेच आहे असे खरे खरे वाटले पाहिजे. यात आज्ञापालनाला फार महत्त्व आहे. माझ्या गुरूंनी मला नाम घ्यायला सांगितले आहे ना, मग मी ते घेणार. त्यातून काय निष्पन्न होणार आहे, मला माहीत नाही.

**साधक ग :** नामस्मरणाच्या बाबतीत श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे की लोक मी सांगतो त्याच्यापेक्षा काहीतरी जास्त तरी करतात नाहीतर कमी तरी करतात. म्हणजे श्रीमहाराज सांगतात ते पूर्ण आहे अशी निष्ठा नसते.

**पू. बाबा :** म्हणूनच आज्ञापालन फार महत्त्वाचे आहे.

दुसऱ्या मार्गातून काहीसा पर्याय म्हणून तिसरा मार्ग सांगता येईल. सद्गुरूंच्या शक्तीची मला जाणीव आहे. ते कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु समर्थ आहेत. माझ्या हिताचे तेच ते करतील हे जरी खरे असले तरी आपल्याला राहावत नाही म्हणून त्यांना सांगावे की मला असे घडावेसे वाटते; तथापि तुम्ही कराल त्याच्या बाहेर मी नाही.

**साधक ब :** हा मार्ग आपल्याला जास्त योग्य वाटतो. कारण देहबुद्धी गेलेली नाही तोपर्यंत अमुक घडावे किंवा घडू नये असे वाटणारच. तथापि मनासारखे झाले नाही तरी दुश्चित होता कामा नये. सगळे काही मनावरच आहे.

**पू. बाबा :** तत्त्व म्हणून हे मान्य केले तरी पाऊल पुढे पडले पाहिजे ना!

**साधक ड :** पूर्वीच्या मानाने थोडे पुढे गेलो आहोत हे खरे असले तरी वाटते तशी प्रगती होत नाही.

**साधक क :** आपली प्रगती मोजायची पद्धतच चुकीची आहे. खरे आत्मनिरीक्षण आपण करू शकत नाही.

**साधक ग :** मला वाटते, फार थोडे करून आम्ही फार मोठी अपेक्षा ठेवतो. श्रीमहाराजांनी सांगितले आहे की अमुक दिशेने दोनशे पावले चालत गेलास की खजिना सापडेल. आम्ही पाच पावलांवरच तो सापडावा म्हणतो, नाहीतर चुकीच्या दिशेने चालत जातो.

**पू. बाबा :** या तीन मार्गांखेरीज आणखी एक चवथा मार्ग आहे. तो म्हणजे त्यांना दत्तक जायचे. हा देहच त्यांना देऊन टाकायचा. देहच त्यांचा म्हटल्यावर देहबुद्धी कोठे राहिली? पण हे देणे मोठ्या शक्तीचे काम आहे.

श्रीमहाराज म्हणत की मी दुसऱ्याचा संसार घ्यायला तयार आहे पण कोणी देतच नाही.

**साधक क** : ज्याला त्यांच्या सर्वसाक्षित्वाची आणि शक्तीची कल्पना आली तोच हे करेल. भाऊसाहेबांनी नाही का, स्वत:च्याच घरात जेवतांना मला नाही का दक्षिणा म्हणून विचारले?

**पू. बाबा** : ते म्हणण्याचे जाऊ द्या; पण मनाने तरी आता मी मुलाबाळांचा नाही, महाराजांचा आहे, आता केवळ त्यांच्यासाठीच जगायचे असे वाटले पाहिजे.

**साधक ड** : वैराग्याखेरीज हे होणार नाही.

**पू. बाबा** : पण हे केव्हां व्हायचे? आयुष्य जाते आहे, उद्याचा भरंवसा नाही. आजच हे करणे आवश्यक आहे. आता मी फक्त नामासाठी राहणार असा मनाचा निश्चय झाला पाहिजे.

**साधक ग** : सहज मनात विचार आला की नामस्मरण करतांना इतर विचार मनात येतात तसे इतर गोष्टी करतांना नामस्मरण कां होऊ नये?

**पू. बाबा** : विचार चांगला आहे. मन उलटवायचे आहे. पण ते जमले पाहिजे. आज तरी शक्य तितके जास्त नामस्मरण करत राहाणे हेच आपल्या हातात आहे.

## |२५८| (६ मार्च १९९२)

**साधक प** : आपले मन हा विश्वमनाचा भाग आहे म्हणजे विश्वमन सर्वांच्या मनांना व्यापून आहे की प्रत्येकाच्या मनात विश्वमनाचा अंश आहे?

पू. बाबा आज विशेष प्रसन्न दिसत आहेत. ते म्हणाले, ज्याला subconscious म्हणजे उपबोध म्हणतात ते प्रत्येकाचे वेगवेगळे असेल पण unconscious म्हणजे अबोध एकच आहे; आणि या अर्थाने सर्वांचा मेंदू एकच आहे. म्हणून कोठेही अभ्यास केलेला डॉक्टर जगात कोणत्याही ठिकाणी तेच नियम लावून मेंदूवर उपचार करतो. याच अर्थाने कृष्णमूर्ती The world is you म्हणतात. गुरुदेव रानडे यांनीही Mysticism is universal अध्यात्म कसे विश्वव्यापी आहे ते सांगितले आहे. Constructive survey of upanishads (उपनिषद्रहस्य) या त्यांच्या अभ्यासाप्रमाणेच ही देखील त्यांची अध्यात्मविचाराला मोठी देणगी आहे.

विज्ञानाबद्दल म्हणजे ज्याला आपण Science म्हणतो त्याबद्दल श्रीमहाराज म्हणत की जे रोज बदलते आहे त्याला सत्य कसे म्हणता येईल? पण अध्यात्मात पहा. ब्रदर लॉरेन्सला दारू खरेदी करायला जावे लागले. खरोखर, त्याबाबतीत त्याला व्यवहार कळत नव्हता; तथापि तो येशू ख्रिस्ताला बरोबर घेऊन गेला आणि त्याचा व्यवहार चोख झाला! त्याच्याप्रमाणे तुकाराम महाराजही विठ्ठलाला 'जेथें जातो तेथें तू माझा सांगाती' म्हणतात.

परमार्थासाठी एकांत आवश्यक आहे काय असा मुद्दा निघाला तेव्हां पू. बाबा म्हणाले, एकांत मिळत नाही म्हणून परमार्थ साधत नाही हे काही खरे नव्हे. एकांतात परमार्थ साधण्यापेक्षा प्रपंचात तो साधता आला पाहिजे. श्रीमहाराज हे त्याचे मूर्तिमंत उदाहरण होते. सर्वकाळ त्यांच्याभोवती माणसांचा गराडा पडलेला असे आणि वेळप्रसंगी ते शिव्याही देत असत. एकदा दिलेली शिवी परत उच्चारत नसत इतके ते भांडारही समृद्ध होते. तुकाराम महाराजांचेही असे काही परखड अभंग आहेत. खऱ्या वक्त्याला किंवा निरूपणकाराला समोरच्या श्रोत्यांची पातळी ओळखून सांगता आले पाहिजे.

आपण साधन करतो पण तरीदेखील मनासारखे साधन होते असे वाटत नाही याबद्दल विचार करतांना श्रीमहाराजांचे एक वचन लक्षात आले की विस्मरण म्हणजे भगवंताचे (किंवा गुरूंचे) नसलेपण आहे. त्यावरून लक्षात आले की स्मरण म्हणजे त्यांचे असलेपण किंवा असणेपण आहे. हे असलेपण म्हणजेच त्यांच्या अस्तित्वाची भावना. ही भावना का येत नाही आणि काही वेळा आली तरी का टिकत नाही?

यावरून प्रश्न निघाला की त्यांच्या अस्तित्वाची भावना म्हणजे नेमके काय?

**पू. बाबा :** हे अस्तित्वाचे किंवा अस्तित्व जाणवण्याचे स्वरूप प्रत्येकाच्या बाबतीत वेगवेगळे असू शकेल.

**साधक प :** आत्ता आपण सर्वजण येथे बसलेले आहोत. येथे श्रीमहाराजांचे अस्तित्व कोणत्या स्वरूपात आहे? (पू. बाबांना) तुम्हांला त्यांचे स्वरूप कसे जाणवते?

**पू. बाबा :** श्रीमहाराजांच्या अनेक गोष्टी मला एकसारख्या आठवत असतात आणि त्या आठवणींमधेच त्यांचे अस्तित्व जाणवते.

**साधक क :** आपण इतके दिवस नियमित येथे जमतो आहोत. आपल्या या एकत्र येण्यामध्येच त्यांचे अस्तित्व आहे असे मला वाटते; कारण त्याखेरीज आपण असे जमलोच नसतो.

**साधक ब :** मला असे वाटते की गेल्या पंचवीस वर्षांत श्रीमहाराजांनी माझा हात सोडलेला नाही.

**पू. बाबा :** त्यांचे हे असलेपण सतत का जाणवत नाही?

**साधक प :** आपली अस्तित्वाची भावना दृश्यावर आधारलेली आहे. त्या दृष्टीने श्रीमहाराजांचे अस्तित्व ही concept - संकल्पना आहे.

**साधक ग :** श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवायचे म्हणजे जीवनातील प्रत्येक घटनेमागे त्यांचा हात जाणवला पाहिजे आणि हे घडायला माझे नसलेपण झाले पाहिजे.

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. आपले कर्तृत्व गेल्याखेरीज, अहंकार गेल्याखेरीज घटनांच्या मागे असलेले त्यांचे अस्तित्व सदैव जाणवणार नाही. गोपी प्रथम देहभावनेने कृष्णावर प्रेम करू लागल्या आणि तो भगवंत निघाल्याने त्याने त्यांची देहबुद्धी नाहीशी केली. तसे प्रथम प्रपंच सुखाचा व्हावा म्हणून भक्त देवाकडे किंवा शिष्य गुरूकडे मागेल आणि खरा दाता तोच आहे, माझ्या कर्तृत्वाला काही अर्थ नाही अशी त्याची खात्री झाली की प्रपंचात दु:ख आले तरी ते माझ्या हिताचे आहे म्हणूनच त्याने असे केले आहे अशी निष्ठा निर्माण होईल.

**साधक ज :** सामान्यत: संसारात चांगले होते तेव्हां आपली तक्रार नसते. पण वाईट झाले की त्यांनी असे कसे केले असे आपण म्हणतो हे चुकीचे आहे. चांगले झाले किंवा मी चांगला वागलो तर त्याची प्रेरणा जशी त्यांच्याकडून येते तसे वाईट झाले किंवा माझ्या मनात वाईट विचार आला तर तीही त्यांचीच प्रेरणा आहे असे कां वाटू नये? तेथे रुखरुख लागता कामा नये.

**पू. बाबा :** ज्याने सर्व काही खरोखर गुरूंवर सोपवले, त्याच्या मनात वाईट विचार येणारच नाही.

**साधक ग :** साधक ज म्हणतात तो भाव पूर्ण शरणागतीखेरीज येणार नाही.

**साधक म :** Yes, Father yes, and always yes ! अशी तयारी झाली तर चांगले आणि वाईट किंवा त्याचे सुखदु:ख राहाणारच नाही.

**पू. बाबा :** 'अध्यात्मदर्शन' लिहितांना आदर्श संत म्हणून बहिणाबाईवर लिहिणार होतो; पण श्रीमहाराज म्हणाले तुकाराम महाराजांवर लिहा. त्यांच्यासारखा आदर्श संत नाही. एका काळी सर्व बाजूंनी चांगली स्थिती, लोकात मान आणि नंतर सर्व बाजूंनी वाईट स्थिती आणि अवहेलना त्यांना सोसावी लागली आणि अशा वाईट स्थितीतील त्यांचे साधन हा सर्वांना आदर्श आहे. त्यांनी साधन कसे केले आणि ते पूर्णत्वाला कसे पोचले याबद्दल त्यांनी

आपल्या अभंगांतून बरेच सांगितले आहे. त्याबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणाले की तयार झाल्यावर ते स्वत:कडे तिऱ्हाईतपणे (साक्षीभावाने) पाहू शकले म्हणून त्यांनी हे सांगितले; त्यांचा हा विशेष आहे.

श्रीमहाराज आज देहाने नसले तरी त्यांचे अस्तित्व आपण ज्याला down to earth म्हणतो तसे व्यवहारात जाणवले पाहिजे. भवानराव हा तसा लौकिक दृष्ट्या अडाणी माणूस होता पण श्रीमहाराजांवर त्याची दृढ निष्ठा होती. काशीला तो पिशाचाने झपाटलेल्या वाड्यात राहिला तो श्रीमहाराज माझे रक्षणकर्ते आहेत, ते सर्वत्र आहेत या निष्ठेने. पिशाचाशी कुस्ती होऊन ते उरावर बसल्यावर त्याने श्रीमहाराजांना हाक मारली आणि त्यांनी संकटातून सोडविल्यावर पुन्हा तितक्याच निर्धास्तपणे तो तेथे झोपला! (पहा श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय - के.वि. बेलसरे - प्रकरण ८, भवानरावाच्या उरावर भूत) याला म्हणायचे अस्तित्वाची खरी खात्री.

**साधक ब** : आत्तापर्यंत त्यांनी चांगल्या गोष्टी दिल्या, आता काही वाईट दिल्या तर त्याही योग्यच आहेत असे वाटले पाहिजे आणि तसे पाहिले तर कधी चांगले, कधी वाईट हा प्रपंचाचा धर्मच आहे.

**पू. बाबा** : एखादी काकडी कडू लागायचीच.

**साधक ड** : प्रसादातला कडू बदाम आपण खातो, तसे वागले पाहिजे.

**साधक ब** : खरे अस्तित्व एकच आहे. एका प्रवचनात (दि. ५ मार्च) श्रीमहाराजांनी म्हटले आहे की ''जगामध्यें सर्वस्वी खरें अस्तित्व एकच असले पाहिजे, त्यालाच आपण 'भगवंत' असें म्हणतो. भगवंत हा अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे मनुष्याचा विचार त्याच्यापर्यंत पोहोचूं शकत नाही. मानवी विचार हा शब्दमय आहे; म्हणून विचाराच्या भूमिकेवर उभे राहून भगवंताची कल्पना करायला शब्द हेच साधन आहे. याला 'नाम' असे संत म्हणतात. ज्या अंत:करणांत नाम आहे, म्हणजे ज्या अंत:करणामध्यें भगवंताबद्दल प्रेम, अस्तित्वबुद्धि, भाव, श्रद्धा आहे तिथे भगवंत विशेष प्रकट झालेला दिसून येतो. भगवंताबद्दल अस्तित्वबुद्धि असणें म्हणजे स्वत:बद्दल नास्तिक्यबुद्धि असणें होय. 'मी' आणि 'भगवंत' एका अंत:करणांत राहूं शकत नाहींत.'' मला वाटते, मी चे मरण झाल्याखेरीज balance sheet (ताळेबंद) पुरा होणार नाही.

नंतर पू. बाबांनी एका पोलीस अधिकाऱ्यास श्रीमहाराजांनी कसा अनुग्रह दिला ते सांगितले. त्यांनी पोलीस खात्यात करू नये ते सर्व केले होते त्यामुळे त्यांना श्रीमहाराजांना भेटावयाची भीती वाटत होती. त्यांनी मला आपले

पूर्वचरित्र सांगितले व म्हणाले की तुम्ही हे श्रीमहाराजांना सांगा आणि मग ते भेटा म्हणाले तर मी भेटेन. त्याप्रमाणे त्यांना बाहेर बसवून मी श्रीमहाराजांना सर्व सांगितले तेव्हा त्यांना बाहेर ऐकू जाईल अशा आवाजात श्रीमहाराज म्हणाले, त्यांना म्हणावे की 'मी तुमचे पाप घेतले, तुम्ही शुद्ध झालात'. आत्ता भेटू देत का म्हणून मी विचारल्यावर म्हणाले, नको, उद्या सकाळी भेटू देत. 'मी तुमचे पाप घेतले' हे श्रीमहाराजांच्या तोंडून ऐकल्यावर त्या अधिकाऱ्यास रडूच कोसळले. दुसरे दिवशी श्रीमहाराजांनी त्यांना अनुग्रह दिला आणि तेव्हांपासून ते स्वच्छ वागले. वाईट विचार मनात आला तरी लगेच त्यांना श्रीमहाराजांची आठवण होई. खरोखर, ज्याला सर्वकाळ महाराज पाहताहेत असे वाटेल त्याच्या हातून कुकर्म होणारच नाही. सर्वकाळ सर्व गोष्टी त्यांना सांगून करण्याचा अभ्यास केला तर त्यांच्या अस्तित्वाचा भाव जागृत राहील. श्रीमहाराजांनी सांगितले आहे - 'तुम्ही नाम घ्या, त्यात मी आहे'.

## |२५९| (१३ मार्च १९९२)

पू. बाबांच्या अंगात थोडी कसर आहे म्हणून ते आज जाकीट घालून बसले आहेत. मुद्रा प्रसन्न आहे. साधक प गेले काही दिवस आजारी आहेत; खोकल्याचाही त्रास होतो. तरीदेखील आज आले आहेत. पू. बाबांनी त्यांच्या प्रकृतीची चौकशी करून चर्चेस सुरुवात केली.

**पू. बाबा :** आपण प्रारब्ध मानणारी माणसे आहोत. प्रारब्धानुसार सगळे काही घडते असे म्हणतो. आजार यायचा असला तर येतो आणि औषधाने किंवा औषधाशिवाय, बरा व्हायचा असला तर होतो आणि बरा व्हायचा नसला तर औषधोपचार करूनही माणूस मरतो हे आपण पाहतो. प्रारब्धाचा सिद्धान्त बुद्धीला पटलेला असला तरी तो आपल्या आचरणात का येत नाही ? प्रारब्धाचा सिद्धान्त खऱ्या अर्थाने पटला तर माणसाला काळजी, भीती, तळमळ राहाणार नाही. माणूस देहाच्या सुखदु:खात गुरफटणार नाही. श्रीमहाराज म्हणत की प्रारब्धाने जे येते ते टळावे म्हणू नये आणि जे येत नाही त्याची आशा करू नये. नाम घेत राहावे. हाच तपाचा अर्थ आहे.

**साधक ज :** प्रारब्धाने सगळे काही घडते म्हटले तरी मनाचे खालीवर होणे थांबत नाही. देहाला दु:ख झाले तर मन स्थिर राहात नाही.

**साधक प :** आपले सगळे जीवन दृश्यावर आधारलेले आहे आणि प्रारब्ध हे काहीतरी सूक्ष्मातील आहे. त्यामुळे दृश्य खरे वाटते तसे प्रारब्ध खरे वाटत नाही.

**साधक ग :** साधक प म्हणतात ते बरोबर वाटते. प्रारब्ध म्हणजे आज जे घडते आहे त्याचा पूर्वी मी काहीतरी केले त्याच्याशी संबंध जोडावा लागतो. म्हणजे पूर्वजन्मी मी कर्ता होतो तसाच या जन्मीही आहे. हा कर्तेपणाचा भाव जोपर्यंत जात नाही तोपर्यंत जे घडते ते प्रारब्धानुसार घडते; त्यात माझ्या कर्तृत्वाचा संबंध नाही असे कसे वाटेल? म्हणजेच कर्तेपण गेल्याशिवाय प्रारब्धावर खरा विश्वास बसणार नाही.

**साधक क :** प्रारब्धावर विश्वास ठेवून वागायचे म्हणजे सुखदु:खापलीकडेच जायचे. आज तरी आपल्याला हे शक्य वाटत नाही. माणसाला सुख पाहिजे असते. त्यासाठी तो धडपडत असतो. तसे करतांना दु:ख निर्माण होते हेही त्याला दिसते. तथापि ते अटळ आहे, आणि जे काही सुख मिळते त्यासाठी ते सोसावे लागते. या सुखाच्या पलीकडे जे काही खरे सुख किंवा समाधान आहे त्याची गोडी चाखायला मिळाली नाही तोपर्यंत माणूस जीवनातील कर्तृत्वाच्या आणि सुखदु:खाच्या द्वंद्वातून सुटणार नाही. जर ती गोडी चाखायला मिळाली आणि सगळे काही तिकडून येते आहे असे त्याला वाटले तरच त्याचा प्रारब्धावर विश्वास बसेल.

**साधक ज :** प्रत्येकाच्या पूर्वकर्मानुसार त्याचे प्रारब्ध ठरते असे म्हणतात. पण मोठी संकटे येऊन कित्येक माणसे मरतात किंवा उपासमार होऊन हजारो माणसे मरतात तेव्हां सर्वांचे प्रारब्ध एकच असते असे मानायचे काय?

**पू. बाबा :** व्यक्तीचे जसे प्रारब्ध असते त्याप्रमाणे समाजाचे, राष्ट्राचेही प्रारब्ध असते. त्या प्रारब्धानुसार मानवसमूहाला ते भोगावे लागते.

**साधक ब :** तथापि त्यातही वेगळेपणा दिसतोच. देशाची फाळणी झाली तेव्हां काही कुटुंबे प्राणाला मुकली, काही नेसत्या वस्त्रानिशी भारतात आली तर काही आपला पैसा घेऊन आली. म्हणजे त्यात देखील वेगवेगळे हिशोब आहेत.

**साधक ग :** यालाच नियती म्हणतात.

**पू. बाबा :** बरी आठवण झाली. माझे मेहुणे डॉ. भोसेकर आर्टिलरीत डॉक्टर होते. गोवळकोंडा फोर्टमधे त्यांचे ऑफिस आणि दवाखाना होता. सुलतानपुऱ्यातून तिकडे जायला त्यांना त्रास होई. एकेकाळी गोवळकोंड्याला केवढे वैभव होते पण त्यावेळी तो ओसाड झाला होता. श्रीमहाराजांना मी हे सांगितले तेव्हां ते म्हणाले की माणसांप्रमाणे वास्तूंचे आणि नगरांचेही प्रारब्ध असते. मला वाटते की प्रारब्धावर विश्वास बसला तर साधनाला त्याची मदत होईल. हे कसे करायचे?

**साधक ड :** आज आपला प्रारब्धावर विश्वास नाही. तथापि जे काही घडते ते श्रीमहाराजांच्या इच्छेने घडते आहे. माझ्या जीवनात त्यांचे स्थान सर्वोच्च आहे अशा तऱ्हेचा अभ्यास केला तर, मला वाटते, साधनात पाऊल पुढे पडेल.

**साधक ब :** साधन वाढायला प्रेमासारखा दुसरा मार्ग नाही. आपण उपाधिरहित नाम घेऊ शकत नाही म्हणून श्रीमहाराजांनी आपल्याला उपाधीची चव लावून नाम दिले आहे. नाणेफेक केली की सामान्यत: छाप आला तर आपण जिंकतो आणि काटा आला तर हरतो; पण उपाधीसहित नाम हे असे आहे की नाणे कसेही पडले तरी जीत माझीच आहे. ह्या नामाची एक बाजू 'तू मला हवास' अशी आहे तर दुसरी बाजू 'मी तुझा आहे' अशी आहे. कोणतीही बाजू घ्या, साधन चांगलेच होईल. प्रेमामुळे मी नाहीसा होईल आणि मगच खऱ्या शरणागतीचा उदय होईल.

**साधक प :** साधनाच्या उपाधींमध्ये देहाची उपाधी फार मोठी आहे. सध्या मी आजारी आहे. पूर्वीसारखे नामस्मरण होत नाही; कारण नामस्मरण करतांना त्याला देहाची साथ असते. साधन अद्यापि देहाच्या पलीकडे गेलेले नसल्यामुळे अडचण येते. साधन देहाच्या (स्थितीच्या) पलीकडे गेले पाहिजे.

**साधक ब :** मलाही श्वास लागत होता तेव्हां नाम घेतांना त्रास होई; आणि श्रीमहाराजांनी म्हटले आहे की नामाचा आणि श्वासाचा काही संबंध नाही.

**पू. बाबा :** प्रारब्धाची गती देहापर्यंत आहे. साधनाचा त्याच्याशी काही संबंध नाही. म्हणून प्रारब्धावर विश्वास बसला तर माणूस देहाला औषधपाणी करील आणि नाम घेत राहील.

**साधक ग :** एका वृद्ध गृहस्थांना लिहिलेल्या पत्रात श्रीमहाराजांनी म्हटले आहे की, म्हातारपणामुळे आता देह साधनाला साथ देत नाही म्हणता, तथापि 'उपाधिवेगळे झाला। ऐसें ऐकूं द्यावें मला।' याचा हा अर्थ असला पाहिजे.

**पू. बाबा :** पण मग प्रारब्धावर विश्वास बसण्यात अडचण काय येते ? नाथांनी म्हटले आहे की 'जैसी स्थिती आहे तैशापरी राहे। कौतुक तूं पाहे संचिताचें॥'

**साधक ग :** कौतुक पहा म्हटले आहे. स्वत:कडे साक्षीभावाने पाहाता आले तरच ते कौतुक वाटेल. म्हणजे घडणाऱ्या घटनांचे सुखदु:ख बाधणार नाही. तथापि आपण प्रारब्ध म्हणतो तेव्हां पुनर्जन्म मानतो. पुनर्जन्म आणि प्रारब्ध आहे असे मी म्हणतो कारण तसे मी वाचलेले आणि ऐकलेले आहे. पण खरे म्हणजे ते अनुमानावर आधारलेले आहे. त्यामुळे आज मी सत्य आहे तसे ते सत्य वाटत नाही.

**पू. बाबा** : तुमच्या म्हणण्यात तथ्य आहे. प्रारब्ध दिसत नाही, ते केवळ अनुमान वाटते.

**साधक प** : तथापि अनुमानाच्या पुष्कळ गोष्टी आपण खऱ्या मानतो. उदाहरणार्थ, ॲटम बॉम्बची रचना मला माहीत नाही, मला तो करता येणार नाही. तरीदेखील त्याचे सत्यत्व शास्त्रज्ञ सांगतात म्हणून मी मान्य करतो.

**साधक ग** : पहिले म्हणजे हे अनुमान नव्हे. हे शास्त्रवाक्य किंवा आप्तवाक्य म्हणून मला मान्य होते. दुसरे असे की हे दृश्यातील वस्तूंबाबत खरे आहे. शास्त्रज्ञ सांगतात ते मी मान्य करतो पण जे माझे खरे हितकर्ते आहेत त्या गुरूंनी 'मी नामात आहे' म्हणून सांगितले आहे ते मला खरे वाटत नाही!

**साधक प** : हे बरोबर आहे. आपले खरेपण दृश्यातले आहे. जे दृश्यात नाही त्याच्या खरेपणाची आपल्याला जाणीव नाही.

**पू. बाबा** : हा मुद्दा बरोबर आहे. प्रारब्ध, नाम इत्यादींचे आणि देहात्मक बुद्धीचे dimensions (आयाम) वेगळे आहेत. त्यामुळे देहबुद्धी सुटल्याखेरीज प्रारब्धाच्या dimension मधे (आयामात) जाता येणार नाही. ही देहबुद्धी कशी जायची?

**साधक ब** : मी म्हटले तसे प्रेम हाच एक मार्ग आहे. त्याखेरीज त्यांची कृपा होणार नाही. मी घालवतो म्हणून देहबुद्धी जाणार नाही. मी घालवतो म्हणणे हाच देहबुद्धीचा धर्म आहे.

**साधक प** : प्रारब्धावर विश्वास बसणे कठीण जाते. त्यापेक्षा जे घडते ते राम इच्छेने किंवा श्रीमहाराजांच्या इच्छेने घडते असे म्हटले तर जास्त सोपे जाईल. ते माझ्या हिताचेच करतात हा भाव आला की दु:ख राहिले तरी त्याची जाणीव राहाणार नाही. जाणीव राहिली नाही की दु:ख राहिले म्हणून कोठे बिघडले?

**साधक ग** : राम इच्छा हा मंत्र जास्त उपयोगी आहे कारण प्रारब्ध हा सिद्धान्त आहे तर राम इच्छा हा सत्पुरुषांचा अनुभव आहे.

**साधक ब** : अर्थातच अनुभवाचे महत्त्व जास्त आहे.

**साधक ड** : आता जे काही करायचे ते केवळ श्रीमहाराजांसाठी करावेसे वाटते.

**पू. बाबा** : ज्यांचा वानप्रस्थ आश्रम चालू झाला त्यांना हे ठीक आहे. मार्ग असा हवा की त्याचे सर्वांना अनुकरण करता येईल. प्रत्येक गोष्ट महाराजांना सांगून, दाखवून करावी. अन्न घ्यायचे ते देखील त्यांना नैवेद्य दाखवून मग घ्यावे.

**साधक ग :** नैवेद्य दाखवायची आपली पद्धतही फार चांगली आहे. देवापुढे किंवा गुरूंपुढे ठेवतांना तो नैवेद्य असतो आणि नंतर तो प्रसाद होतो.

**साधक ब :** नैवेद्याचा विषय निघाला म्हणून विचारतो. श्रीमहाराजांच्या नैवेद्यात कांदा, लसूण असू नये ना?

**पू. बाबा :** आपण नेहमी जे खातो त्याचा नैवेद्य दाखवावा. एखादे दिवशी लसूण, कांदा असला तरी चालेल. मात्र मुद्दाम रोज कांदा वगैरे घालून करू नये म्हणजे झाले. मुख्य गोष्ट, काहीही करतांना त्यांची आठवण ठेवणे ही आहे. त्याकरता, प्रेम वाढवायकरता हे सगळे उपचार आहेत. तो भाव जागा ठेवावा; नाहीतर ते कर्मकांड होते.

## |२६०| (२० मार्च १९९२)

**पू. बाबा :** प्रपंचाप्रमाणे परमार्थातही पाहण्याला फार महत्त्व आहे. आपण म्हणतो, मी स्वत: 'पाहिले' आहे. म्हणजे शंभर टक्के विश्वासार्ह. मुलीचे लग्न करायचे आहे, तिच्यासाठी मुलगा 'पाहिला' आहे, इत्यादी. देव 'दिसावा' म्हणतो. दिसणे आणि पाहणे सतत चालू आहे. समर्थांनीही एका पदात 'देव पाहिला रे, देव पाहिला रे' म्हटले आहे. श्रीमहाराज एकदा म्हणाले की जो भगवंताच्या मार्गाला लागला तो देव पाहायला मिळू दे म्हणेल, देवासंबंधीच ऐकेल, नाहीतर देवासंबंधीच बोलत राहील. श्रीमहाराजांनी हे म्हटल्यावर मला आठवले की गीतेच्या दुसऱ्या अध्यायातही "आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद् वदति तथैव चान्य:। आश्चर्यवत् चैनमन्य: शृणोति श्रुत्वाऽप्येनं वेद न-चैव कश्चित्॥ २.२९॥" असे म्हटले आहे. कोणी याला आश्चर्याने पाहात राहातात, तर दुसरे कोणी आश्चर्याने याच्यासंबंधी बोलत राहातात, आणखी दुसरे कोणी सतत याच्यासंबंधी आश्चर्याने गुणगान ऐकत राहातात. श्रीमहाराज म्हणाले की जो भगवंताचा (नामाचा) झाला तो एकतर सतत त्याच्यासंबंधी बोलत राहील, नाहीतर मौन धारण करील. ऐकण्याची गोडीही अवीट असते. कितीही ऐकले तरी तृप्ती होत नाही. आपली स्तुती ऐकून कधी कोणी तृप्त होते का? किती बरे वाटते आतून!

**साधक ब :** मी अशी स्तुती करून घेणारे एक आमच्याच नात्यातले डॉक्टर पाहिलेले आहेत. तथापि भगवंताचे गुणगान पुन:पुन्हा ऐकावेसे वाटतेच.

**साधक ड :** आज पाहाण्याची किंवा बोलण्याची आमची लायकी नाही, म्हणून ऐकत राहावेसे वाटते. कितीही ऐकले तरी समाधान होत नाही. या ऐकण्यातच सत्संग आहे.

**पू. बाबा :** फार ऐकणेही चांगले नाही. नुसते ऐकून काय उपयोग? तसेच कोणाचे आणि काय ऐकायचे याचाही विवेक पाहिजे; असो. गीतेत भगवान म्हणतात की माझ्यासंबंधी बोलणारे, ऐकणारे आणि पाहाणारे जरी झाले तरी खरा मी कसा आहे ते त्यांच्यापैकी कोणालाच पूर्णपणे कळत नाही. याचे कारण हे सर्व अनुभव इंद्रियांवर आधारलेले आहेत. ज्याची देहबुद्धी पूर्ण गेली आहे त्यालाच देहापलीकडे असलेल्या भगवंताचे ज्ञान होईल. भगवंताच्या प्राप्तीची तळमळ लागली की साधकाची काय अवस्था होते ते ज्ञानेश्वर महाराजांनी फार छान सांगितले आहे. ते म्हणतात : "जयाची आर्तीचि भोगित। विषयीं त्यजिले संत। जयालागीं विरक्त। वनवासिये॥ २.१७०॥ दिठी सूनि जयातें। ब्रह्मचर्यादि व्रतें। मुनीश्वर तपातें। आचरताती॥ १७१॥ एक अंतरीं निश्चळ। जें निहाळितां केवळ। विसरले सकळ। संसारजात॥ १७२॥ एकां गुणानुवादु करितां। उपरति होऊनि चित्ता। निरवधि तल्लीनता। निरंतर॥ १७३॥ एक ऐकताचि निवाले। ते देहभावीं सांडिलें। एक अनुभवें पातलें। तद्रूपता॥ १७४॥ जैसे सरिताओघ समस्त। समुद्रामाजिं मिळत। परि माघौते न समात। परतले नाहीं॥ १७५॥ तैसिया योगीश्वरांचिया मती। मिळणीसवें एकवटती। परी जे विचारूनि पुनरावृत्ति। भजतीचिना॥ २.१७६॥"

जे संत भगवंतासाठी आर्त होऊन विरक्त होतात त्यांच्याविषयी ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. म्हणजे आर्तता किंवा तळमळ ही पहिली अट - पूर्वअट - precondition आहे. ही आर्तता का येत नाही?

**साधक प :** आपले जीवन दृश्यात आहे. त्याच्या पलीकडच्या जीवनाची आपल्याला ओळख नाही. त्यामुळे दृश्यातील गोष्टींचीच ओढ वाटते.

**पू. बाबा :** दृश्यापलीकडची कल्पना नाही असे म्हणता येणार नाही. आपण एखाद्या विचारात रंगून जातो तसे नामात रंगत नाही.

**साधक ग :** विचारात रंगतो कारण बरेचसे विचार दृश्याला धरून असतात आणि विचारात विविधता असते. याच्या उलट नामात एक वृत्ती राहावी लागते.

**पू. बाबा :** ह्या म्हणण्यात तथ्य दिसते.

**साधक प :** I dispute this point. आपण नाम घेतो तेव्हा प्रत्येक नाम नवे असते. त्यात तोच तो पणा नसतो.

**साधक ग :** तथापि त्यासाठी वृत्ती एकच असावी लागते.

**पू. बाबा :** विचाराने आता आपल्याला हे समजले आहे की नाम आणि भगवंत एकच आहेत. पण हे आचरणात का येत नाही? यासाठीच, मला

वाटते, सत्संगती फार प्रभावी ठरते; पण ती कायम कोठून आणणार? श्रीमहाराज म्हणत की विचारांची संगत हा ज्ञानमार्ग आहे. तो शक्य नसेल तर विचारांपेक्षा संतांची किंवा नामाची संगत ठेवावी. नामाची संगत ठेवता आली तर त्यात बाकीच्या दोन्ही येतात, कारण नाम हा सद्विचार आहे आणि नाम आणि भगवंत एकच असल्यामुळे नामाची संगत झाली की त्यात सत्संगती येते. भगवंत आहे तेथे संत असतातच. आपल्याला हे का जमत नाही?

**साधक प** : विचाराने समजले म्हणजे ते मेंदूपर्यंत गेले आहे पण अद्यापि ते हृदयात उतरलेले नाही.

**साधक ग** : विचार म्हणजे आपल्याला नेमके काय म्हणायचे आहे? जो आचरणात येत नाही तो विचार माझा विचार म्हणता येईल का? म्हणजे असे की आपण नामाबद्दल पुष्कळ वाचलेले, ऐकलेले आहे. तथापि अद्यापि ते आत्मसात झालेले नाही. त्यामुळे ते आचरणात येत नाही.

**पू. बाबा** : विचारांना भावनेची जोड पाहिजे. ती भावना कशी निर्माण करायची?

**साधक ज** : मला वाटते, भावनेपेक्षा देखील विचारालाच महत्त्व द्यावे. विचार आणि भावना यांची गल्लत करू नये.

**पू. बाबा** : असे म्हणता येणार नाही. अगदी ज्ञानमार्गी झाला तरी त्याच्या ठिकाणी भावना असते. कृष्णप्रेम जवळची श्रीकृष्णाची मूर्ती पाहून रमणमहर्षींच्या डोळ्यातही पाणी आले. आपल्याजवळ भावना नाही असे नाही. आज ती भगवंताला न चिकटता प्रपंचाला चिकटलेली आहे. यालाच प्रपंचाची आसक्ती म्हणतात. ही आसक्ती प्रपंचातून भगवंताकडे कशी वळवावयाची? आपण 'माता रामो मत्पिता रामचंद्रः' असे म्हणतो पण तसा भाव झाला पाहिजे.

**साधक क** : आपण एक भूमिका धरून राहात नाही. प्रत्येक वेळी ती बदलत असतो; आणि त्या त्या भूमिकेला अनुरूप अशी साधुसंतांची आणि श्रीमहाराजांची वचनेही मिळतात. एकदा आपण म्हणतो की विचाराने ध्येय निश्चित करून विचाराच्या मार्गाने गेले पाहिजे; भावनाविवश होता कामा नये. इतकेच नव्हे, तर लहानपणापासून भावना दिसू देणे हा कमकुवतपणा आहे अशी शिकवण मिळालेली आहे.

**साधक ब** : भाव आणि भावना यात फरक आहे. भावनेच्या आधीन होऊ नये पण भाव आवश्यक आहे. 'माता रामो मत्पिता रामचंद्रः' म्हणतांना खरोखर

तो माझा मायबाप आहे, स्वामी आहे, सखा आहे असा भाव निर्माण झाला तर निश्चितच त्याचा सहवास राहील आणि साधन चांगले होईल.

**पू. बाबा** : प्रपंचात आपण प्रेम करतो, ते प्रपंचातून काढून भगवंताकडे वळवावे.

**साधक क** : श्रीमहाराजांनीच प्रवचनात सांगितले आहे की जगावर प्रेम करायची सुरुवात आपल्या घरातूनच करावी. मुलाबाळांवर, मग शेजाऱ्यांवर प्रेम करावे, इत्यादी.

**पू. बाबा** : प्रेम आणि आसक्ती यात फरक आहे. मुलाबाळांबद्दल, प्रपंचाबद्दल आपल्याला बरेचदा प्रेम नसून आसक्ती असते. खरे प्रेम नि:स्वार्थी असते. तसे प्रेम आपण करतो का? प्रत्येकाने विचार करावा म्हणजे नामाच्या आड काय येते ते समजेल.

**साधक ग** : खरोखर ते समजणे सोपे आहे. नाम घ्यायला बसले की कोणते विचार आपल्या मनात येतात ते पहावे. तेथे आपण गुंतलेले असतो.

**साधक प** : मनात येणारे सगळेच विचार गुंतण्यासारखे महत्त्वाचे असतात असे नाही. तथापि नामस्मरणाच्या वेळी मात्र ते अडथळा आणतात.

**साधक ब** : साधक ग म्हणतात ते खरे आहे. साधक प म्हणतात त्याप्रमाणे काही क्षुद्र विचार त्रास देतात पण ते बाजूला सारणे किंवा गोठवणे (फ्रिज करणे) शक्य असते. पण जेथे आपण गुंतलेले आहोत त्यासंबंधीचे विचार सहजासहजी हार मानत नाहीत. नाम घेतांना आपल्या मनात येणाऱ्या विचारांचे निरीक्षण केले की विचारानेच ते दूर करता येतील.

**साधक क** : प्रपंचाची आसक्ती नाहीशी झाल्याखेरीज ते प्रेम भगवंताकडे कसे वळविता येईल?

**साधक ब** : त्यासाठी, मला वाटते, प्रार्थनेचा उपयोग होईल. मी प्रपंचात चिकटलो आहे त्यातून मला बाहेर काढा अशी प्रार्थना करावी.

**पू. बाबा** : असे केले तर साधेल की प्रपंचात काही झटका बसला की माणूस भगवंताकडे वळेल? गुरुदेव रानड्यांना ते शिकत असतांनाच मेंदूचा क्षय झाला आणि मरायसाठी म्हणूनच ते त्यांच्या गुरूंकडे गेले होते. त्यावेळी त्यांनी निश्चय केला होता की आपले उरलेले जीवन अध्यात्मासाठी आहे, प्रपंचासाठी नाही आणि ते तसे वागले. तेव्हां विचाराने एखादी गोष्ट समजली तरी त्याप्रमाणे वागण्यासाठी भावनेचा driving force (प्रेरक शक्ती) पाहिजे. भावना वाढली पाहिजे. आज माणसाच्या मेंदूची-बुद्धीची वाढ झाली आहे. ही भावना कशी आणायची?

चर्चा चालू असतांनाच श्री. दत्ताण्णा इनामदार आले. पू. बाबांनी त्यांना चर्चेचा गोषवारा सांगितला आणि म्हणाले, आता यावर तुम्ही उपाय सुचवा.

श्री. दत्ताण्णा काही वेळ गप्प बसले; नंतर म्हणाले की दृश्यात प्रेम वाटणे सोपे आहे. श्रीमहाराज सूक्ष्मात आहेत त्यामुळे त्यांचे प्रेम येणे कठीण जाते. आपल्याला संसाराबद्दल प्रेम नसून मोह आहे. वास्तविक संसारातील बरेचसे संबंध कल्पनेवर आधारलेले आहेत. उदाहरणार्थ, हा माझा मित्र, ही माझी बायको इत्यादी. त्यांच्या बाबतीत काही कारणाने प्रेमाची भावना जाऊन द्वेषाची भावना आली की तेच शत्रू होतात. आपण प्रपंचातले कर्तव्य म्हणतो तेव्हां खरे तर तो मोहच असतो. बेळगावला एका गृहस्थांना मी म्हणालो की बायको मुलांकडे लक्ष देणे हे कर्तव्य वाटत असले तर बायको मेली तर एका कर्तव्यातून मुक्त झालो म्हणून आनंद झाला पाहिजे! तसे होत नाही कारण तेथे मोह, आसक्ती आहे. कर्तुं योग्यम्, कर्तव्यम्. भगवंत प्राप्त करून घेणे हेच माणसाचे कर्तव्य आहे. बाकी सगळी फसवणूक आहे. भगवंताचे प्रेम यावयाला अनुसंधान हाच मार्ग आहे. सतत त्याचे नाम, त्याचे चिंतन, गुण श्रवण करीत राहिले पाहिजे.

**साधक ग :** सगुण उपासनेचे हेच महत्त्व आहे. दैनंदिन जीवनातली प्रत्येक गोष्ट भगवंताशी जोडायची.

**साधक ब :** ते डोळसपणे केले पाहिजे. कर्मकांड होऊ नये. काही वेळा त्यात हृदय असणार नाही. पण हळू हळू तो भाव वाढेल आणि संसाराच्या वासना क्षीण होतील.

## **।२६१।** (२७ मार्च १९९२)

आज पू. तात्यासाहेब केतकरांची पंचविसावी पुण्यतिथी. त्यासाठी पुणे, नागपूर इत्यादी ठिकाणांहून बरीच माणसे आली आहेत. दि. ३१ अखेर कार्यक्रम आहेत. आज आमच्या चर्चेच्या वेळी श्री. तात्या व सौ. सुलभाताई पाटणकर उपस्थित होते.

**पू. बाबा :** नुकतेच माझ्याकडे पुण्याच्या माधवनाथांकडून कोकणातले एक गृहस्थ आले होते. त्यांनी स्वामी स्वरूपानंदांकडून अनुग्रह घेतला होता. ते म्हणाले की त्यांनी स्वत: स्वामींच्या छातीला कान लावून आत चालणारा सोऽहम् जप ऐकला होता. ते स्वत: रोज आठ-दहा हजार जप करतात. ते म्हणाले रोज इतका जप करतो पण अजून जपाचे प्रेम येत नाही. अद्यापि ते

जपात रंगत नाहीत. त्यांनी विचारले की असे का होते? मी त्यांना सांगितले की अजूनही आपले दृश्याचे प्रेम जात नाही त्यामुळे असे होते. दृश्याचे प्रेम देहबुद्धीतून आलेले आहे. म्हणून देहबुद्धी गेल्यावरच नामाचे प्रेम येईल. तुम्ही सांगा की ही देहबुद्धी कशी घालवावयाची!

**साधक प** : माझे आजचे अस्तित्व देहबुद्धीवरच आधारलेले आहे. त्याच्या पलीकडचे जगणे मला माहीत नाही. नाम घेतांना क्वचित रंगण्याची झाक येते पण ते आपल्या हातात नसते. विचाराने देहबुद्धी कमी झाली पाहिजे. खरे सुख देहापलीकडे आहे हे समजलेले असले तरी ते हृदयात उतरलेले नाही.

**पू. बाबा** : पण तसे म्हणावे तर आपण रोज नाम घेतो. प्रपंचातही तशी ओढ राहिलेली नाही. नामस्मरण चांगले व्हावेसे वाटते पण होत नाही. काहीतरी अडते आहे. खरे valuation होत नाही, पैसा, घर, मुलेमाणसे इत्यादींमधे अजून गुंतलेले आहोत.

**साधक ड** : तथापि या गोष्टींचीही पूर्वीसारखी किंमत राहिलेली नाही. श्रीमहाराजच सर्व काही करतात असे वाटू लागले आहे. या वाटण्यातूनच तळमळ निर्माण होईलसे वाटते.

**साधक ग** : खरे म्हणजे, रोज पंधरा मिनिटे अभ्यास करून परीक्षेत डिस्टिंक्शन मिळावे अशी अपेक्षा करण्यासारखे आमचे चालले आहे.

**साधक प** : हवे-नकोपण त्रास देते. ते गेले पाहिजे.

**साधक ड** : तोच सर्व वासनांचा पुंज आहे.

**पू. बाबा** : (साधक प ना) तुम्ही मागे म्हणालात ते खरे आहे. कर्तृत्वापेक्षाही भोक्तृत्व त्रास देते.

**साधक प** : तान्ह्या मुलाला मधाचे बोट चाखवले की त्याला त्याची गोडी लागते. तेथे त्याचे कर्तृत्व काहीच नसते. तथापि आणखी मिळावेसे वाटू लागते.

**साधक ब** : नामाच्या बाबतीत त्याने असे मधाचे बोट चाखवावे, म्हणजे नाम आणखी घ्यावे आणखी घ्यावे असे वाटू लागेल.

**पू. बाबा** : नाम घेतांना ते पवित्र आहे, शक्तिमय आहे असे आपल्याला वाटते का? नामाच्या शक्तीचा आपल्याला अनुभव आहे का?

**साधक प** : क्वचित असा अनुभव येतो. एकदा घरी मी जप करीत बसलो असतांना बाथरूममधला नळ ठिबकत होता. वाटले की उठून नळ बंद करून यावे. पण मग वाटले की जपामुळे इंद्रियांवर ताबा का येऊ नये? माझे कान

बंद झाले पाहिजेत. आणि नंतर लक्ष देऊनही मला तो आवाज ऐकू येईना. सुमारे दहा मिनिटांनी पुन्हा ऐकू येऊ लागला. मग मात्र पुन्हा तो थांबवता आला नाही. मग उठून नळ नीट बंद करावा लागला. माझा हा अनुभव हा नामाच्या शक्तीचाच अनुभव आहे. ही शक्ती वाढली की नामात मन रंगू लागेल. पण शक्ती वाढायच्या ऐवजी आपल्या नकळत ती वाहून जाते. अमुक व्हावे किंवा होऊ नये असा आपण संकल्प करतो आणि तसे घडते तेव्हां ही शक्ती खर्च होते; पण ते आपल्या लक्षात येत नाही.

**पू. बाबा** : या शक्तीचा संचय होण्यासाठी गीतेच्या सहाव्या अध्यायात ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे बुद्धीमध्ये विरक्तीचा गर्भ राहिला पाहिजे. (तेथ ऐसेंचि एक विचारिलें। जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले। परि उदरा वैराग्य आहे आलें। बुद्धीचिया॥६.१४८॥) ही मनाची विरक्ती आहे. बाहेरून माणूस चारचौघांसारखा दिसेल, वागेल पण आत जाणून असेल की हे खरे नाही. तथापि सुरुवातीला काही काळ तरी त्याचा व्यवहार चुकेल का?

**साधक ब** : काही काळ तसे होईल. प्रपंचाचे फुसकेपण लक्षात आल्यामुळे चारचौघांसमोर खरेपणाचे नाटक करू लागला तरी ते लोकांच्या लक्षात येईल. ते समोर किंवा मागे टीका करतील. पण ते सगळे सोसायची तयारी पाहिजे.

**पू. बाबा** : आमच्या घरातली सगळी माणसे इथे आहेत, पण मी विचारतो की मृत्यूनंतर पुढच्या जन्मी मी पुन्हा यांच्यातच येईन ही खात्री आहे का? माझ्या कर्मगतीप्रमाणे मी पुढे जाणार. आणि तरीदेखील किती चिकटलेले असतो आपण! आता आपण सगळेच त्या रांगेत आहोत. तेव्हां हे ओळखून यातून बाहेर पडायला पाहिजे. It is high time now!

**साधक प** : नामाच्या शक्तीची जाणीव व्हायला सुरुवातीला पाहिजे तर प्रयोग करून पहावे. काय हरकत आहे? लहान सहान इच्छा पुऱ्या होतात हे लक्षात आल्यावर मात्र त्याच्यामागे जाता कामा नये.

**पू. बाबा** : नामाजवळच नामाचे प्रेम मागावे. महाराज आणि नाम काही वेगळे नाहीत. म्हणून त्यांची प्रार्थना करावी आणि म्हणावे आता मला नामाचे प्रेम द्या.

## ।२६२। (३ एप्रिल १९९२)

दि. ४ एप्रिल ते शनिवार दि. ११ एप्रिल अखेर थोरल्या राम मंदिरास शंभर वर्षे पूर्ण झाली म्हणून उत्सव झाला. दि. ११ ला रामनवमी होती. नंतर दि. १२

एप्रिल ते १६ एप्रिल अखेर नाम साधन अभ्यास शिबीर झाले. दि. ३ ते १६ अखेर पू. बाबांचा गोंदवल्यास मुक्काम होता.

सकाळी पू. बाबांच्याकडे गेलो होतो तेव्हां त्यांनी एक गोष्ट सांगितली. एक नवरा-बायको राजस्थान जोधपूर रेल्वे मार्गाने प्रवास करीत होते. गाडीत त्यांच्या समोर एक गरीब माणूस बसलेला होता. तास-दीड तास तो तोंडाने काही पुटपुटत होता. न राहवून त्यांनी त्या माणसाला तू काय म्हणतो आहेस असे विचारले. प्रथम तो काही नाही म्हणाला पण मग बाईच्या गळ्यात जपमाळ पाहिल्यावर म्हणाला की माझ्या गुरूंनी मंत्र दिला आहे त्याचा जप करतो. बाईने विचारले तू कोणत्या देवतेचा जप करतोस? तो म्हणाला, रामाचा जप. काही अनुभव आला का म्हणून विचारल्यावर म्हणाला की जप करायला लागलो त्यानंतरच्या काळात प्रपंचाची वाताहत झाली. मुलगा वारला, शेत जळाले पण इतके सगळे होऊनही मी आत शांत आहे. पू. बाबा म्हणाले, तो पुढे म्हणाला ते महत्त्वाचे आहे. तो म्हणाला मी नियमित जप करतो. पण जप कमी होऊ लागला की आतून सांगितले जाते की अरे, जप कर; जप कमी झाला आहे, जप कर. हे गुरूंचे अंतर्यामित्व. जप कर अशी तेच आतून सूचना करतात. कारण त्याचा जप कमी झाला तर त्यांना आत राहावयास कष्ट होतात. नाम हाच त्यांचा प्राण आहे.

पू. बाबा म्हणाले, देह निर्माल्यासारखा गुरूंच्या पायावर पडून राहिला पाहिजे. सत्पुरुषांच्या जवळ कितीही राहिले तरी कंटाळा येत नाही. आनंद वाटतो, आणि सत्पुरुष तर नेहमी नामातच असतात. नाम हा त्यांचा प्राणच आहे. म्हणून नामात आनंद असलाच पाहिजे. स्फुलिंगासारखे प्रत्येक नाम नवीन असते. नाम शक्तिरूप आहे. जेथे सगळीकडून नाम स्फुरत असेल तेथे माझी सीता आहे अशी खूण श्रीरामांनी मारुतीला सांगितली होती. श्रीखंड खातांना प्रत्येक घासाला त्याची चव घेतो अणि तृप्ती होईपर्यंत प्रत्येक घासाला चव वेगळी लागते तसे प्रत्येक नाम घेतांना नवीन वाटले पाहिजे. तथापि एक फरक आहे. नामाला तृप्ती नाही. पण काय करावे? We are not serious about it !

येथे गोंदवल्याला येण्यात गैरसोय होणारच. पण खरी परीक्षा दारिद्र्यात आणि देहःदुखात होते. देहाला जरा गैरसोय झाली की बिघडले! ते होता कामा नये. देह निर्माल्यासारखा वाटला पाहिजे.

संध्याकाळी पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हां ते म्हणाले की झऱ्यातून जसे नित्य नवे पाणी वर येत असते तसे नित्य नवीन उमलणारे नाम पाहिजे. ज्ञानी

माणूस भजन करू लागला तर आनंद उसळतो, तथापि त्याच वेळी आत्मस्वरूप शांत असते. आपण क्षुद्र पातळी सोडून मन विशाल केले, वरच्या पातळीवर नेले की आपल्या नामस्मरणातही आनंद उसळू लागेल. पण यासाठी आपण सावध राहिले पाहिजे. आपले गुरु किंवा भगवंत आपले कधीही अनहित करत नाहीत असा दृढ विश्वास पाहिजे, रघुवंशात सीतात्यागाचे कालिदासाने बहारदार वर्णन केले आहे. लक्ष्मणाने जेव्हां श्रीरामांनी तिचा त्याग केल्याचे तिला सांगितले तेव्हां ती रागावली. हे तुझ्या कुळाला शोभते का म्हणाली. पण पुढच्याच क्षणी म्हणाली की माझ्या कल्याणाचे असेल म्हणूनच त्यांनी माझा त्याग केला. ''कल्याणबुद्धेरथवा तवायं न कामचारो मयि शंकनीय:।'' श्रीब्रह्मानंद महाराजांनीही म्हटले आहे की ''महाराजांसमान नाही त्रिभूवनीं। आनंदाची खाणी गुरूराव॥ १॥ गुरूराव माझे रामची केवळ। वासनेचें मूळ दूर केलें॥ २॥

## |२६३| (९ एप्रिल १९९२)

**पू. बाबा** : आज आपल्याला नामाची Truth value आहे पण Reality value नाही, मनाला भावनेने स्पर्श झाला तरच ही Reality value निर्माण होईल. उदाहरणार्थ, एखाद्या माणसाला अपघात झाल्याचे समजले तर त्या समजण्याला Truth value आहे पण ज्याला अपघात झाला तो आपलाच मुलगा आहे असे समजले की जे जाणवेल त्याला Reality value आहे. भावनेशिवाय (feeling शिवाय) ती येऊच शकत नाही. तो dimensional change (आयामातील बदल) आहे. त्यात भावनेचा खरा स्पर्श आहे.

अध्यात्म करावयाचे ते शुद्धच पाहिजे. त्यात सामाजिक कार्याची भेसळ असता कामा नये.

मनाला भावनेने स्पर्श करता येतो. स्पर्श करण्याचे तीन मार्ग आहेत. १) तळमळ म्हणजेच तीव्र झालेली भावना मनाला स्पर्श करू शकते. २) आपलेपणामुळे हे घडू शकते. अपघात झालेला माणूस हा माझा मुलगा आहे हे समजले की घटनेचे एकूण dimension च बदलते. ३) मनाचे तीन स्तर किंवा पातळ्या आहेत.

१) रिकामे मन - Vacant mind.

२) निवांत मन - Silent mind.

३) विश्वमन - Cosmic mind.

या तीन पायऱ्यांनी मनाची पातळी वर नेता येते. सत्पुरुषांचे अस्तित्व विश्वमनात असते. तेथपर्यंत जाता आले पाहिजे. ते जमले तरच सत्पुरुषांची भेट होईल. या करिता न कंटाळता मन सूक्ष्म करण्याचा अभ्यास केला पाहिजे. असे केले तरच नामाची सत्यता (Reality) जाणवेल.

## |२६४| (११ एप्रिल १९९२)

आज रामनवमी, सकाळी थोरल्या राम मंदिरासमोर झालेल्या निरूपणात पू. बाबा म्हणाले की आपण रामाच्या हातातले खेळणे झाले पाहिजे. तू ठेवशील तसा, नेशील तिथे तुझ्या इच्छेप्रमाणे कोणतीही तक्रार न करता राहीन.

श्रीमहाराज म्हणाले की श्रीसमर्थ प्रपंच खेळासारखा खेळले तर मी भातुकलीच्या खेळासारखा प्रपंच केला. भातुकलीच्या खेळात एका बोळक्यातूनच श्रीखंड किंवा कोणताही खाण्याचा पदार्थ तुम्हांला मिळतो. दागिने पाहिजे असले तर तेही त्याच बोळक्यातून मिळतात. श्रीमहाराज असे वागले. आपणही माझा प्रपंच त्यांचा (श्रीमहाराजांचा) आहे म्हणून करावा. हे करता आले म्हणजे प्रपंचात आपली जी स्थिती असेल ती त्यांच्या मर्जीने आहे असे खरेखरे वाटेल.

स्वामी रामतीर्थ म्हणत असत

राजी है हम उसीमें जिसमें तेरी रजा है।<br>
या यूँ भी वाहवा है और वो भी वाहवा है।।

## |२६५| (२४ एप्रिल १९९२)

**पू. बाबा :** एकनाथ महाराजांचे चतुश्लोकी भागवत, हस्तामलक, स्वात्मसुख, शुकाष्टक इत्यादी काही प्रकरण ग्रंथ (Minor Works) आहेत. त्यांपैकी चतुश्लोकी भागवत हा मराठी भाषेत लिहिलेला त्यांचा पहिला ग्रंथ. भागवताच्या दुसऱ्या स्कंधातील नवव्या अध्यायात ४५ श्लोक आहेत. त्यावर नाथांनी १०३६ ओव्या लिहिल्या आहेत. अध्यायातील ३२ ते ३५ हे चार श्लोक चतुश्लोकी भागवत म्हणून ओळखले जातात. हा ग्रंथ कसा लिहिला गेला ते नाथांनी सांगितले आहे. आधी त्याची पार्श्वभूमी सांगतो. नाथ आणि त्यांचे गुरु जनार्दन स्वामी गोदावरी नदीच्या उत्तर तीरावर चंद्रगिरी नांवाचा डोंगर आहे त्याच्या पायथ्याशी वसलेल्या चंद्रावती नगरीत चंद्र नावाचा ब्राह्मण होता त्याच्याकडे गेले. त्याने त्या दोघांचे स्वागत आणि आदर सत्कार केला आणि

त्याच्या आवडीचे संस्कृत भाषेतील चतुश्लोकी भागवत त्यांना सांगितले. जनार्दन स्वामींना ते फार आवडले आणि त्यांनी नाथांना त्यावर मराठी भाषेत टीका लिहावयाची आज्ञा केली. त्यासंबंधी या टीकेच्या शेवटी नाथांनी म्हटले आहे की मी काही मोठा संस्कृत पंडित नाही. मला काव्यज्ञानही नाही. तथापि गुरुआज्ञेचे सामर्थ्य इतके मोठे आहे की मला या ग्रंथाचा अर्थ जेथे समजला नव्हता तेथे तो अर्थ आपण होऊन माझ्या अंतर्यामी घुसला. त्यांच्या ओव्या पहा: "तेणें (त्या ब्राह्मणाने) चतुश्लोकी भागवत। वाखाणिलें यथार्थ युक्त। तेणें श्रीजनार्दन अद्‌भुत। झाला उत्पुलित स्वानंदें पैं॥ २.९.१०२०॥ तेणें स्वानंदें गर्जोन। श्रीमुखें स्वयें जनार्दन। बोलिला अति सुखावून। हें वर्णी गुह्यज्ञान। देशभाषा॥ १०२१॥ तैं माझी मध्यम अवस्था। नेणें संस्कृत पदपदार्था। बाप आज्ञेची सामर्थ्यता। वचनें यथार्थ प्रबोध झाला॥ १०२२॥ ...नवल आज्ञेची सामर्थ्यता। मी करूं न रिघें जरी ग्रंथा। तो ग्रंथार्थ मज आंतौता। बळेंचि ज्ञानार्था दाटोनी दावी॥ १०२५॥ हें सांडूनियां ग्रंथकथन। मज कर्मांतरीं रिघता जाण। त्या कर्मामाजीं गुह्यज्ञान। ग्रंथार्थ पूर्ण प्रकटे स्वयें॥ १०२६॥ गुरुआज्ञा अत्यंत लाठी। ग्रंथार्थ खेळे माझे दृष्टीं। आज्ञेनें पुरविली पाठी। फाकटगोष्टींमाजीही ज्ञान॥ १०२७॥ नित्य कर्म करितां जाण। ग्रंथींचें दिसे गुह्यज्ञान। मागें घालूनिया संध्यास्नान। ग्रंथार्थ पूर्ण प्रकटे पुढां॥ १०२८॥" म्हणजे त्याकाळच्या पद्धतीप्रमाणे नेहमीचे स्नान, संध्या, पूजा, वैश्वदेव इत्यादींचा विसर पडून ग्रंथाच्या अर्थाने त्यांना झपाटले होते. "जागृती दिसे ग्रंथार्थज्ञान। ग्रंथार्थमय जाहलें स्वप्न। सुषुप्तीमाजीं दुजेनवीण। हें गुह्यज्ञान कोंदाटे पैं॥ १०२९॥" म्हणजे तीन्ही अवस्था ग्रंथाने व्यापल्या, "शब्दापुढें ज्ञान धांवे। ओवीपुढे अर्थ पावे। जें जें जीवीं विवंचावें। तें तें आधवें ग्रंथार्थ होय॥ १०३०॥ सद्‌गुरु आज्ञा अतिशय गाढी। रितें अर्धक्षण न सोडी। तैं आज्ञा गौरव परवडी। ग्रंथार्थ जोडी जोडिला ऐसा॥ १०३१॥... एका जनार्दना शरण। भावें वंदिता सद्‌गुरु चरण। स्वप्नीं न दिसे जन्ममरण। ब्रह्म परिपूर्ण होइजें स्वयें॥ १०३३॥... एवं भागवतीच्या मतितार्था। एकला एका नव्हे कर्ता। ग्रंथ ग्रंथार्थ अर्थविता। अंगें तत्त्वतां जनार्दन झाला॥ १०३५॥" आणि शेवटी सांगतात. "एका आणि जनार्दन। नांवें भिन्न स्वरूपें अभिन्न। यालागीं ग्रंथाचें निरूपण। पूर्णत्वें पूर्ण संपूर्ण झालें॥ १०३६॥"

सद्‌गुरु-आज्ञेमुळे हे झाले असे नाथांनी सांगितले आहे. यावर माझा प्रश्न आहे की आपल्यालाही श्रीमहाराजांनी अनुग्रह देऊन नाम घ्यायला सांगितले

आहे. ते आपले सर्व जीवन व्यापून का टाकत नाही? आत्ता गोंदवल्याला गेलो होतो तेव्हां किती छान वातावरण होते. जपही चांगला होत होता. येथे परत आल्यावर चार दिवस ते काहीसे टिकले, पण नंतर पुन्हा मूळ पदावर आलो. काय आपले जीवन चालले आहे! दिवसामागून दिवस जाताहेत. तेच रटाळ जीवन आपण जगतो आहोत, तरीदेखील त्याचा उबग कसा येत नाही? हे सगळे नकोसे होऊन सर्व काळ सर्व अवस्थांत नाम चालायला काय करावे ते सांगा.

**साधक प :** जीवनातल्या त्याच त्या गोष्टींचा कंटाळा येत नाही असे नाही; पण त्याखेरीज दुसरे कोणते जीवन खरे वाटत नाही. कंटाळा आला तरी झोपून उठल्यावर दुसऱ्या दिवशी पुन्हा तेच जीवन जगण्याची शक्ती कोठून येते समजत नाही. बहुतेक ही अविद्येची शक्ती असावी.

**पू. बाबा :** होय, ही अविद्येचीच शक्ती आहे. तिचा जोर मोठा विलक्षण आहे. रेल्वे यार्डात डब्यांचे शंटिंग चालू असते ना, तसे चालले आहे. इकडून ढकलला की तिकडे गेला अन् तिकडून ढकलला की इकडे! स्वत:चे म्हणून काही नाहीच.

**साधक ग :** हे उदाहरण अगदी योग्य आहे. त्या डब्यांचा भरपूर प्रवास घडतो आणि तरी देखील शेवटी जेथे होते तेथेच ते असतात. तशी आमची धावपळ भरपूर होते पण परत जेथे होतो तेथेच. पुढे जाणे नाही.

**पू. बाबा :** हो! पण हे कधीतरी थांबले पाहिजे ना? मला वाटते, नाथांच्या अंतरात चतुश्लोकी भागवताचा अर्थ जसा घुसला तसा नामाचा संस्पर्श आत झाला पाहिजे. तो झाला की नामाची आवड वाढेल.

**साधक प :** तसा क्वचित तो होतो पण टिकत नाही. गोंदवल्यात कसे छान चालते. तेथील वातावरणाचा तो परिणाम असतो. परत आलो की हळूहळू तो परिणाम नाहीसा होतो. आपल्या नकळत शक्तिपात होतो.

**साधक ब :** तो संस्पर्श टिकत नाही असे नाही. तो टिकून राहातो त्यावेळी वाटते की दुसरे काहीही करू नये, नुसते नाम घेत बसावे. तुम्ही सांगितले होते ना की Vacant mind, Silent mind आणि Cosmic mind आहेत; त्यापैकी बहुतेक Cosmic mind शी कोठेतरी स्पर्श होतो.

**पू. बाबा :** Cosmic mind शी स्पर्श ही फार पुढची अवस्था झाली. त्यापूर्वी Silent mind मधून एक प्रकारचा stillness (स्तब्धता) येतो.

**साधक ब :** Silent पेक्षा stillness हाच शब्द बरोबर आहे. एकसारखे नाम चालतेच असे नाही पण अशी अवस्था असते की त्यातून उठू नयेसे वाटते. वाटते की पुन:पुन्हा तोच अनुभव घ्यावा.

**पू. बाबा :** तुम्ही म्हणता त्या अवस्थेतून पुढे होणाऱ्या अवस्थेचे समर्थांनी चांगले वर्णन केले आहे. पंचसमासी म्हणून त्यांचे एक छोटेसे प्रकरण आहे. त्यात त्यांनी काय म्हटले आहे ते वाचून दाखवतो; ऐका : ते म्हणतात नवविधा भक्ती सांगून झाली. त्याने काय होते - "हें नवविधा भजन। सायुज्यमुक्ति साधन। तेणेंकरितां शुद्ध ज्ञान। प्राणियास होय॥ ४.१८॥ शुद्ध ज्ञानाचेनि बळें। अंतरीं वैराग्य प्रबळे। तेणें लिंगदेह मोकळे। होय वासनेसीं॥ १९॥ लागतां स्वरूपानुसंधान। नाठवे देहाभिमान। विश्रांती देखोन मन। तद्रूप होय॥ २०॥ ...तेथें मन पांगुळलें। आप आपणां विसरलें। आपणास भुलोन गेलें। स्वरूपबोधें॥ २२॥ मी कोण हें न कळे। अवघा आत्माचि प्रबळे। तेणें बळें मन मावळे। कर्पूरन्यायें॥ २३॥ तेथें शब्द कुंठित जाला। अनुभव अनुभवीं निमाला। आतां असो हा गलबला। कोणीं करावा॥ २४॥ वाटे एकांतासी जावें। पुन: हेंचि अनुभवावें। उगेंचि निवांत असावे। कल्पकोटी॥ २५॥ नको वक्तृत्व उपाधि। पांगुळली स्वरूपीं बुद्धी। लागली सहज समाधी। हेतुरहित॥ २६॥"

मठांचा वगैरे सगळा गलबला सोडून समर्थांना पुन्हा एकांतात जावेसे वाटत होते. 'उगेंचि निवांत असावें.'

**साधक ग :** Stillness ला निवांत हाच शब्द योग्य आहे.

**पू. बाबा :** हे सगळे ठीक आहे. पण आपले कोठे नडते आहे? कायम गोंदवल्यास राहाणे शक्य नाही. मग तेच वातावरण आपल्याला घरी कां आणता येत नाही?

**साधक ग :** मला वाटते की गोंदवल्याला जप होतो आणि घरी आपण तो करतो.

**पू. बाबा :** हे बरोबर नाही. गोंदवल्याला झाले तरी आपण जप करतोच. आज तरी कोठेही आपल्याला जप करावा लागतो. तो चांगला होणे आपल्या हातात नाही. तो चांगला व्हावयाला त्यांची कृपा पाहिजे. तथापि आपण कृपा शब्द फार भोंगळपणाने वापरतो.

**साधक ब :** होय, गाडीत बसायला चांगली जागा मिळाली ही त्यांची कृपा! खरोखर आतून तसे वाटत नसते पण बोलायची ती एक पद्धत पडून जाते.

**साधक ड** : तथापि दहा वेळा तसे म्हटले तर त्यातल्या एखाद्या वेळी तरी आतून तसे वाटू लागेल.

**साधक ब** : उलट, मला वाटते, ती सवय लागून ढोंगीपणा वाढतो. आतून तसे वाटत नसतांना कशाला तसे म्हणायचे?

**साधक प** : दुसऱ्यांना खरोखर तसे वाटते की नाही हे आपण कशाला ठरवायचे? आपल्याला वाटत नाही तर आपण तसे म्हणू नये म्हणजे झाले.

**पू. बाबा** : हे सगळे दुय्यम आहे. मुळात साधन वाढण्यासाठी काय करायचे?

**साधक प** : मी करतो म्हणून होणारी ती गोष्ट नाही. तथापि ती मलाच करायची आहे अशी ही पंचाईत आहे.

**साधक ब** : चांगल्या मनानेच वाईट मनाला चुप करायचे आहे. खोटा मी विरघळू लागला की खरा मी आहेच. त्याला कोठून बाहेरून आणायचे नाही.

**पू. बाबा** : जागेपणीचा सर्व काळ तरी नामस्मरण करायला काय हरकत आहे? आता मी त्याकरिता जगतो आहे असे वाटले पाहिजे. नाहीतरी आता जीवनात असे काय करायचे राहिले आहे? श्री. भाऊसाहेबांसारखे आता मी नामासाठी आहे असे वाटले पाहिजे.

**साधक म** : नाहीतर श्रीमहाराज म्हणायचे तसे हा जन्म नामाला दिला आहे असे म्हणावे.

**पू. बाबा** : भक्तीचे हेच मर्म आहे. बाहेरून सगळे तसेच चालले तरी आतून सर्वातून सुटले पाहिजे.

**साधक ब** : दृश्याची खेच जबरदस्त आहे. वर जाऊ लागलेल्या आपल्या मनाला ती खाली ओढते. वासना जड आहेत. त्यांच्या बळकट दोऱ्या, सूक्ष्म होऊ लागलेल्या मनाला खाली ओढत असतात. त्या तोडल्या पाहिजेत, त्याशिवाय साधनात दृढ होता येणार नाही. म्हणून विचार आणि विवेक पाहिजे.

**साधक क** : विचारापेक्षाही भक्तीच्या बाजूने गेले, भगवंताबद्दल प्रेम वाटू लागले की हे काम लवकर होईल, त्यासाठी सत्संग पाहिजे.

## ।२६६। (१ मे १९९२)

**पू. बाबा** : तुम्हांला एक प्रश्न विचारतो. आपले सगळे जीवन साचेबंद बनून जाते. तो साचा मोडावा असे कधी वाटत नाही का? अगदी कोणाचेही जीवन

घ्या, त्याचा एक ठराविक पॅटर्न (साचा) बनून जातो. काही प्रमाणात तो आवश्यक असला तरी त्यात माणूस असा काही बांधला जातो की प्रयत्न करूनही त्याला तो तोडता येत नाही. त्याच्या या धडपडीला तत्त्वज्ञानात **fleeing from the Self** म्हणतात. तुम्ही कोठेही गेलात, सुट्टी म्हणून हिल स्टेशनला गेलात किंवा हेल्थ रेझॉर्टला गेलात तरी त्या **Self** पासून कसे दूर जाता येईल? त्यासाठी त्याचे स्वरूप जाणणे हाच एक मार्ग आहे. पण माणसाचे स्वत:चे एक इमेज (प्रतिमा) तयार झालेले असते. ते खरे नाही हे माहीत असूनही ते मोडण्याचे धाडस होत नाही. आपलेच असे नव्हे; सायन्सच्या प्रगतीचे पहा. चौदाव्या, पंधराव्या शतकापासून, निदान गॅलीलिओ, कोपर्निकस यांच्यापासून सायन्सची जी वाढ चालू आहे ती देखील एका साच्यात आहे. त्या साच्याबाहेर ते जाऊ शकत नाही आणि परमार्थात तर साचा मोडायला पाहिजे. आपले इमेज बदलायला पाहिजे. म्हणजे आज जे इमेज आहे ते मोडायला पाहिजे. ते का जमत नाही?

**साधक प** : देह म्हणजे मी ही जशी माझी कल्पना आहे तसे हे इमेज म्हणजे मीच आहे. ते मोडायचे म्हणजे माझा मृत्यू आहे असे वाटते.

**साधक ग** : हे इमेज बनलेले आहे की बनवलेले आहे?

**पू. बाबा** : काही अंशी ते बनलेले असेल पण बरेचसे ते आपण प्रयत्नपूर्वक बनवलेले असते.

**साधक ग** : म्हणजेच ते बनवतांना त्यापासून आपण सुखी होऊ असे आपल्याला वाटते. ती अपेक्षा पूर्णपणे खरी ठरली नाही तरी ज्यामुळे मला सुख होण्याची शक्यता वाटत असते ते मोडण्याचा मी विचारच करू शकत नाही.

**साधक ज** : इमेज म्हणजे प्रतिमा किंवा प्रतिबिंब. प्रतिबिंब कधीच खरे नसते पण ते खरे वाटते. हेच अज्ञान. प्रतिबिंब खरे नाही, खोटे आहे हे पटले तर ते मोडतांना दु:ख होणार नाही.

**साधक प** : हे माझे इमेज मीच बनवलेले असल्याने त्याला खरेपण आहे. विचारानेच ते दूर करता येईलसे वाटते. पण विचाराने ते मी दूर करीन या विचाराचीही त्याला आडकाठी येते.

**पू. बाबा** : पण मग काय करावे?

**साधक ब** : मला वाटते, प्रार्थना हाच त्यासाठी मार्ग आहे. रोज प्रार्थना करावी.

**साधक प** : खरी प्रार्थना एकदाच होईल. माझे प्रयत्न संपले की शरणभाव येईल. रोज प्रार्थना करणे याला तुम्ही प्रार्थना म्हणा पण खऱ्या अर्थाने ती प्रार्थना नाहीच.

**साधक ड** : शरणभाव नसला तरी तो भाव यावा म्हणून प्रयत्न करीत राहिले तर केव्हां तरी तो भाव येईल.

**पू. बाबा** : अर्जुन सुरुवातीला मी तुझा शिष्य आहे, शरण आहे म्हणाला (शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्) तरी ती खरी शरणागती नव्हती. सगळी गीता सांगून झाल्यावर भगवान त्याला म्हणाले की आता तुला जे करायचे असेल ते कर (यथेच्छसि तथा कुरु) पण येवढे सांगून ते थांबले नाहीत. सर्व धर्मांचा त्याग करून केवळ मला शरण ये (सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज) असे त्यांनी सांगितले. आणि मग माझा मोह नष्ट झाला आहे, आता तू सांगशील ते प्रमाण (करिष्ये वचनं तव) असे अर्जुन म्हणाला. तेव्हां ती खरी शरणागती झाली. आपले इमेज हा मोहच आहे. तो नष्ट झाल्यावर खरी शरणागती होईल हे खरे असले तरी तो मोह नाहीसा करा अशी सद्गुरूजवळ विनवणी नको का करायला?

**साधक ब** : पूर्ण शरणागती या अर्थाने मी प्रार्थना म्हणत नाही. माझे इमेज मी मोडू शकत नाही हे लक्षात आल्यावर मी साधन करतो आहे, तथापि त्या साधनात माझ्या इमेजचा अडथळा येतो आहे हे लक्षात आल्यावर प्रार्थनेशिवाय कोणता मार्ग राहातो? शक्य तितकी मनापासून प्रार्थना करावी.

**साधक प** : त्यापेक्षा आपल्याला पटलेल्या एखाद्या विचाराचे आलंबन घ्यावे.

**साधक अ** : आलंबन म्हणून एक विचार मनात ठेवायचा म्हटले की इतर शंभर विचार मनात गर्दी करतात. तुम्ही म्हणता ते तितके सोपे नाही.

**साधक क** : ते विचारही नामानेच नाहीसे होतील. मला वाटते, शक्य तितके नाम घेत राहणे हाच याला मार्ग आहे. नामच या सगळ्या अडचणी दूर करील.

**पू. बाबा** : होय, पण नामावर तितकी श्रद्धा पाहिजे. नाम शक्तिमय आहे. त्याच्या शक्तीनेच सर्व काही होईल हे पटले पाहिजे. श्रीमहाराज म्हणत की एकवेळ रामाची शक्ती कळेल, पण नामाची शक्ती कळणे अवघड आहे.

**साधक क** : तेवढ्या किमान श्रद्धेखेरीज पुढे जाताच येणार नाही.

**साधक ग** : तुकाराम महाराजांनी 'तुझ्या नामाचिया बळें। अवघींयांचें काळें केलें तोंड॥' असे म्हटलेले आहे.

**पू. बाबा :** बरोबर आहे. सबंध अभंग असा आहे :

रात्रीं दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन॥ १॥
जीवाही आगोज पडती आघात। येऊनियां नित्य नित्य वारूं॥ २॥
तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें। अवघीयांचें काळें केलें तोंड॥ ३॥

तीन ओळींचाच अभंग आहे पण नामाच्या शक्तीची त्यावरून कल्पना येते.

**साधक ड :** नाम आणि सत्संग हाच मार्ग आहे.

**साधक क :** विचारापेक्षाही नामावर, गुरूवर विश्वास ठेवून साधन करत राहणे हेच योग्य वाटते. त्यात धोका नाही. विचाराच्या मार्गात मुख्य ध्येयाकडे दुर्लक्ष होण्याची भीती आहे; कारण आपले मन विचारात लगेच गुरफटते.

**साधक प :** मन म्हटले तरी त्याच्या वेगवेगळ्या पातळ्या आहेत. काही वेळा माझ्या देहापासून मी वेगळा आहे असे आपण म्हणतो. तथापि माझा हात दुखतो आहे असे म्हणून लगेच मला बरे वाटत नाही असे सांगतो. म्हणजे मनाची अवस्था सारखी बदलत असते. आपल्या नकळत आपले देहाशी तादात्म्य असते. मला माझे इमेज मोडायचे आहे कारण मी वेगळाच आहे. त्याला नाश नाही. पण तादात्म्यामुळे इमेजचा नाश म्हणजे मीचा नाश असे वाटते.

**साधक ग :** अर्जुन देखील लढाई करण्यापेक्षा भीक मागणे बरे म्हणत होता. तसे करणे हे त्याच्या इमेजच्या विरुद्ध वागणे झाले असते. तसे वागणे तुला शक्य नाही (तू तुझे इमेज मोडू शकणार नाहीस) असे श्रीकृष्ण म्हणाले.

**पू. बाबा :** वास्तविक देहाचा आणि नामाचा संबंध नाही. म्हणून त्या देहाचे जे इमेज आहे त्याचा आणि नामाचा संबंध असता कामा नये.

**साधक ग :** इमेज माझे आहे. देहाचे नाही.

**पू. बाबा :** पण आज मी देहापासून वेगळा नाही. म्हणून माझ्या इमेजशी अथवा देहाच्या स्थितीशी नामाचा संबंध असता कामा नये.

**साधक म :** श्रीमहाराजांनी डी. जी. जोशांना विचारले नव्हते का की दम्याचा आणि नामाचा काय संबंध म्हणून?

**साधक अ :** श्रीमहाराजांनी नाम निरुपाधिक निर्लेप आहे म्हटले आहे पण तसा भाव ठेवून नाम घ्यायचे म्हटले तरी हजार विचार मनात येतात.

**पू. बाबा :** पण आता हे जमले पाहिजे. त्याचे महत्त्व- valuation आत्ता नाही, तर केव्हां होणार. आता सगळेजण पन्नाशीच्या पुढचे आहेत, तेव्हां निकडीने केले पाहिजे. तुम्हांला कबीराचा शिष्य धर्मदास याचे एक पद वाचून दाखवतो म्हणजे नामाचे महत्त्व कळेल.

नामरस ऐसा है भाई॥
आगे आगे दाही चलै, पाछे हरियर होई।
बलिहारी वा वृक्षकी, जड काटे फल होई॥ १॥
अति कडुवा खट्टा घना रे, बाको रस है भाई।
साधत साधत साध गये है, अमली होय तो खाई॥ २॥
सूँघत के बौरा भये हो, पीवत के मरी जाई।
नामरस जो पीये, धडपर सीस न होई॥ ३॥
संत जवारिस सो जन पावै, जाको ग्यानपरगासा।
धर्मदास पी छकित भये है, और पिये कोई दासा॥ ४॥

(हे भाई, नामरस असा आहे. तो प्रथम (दृश्य संसार) जाळत जातो आणि मग त्या नामरसामुळे सगळीकडे हिरवेगार होते. त्या (संसार) वृक्षाची धन्य आहे. हा वृक्ष असा आहे की त्याचे मूळ कापले म्हणजेच त्याला (आत्मसुखाचे) फळ लागते. हा रस अतिशय कडू, आंबट आणि दाट आहे. ज्याला नशा करण्याची सवय आहे तोच हा रस पिऊ शकतो. कारण त्याच्या नुसत्या वासानेच बावचळायला होते. आणि तो प्यायलात की मृत्यू होतो. (अहंभाव नाहीसा होतो). जो हा नामरस पितो त्याचे डोके धडापासून वेगळे होते. ज्यांच्या हृदयात ज्ञान प्रगट झाले आहे त्यांनाच ही संतरूपी गोड औषधी प्राप्त होते. ही पिऊन धर्मदास मस्त झाला आहे. आता तुम्हीही या आणि (ह्या रसाचे) सेवन करा.)

सूँघत के बौरा भये हो- त्याच्या नुसत्या वासाने, बावचळून जायला होते आणि तो नामरस प्यायल्यानंतर मरायला होते- अहंपणा नाहीसा होतो. आता हे झाले पाहिजे. आत्तापर्यंत किती शुक्रवार झाले! का शुक्रवारी भेटतच राहायचे.

**साधक क :** शुक्रवारच्या भेटी चालूच राहायच्या. त्यांना शेवट कसला? सत्संग कायमचा असतो. त्याची गोडी अवीट आहे.

## |२६७| (८ मे १९९२)

**पू. बाबा :** आज तुम्हांला एक प्रश्न विचारायचा आहे. श्रीमहाराजांनी मला दोन गोष्टी सांगितल्या होत्या (१) एक वर्षभर शक्य तितके जास्त नामस्मरण करीत राहायचे आणि खोटे बोलायचे नाही. ते म्हणाले, हे जमले तर वाचासिद्धी प्राप्त होईल. शक्य वाटत असेल तर हे करावे, नाहीतर (२) एक वर्षभर शक्य तितके जास्त नामस्मरण करावे आणि शक्य तेवढे मौन पाळावे. या दोहोंपैकी

कोणते करणे आज आपल्याला शक्य आहे? खोटे बोलायचे नाही म्हणजे काय ते थोडे स्पष्ट करतो. व्यवहारात आपल्याला प्रत्येक वेळी खरे बोलणे शक्य नसते. श्रीमहाराज म्हणत की अशा वेळी मौन ठेवावे. उदाहरणार्थ, तुम्ही माझ्या सांपत्तिक स्थितीची चौकशी केलीत आणि मी काहीच उत्तर दिले नाही की तुम्ही समजता की मला तुम्हांला त्याबाबतीत काही सांगायचे नाही. त्याचप्रमाणे काही वेळा व्यवहारात खोटे बोलावे लागेल, पण तसे करतांना द्वेष, मत्सर वाढवणे, दुसऱ्याचे नुकसान करणे हा हेतू नसावा. उदाहरणार्थ, एखादा आजारी माणूस आसन्नमरण दिसत असला तरी त्याला आणि त्याच्या घरच्या लोकांना धीर देण्यासाठी बरे वाटेल म्हणणे म्हणजे खोटे बोलणे नव्हे. ते वाचासिद्धीचे जाऊ द्या; साधनाला मदत होण्याच्या दृष्टीने यांपैकी कोणते आपल्याला शक्य आहे?

**साधक ग** : मला वाटते की ही दोन्ही परस्परांना पूरकच आहेत. खोटे बोलायचे नाही म्हणून बरेचदा मौन ठेवावे लागेल आणि तसे मौन ठेवले तर एकूण बोलणे कमी होईल त्याबरोबर खोटे बोलणेही कमी होईल.

**पू. बाबा** : There you are ! तथापि दुसऱ्याशी बोललो नाही तरी आपण आपल्याशीच किती बोलत असतो. ते थांबले पाहिजे.

**साधक प** : केवळ आपल्याशी आपण बोलत असतो असे नव्हे तर आपण आपल्याशी खोटे बोलत असतो, खोटे वागत असतो. स्वत:लाच फसवत असतो. तेही थांबले पाहिजे.

**पू. बाबा** : उदाहरण देऊन तुमचा मुद्दा स्पष्ट करा.

**साधक प** : मागच्या शुक्रवारी तुम्ही म्हणाला की साधन चांगले व्हावे म्हणून महाराजांची प्रार्थना करावी. वास्तविक अशी प्रार्थना करत असतांना आपल्याला समजत असते की ही जीव ओतून खऱ्या अर्थाने केलेली प्रार्थना नव्हे. बऱ्याच प्रमाणात ते नुसते शब्द आहेत. मग त्याला प्रार्थना म्हणणे म्हणजे स्वत:ची फसवणूक नव्हे का? तळमळून, खऱ्या शरणागतीने प्रार्थना एकदाच होईलसे वाटते.

**साधक ब** : प्रार्थनेबद्दल मी जे म्हणालो ते, त्याखेरीज दुसरे काही करणे आपल्या हातात नाही आहे म्हणून. त्या दृष्टीने ती शरणागतीच आहे. साधन करतांना उदासीनता, मरगळ येते ती साधनाशिवाय कशाने दूर होणार?

**साधक ड** : रोज चुकणे, क्षमायाचना करणे आणि प्रार्थना करणे हे राहणारच. ती तुम्ही म्हणता तशी हृदयाच्या तळापासून नसली तरी तशी खोटीही नसते.

**पू. बाबा :** काही प्रमाणात तरी तो भाव असतो ना! संपूर्ण शरणागतीला शक्ती लागते. ती आज आपल्याजवळ नाही. गेल्या महिन्यात आधी रामनवमीपर्यंतचे नऊ दिवस आणि नंतर शिबिराचे पाच सहा दिवस असा जवळजवळ पंधरा दिवस गोंदवल्याला होतो. तेथे गेल्याबरोबर श्रीमहाराजांजवळ प्रार्थना केली की मौन शक्य नाही पण खोटे बोलायचे नाही हे व्रत म्हणून पंधरा दिवस पाळणार आहे. ते आपण पार पाडा. आणि त्यांनी ते पार पाडले! त्यामुळे मनाची पातळी कायम वर राहिली. मन प्रसन्न राहिले. unsoiled mind म्हणजे मनाला कसलाही डाग लागला नाही. आता सांगा की अशी प्रार्थना करायला काय हरकत आहे? मन असे unsoiled राहिले तर जपही किती चांगला होतो.

**साधक प :** हे ठीक आहे. मदरनी त्यांच्या शिष्याने जपासंबंधीच्या विचारलेल्या प्रश्नांना दिलेली उत्तरे त्यांच्या बुलेटिनमध्ये छापून आली आहेत. त्यात त्यांनी म्हटले की जप चांगला व्हावा असा अट्टाहास आपण कशाला करायचा? कारण जप केव्हां चांगला व्हावयाचा हे देखील ते नामच ठरवते. म्हणून आपण जप कसा होतो याचा विचार न करता त्या नामाच्या स्वाधीन व्हावे. त्याला पाहिजे तेव्हां ते चांगले चालेल. सर्व काही त्याच्यावर सोपवावे.

**पू. बाबा :** वा, किती छान सांगितले आहे!

**साधक ज :** नाम घेतांना मनात इतर विचार येतात, ते नाहीसे करायला नामापासून मला काहीही नको आहे, मी निर्हेतुक नाम घेतो आहे असे व्हायला काय अडचण आहे?

**पू. बाबा :** मन विचारशून्य करणे अवघड आहे.

**साधक प :** मदरप्रमाणेच कृष्णमूर्तींनीही म्हटले आहे की मी आडवा झालो होतो तो एकदम उठून बसलो. मला उठावेच लागले. तो दुसरा समोर होता.

**पू. बाबा :** ते खरे आहे. एकदा तुम्ही स्वतःला त्याच्या ताब्यात दिलेत की तुम्ही स्वतः राहातच नाही. मग तुम्ही कसे राहायचे काय करायचे ते सारे नामच ठरवील. लहान मुले मांजराच्या किंवा कुत्र्याच्या पिल्लांशी खेळतांना कशी त्यात रमून गेलेली असतात. नाम घेतांना तसा आनंद झाला पाहिजे, प्रसन्न वाटले पाहिजे. मन त्यात रमून गेले पाहिजे. कसे तरी, कंटाळवाणे नाम घेतो आहे असे होता कामा नये. नामस्मरण करतांना नको ते विचार मनात येतात. उदाहरणार्थ, जप करून उठल्यावर जी रोजची कामे करायची असतात त्याचेच विचार सुरू होतात. त्यासाठी जपाला बसतांना श्रीमहाराजांचे एखादे

वचन घ्यावे आणि जप सुरू करण्यापूर्वी त्यावर चिंतन करावे, म्हणजे जप करतांना इतर विचार मनात येणे हळूहळू बंद होईल.

**साधक प :** पण हे देखील नामापेक्षा वेगळेच आहे. विचारात आपण सहज रमतो. त्यामुळे नामस्मरणापेक्षा चिंतनात रमून जाण्याची जास्त शक्यता आहे.

**पू. बाबा :** होय, पण क्षुल्लक काहीतरी विचारांपेक्षा श्रीमहाराजांसंबंधी किंवा त्यांच्या वचनांवर विचार करू लागलो की हळूहळू मनाची पातळी उंचावते आणि जपाकडे लक्ष लागते. साधक आ यांना याचा उपयोग झाला. अमूकच असे नाही, काहीही करा, पण नामस्मरण करतांना मन वरच्या पातळीवर गेले पाहिजे. नाम घेतांना आणि त्यानंतरही प्रसन्न वाटले पाहिजे.

## |२६८| (१५ मे १९९२)

**पू. बाबा :** मागच्या शुक्रवारी मौन पाळणे आणि खोटे न बोलणे याबद्दल चर्चा झाली होती. त्या संदर्भात आणखी काही विचार झाला का ?

**साधक ब :** मौन ठेवणे सुरुवातीला कठीण वाटले तरी तसा प्रयत्न केला तर ते जमू शकते. प्रथम लोकांचे थोडे गैरसमज होतात, घरातली माणसेही नाराज होतात, पण मग त्यांच्याही लक्षात येते की त्यांना ज्या गोष्टीत गोडी वाटते त्यात ह्याला गोडी राहिलेली नाही, तेव्हां दुर्लक्ष करा. उदाहरणार्थ, घरात पाहुणे आलेले असतांना मी मुद्दाम त्यांच्याशी तुटकपणे वागत नाही. त्यांच्या येण्यामुळे नाराज झालो नाही हे दाखवण्यासाठी घरातली काही कामेही करतो. तथापि माझे मौन त्यांना कोठेतरी खटकते आहे हे लक्षात येते.

**पू. बाबा :** म्हणून काहीतरी काम करण्यापेक्षा दोन शब्द बोलून आपण सांगावे की मला जप करायचा आहे तेव्हां कृपा करून गैरसमज करून घेऊ नका. असे वागणे जास्त सोपे नाही का ? आणखी दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे नुसते मौन उपयोगाचे नाही. त्यात एकसारखे नामस्मरण पाहिजे.

**साधक ब :** मौनाचे समजले पण खोटे बोलणे, वागणे पूर्णपणे सोडून देणे अवघड वाटते. मी माझ्याशीच खोटे बोलत असतो, वागत असतो म्हणून खोटे म्हणजे काय याची निश्चित व्याख्या पाहिजे.

**पू. बाबा :** हे सारे आपल्याला साधन चांगले व्हावे, वाढावे म्हणून करायचे आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. स्वार्थी हेतूने किंवा दुसऱ्याचे नुकसान व्हावे म्हणून किंवा द्वेषाने आपण करतो ते खोटे वागणे होईल हे उघडच आहे. कित्येकदा प्रत्यक्ष कृतीपेक्षा त्यामागच्या हेतूला जास्त महत्त्व असते.

**साधक ग** : असत्य आणि अनृत यात काय फरक आहे?

**पू. बाबा** : फॅक्टस् म्हणजे वस्तुस्थितीला धरून जे नाही ते असत्य. अर्थात वस्तुस्थितीला धरून जे असेल ते सत्य. पण ते ऋत असेलच असे नाही. उदाहरणार्थ, एखादा माणूस त्याच्या बायकोला नीट वागवत नसेल तर ते सत्य आहे पण ऋत नाही. पण ते असो. आज मला तुम्हांला विचारायचे आहे की आज आपल्या ज्या वासना आहेत त्या सोडू म्हणून सुटत नाहीत. तेव्हां त्यांच्यामागे जास्त न लागता नामस्मरणाची वासना का वाढवू नये? अशी वासना होण्यासाठी काय करावे? त्यासाठी कोणत्या वासना उपयोगी पडतील? श्रीमहाराज म्हणत, माझे मागणे बंद कर असे रामाजवळ मागावे. वास्तविक ही देखील वासनाच; पण बाकीच्या वासना नाहीशा करायसाठी तिचा उपयोग आहे.

**साधक प** : वासना म्हणजे काय ते आधी ठरवले पाहिजे. कारण हवे-नकोपण म्हणजे वासना म्हटले तर ती फारच ढगळ व्याख्या होते. मला वाटते, वासनेत मुख्यत: हवेपण असते. अमुक मिळाले म्हणजे मी सुखी होईन असे वाटते.

**साधक ज** : नकोपण देखील का नाही येणार? मला आजार असू नये, प्रकृती चांगली राहावी असे वाटते.

**साधक प** : प्रकृती चांगली असते तेव्हां तुम्हांला त्यापासून positive असे काही सुख मिळत नाही. प्रकृती चांगली असतांना दुसरी सुखे भोगायची क्षमता असते म्हणून त्याचे महत्त्व.

**पू. बाबा** : म्हणजे सुख मिळावे ही इच्छा वासनांच्या मुळाशी आहे. त्याचप्रमाणे वस्तूतून सुख मिळेल ही पण खात्री आहे.

**साधक क** : मला वाटते की वासनेच्या मुळाशी आपली अपूर्णतेची जाणीव आहे. अमुक मिळाले की मी पूर्ण होईन असे वाटते. भगवंत भेटला तर मला खरे खरे सुख मिळेल, खरी पूर्णता येईल असे आज वाटतच नाही. ते केवळ सत्संगानेच घडेल.

**साधक ड** : सत्संगाचे तर महत्त्व आहेच पण तो देखील मला भगवंत मिळावा म्हणून आहे. म्हणून माझे नामस्मरण अखंड चालावे अशी वासना पाहिजे.

**साधक क** : आज मला नामस्मरणातून सुख मिळत नाही आणि इतर प्रापंचिक गोष्टींत काही दु:ख पण काही सुख मिळते. ते खरे सुख नाही, ते

चिरकाल टिकणारे नाही वगैरे असले तरी आज या क्षणाला मला जे मिळणे शक्य आहे त्याच्यामागे मी लागतो. नामस्मरणातून मिळणारे सुख अवीट आणि शाश्वत - कायम टिकणारे आहे असे जोपर्यंत माझ्या अनुभवास आलेले नाही तोपर्यंत नामस्मरणाची वासना होणे अवघड आहे.

**साधक ब :** त्या आनंदाचा थोडा तरी अनुभव आला पाहिजे, म्हणजे काही काळ तरी त्याची छाया टिकून राहील.

**साधक क :** (पू. बाबांना) एखाद्या दिवशी जरी असे चांगले नामस्मरण झाले तरी पुढे काही दिवस मोठ्या आनंदात जात असे आपण 'आनंद साधना'त म्हटले आहे.

**पू. बाबा :** आपले जे रोजचे जीवन आहे ते तसेच राहिले आणि त्यातील सर्व कर्मात भगवंताचे स्मरण ठेवता आले तर?

**साधक प :** मला तेच म्हणायचे आहे की मौन ठेवतांना आणि खोटे न बोलतांना जसे भगवंताचे स्मरण आवश्यक आहे तसे रोजच्या सर्व कर्मात जर भगवंत ओवता आला तर वेगळ्या साधनाची गरज नाही.

**साधक ज :** तसे नाही. रोजचे साधन तर झालेच पाहिजे. ठराविक वेळ बसून जप झालाच पाहिजे आणि शिवाय उरलेल्या वेळात भगवंताचे अनुसंधान पाहिजे.

**साधक प :** म्हणजेच साधनाचा ठराविक वेळ आणि त्याखेरीजचा वेळ असे विभाग केले तर साधनाचा वेळ वाढत गेला पाहिजे. मग जीवनातील इतर रस फिके होऊन जातील आणि नामाची गोडी अनुभवाला येईल.

**साधक क :** हे सगळे सत्संगाने घडून येते. त्यांच्या सहवासात भगवंताचा विसर पडत नाही. इतकेच नव्हे तर आपल्या नकळत आणि विनाकष्ट आपण वरच्या पातळीवर जातो.

**पू. बाबा :** एकसारखा सत्संग मिळणे कठीण आहे. नाम हे सद्रूप आहे त्यामुळे त्यातच सत्संग आहे.

**साधक क :** होय; पण एकदम त्या पातळीवर जाणे कठीण आहे. म्हणून सगुणातून निर्गुणात जायचा प्रयत्न संतांनी सांगितला. जीवनाकडे लीला म्हणून पाहता आले तर ते बाधक होणार नाही.

**साधक प :** आपण जे जे काही करतो ते आत असलेल्या त्याला देतो आहोत, उदाहरणार्थ, मी खात नाही तर अंतर्यामी असलेल्या त्याला भोग देतो आहे अशी भावना झाली तर वासनेचे बंधन राहाणार नाही.

**साधक ज :** हा मार्ग फार निसरडा आहे. आपल्याला पाहिजे तसे वागून ही प्रेरणा अंतर्यामीचीच आहे असा भ्रम होऊन आपली फसवणूक होण्याची शक्यता आहे.

**साधक ग :** 'यद् यद् कर्म करोमि तद् तद् अखिलं शम्भो तवाराधनम्' ही फार वरची अवस्था आहे. केवळ संतच अशा भावाने वागू शकतात.

**पू. बाबा :** होय, ह्या मार्गात हा मोठा धोका आहे.

**साधक ग :** श्रीमहाराजांनी उदाहरण दिले आहे की कैद्याबरोबर शिपाई असतात आणि मामलेदाराबरोबरही असतात. तथापि कैदी शिपायांच्या ताब्यात असतो तर शिपाई मामलेदाराच्या ताब्यात असतात. आपण वासनांचे कैदी आहोत तर वासना सत्पुरुषांच्या ताब्यात असतात. म्हणून आपले वासनांमधून येणारे मागणे आणि सत्पुरुषांचे मागणे यात फरक आहे. ज्ञानेश्वर महाराजांचे पसायदानच पहा ना! ते मागणेच आहे.

**साधक क :** म्हणूनच मला वाटते की हा काथ्याकूट सोडून जास्तीत जास्त नामस्मरण करणे हाच योग्य मार्ग आहे. वासनांचे दमन करून मग नामस्मरण करणे अवघड आहे. त्यापेक्षा नामानेच त्या क्षीण होत जाणे सोपे आणि हमखास आहे.

**पू. बाबा :** आपली अशी कोणती तीव्र वासना आहे का की त्याशिवाय जगणे आपल्याला व्यर्थ वाटेल?

**साधक ड :** तसे सगळेच बेतास बात आहे. तीव्र वासना अशी कोणतीच नाही.

**पू. बाबा :** त्यामुळेच कदाचित परमार्थाची वासनाही बेताचीच असावी. हा विषय महत्त्वाचा आहे. पुढच्या शुक्रवारी ह्यावर आपण आणखी चर्चा करू.

## |२६९| (२२ मे १९९२)

**पू. बाबा :** मागच्या शुक्रवारी आपली वासनेसंबंधी चर्चा अपुरीच राहिली. त्याबद्दल काही विचार केला काय? वासना म्हणजे काय?

**साधक ग :** मला वाटते, वासनेमध्ये देहाला सुख पाहिजे असते. वासना सामान्यत: देहाला धरून असतात म्हणून देहबुद्धीतून वासना येतात असे म्हणता येईल.

**पू. बाबा** : तसे नाही; उलट देहच वासनांतून आला आहे. वासना सूक्ष्म असतात. त्या स्थूल होत होत देहापर्यंत येतात. देह हे वासनांचे सर्वात जड स्वरूप आहे.

**साधक ज** : वासनांतून देह येतो हे ठीक आहे. पण मला वाटते की मला एखादी इच्छा झाली आणि ती दृढ झाली की तिला वासना म्हणतात. दृढ झालेली इच्छा म्हणजे वासना.

**पू. बाबा** : इच्छेतून वासना येते असे न म्हणता वासनेतून इच्छा निर्माण होतात असे म्हणणे जास्त योग्य होईल. वासनेचे व्यक्त स्वरूप इच्छेत दिसते. अमुक मिळावे किंवा अमुक टळावे, सुख मिळावे, दु:ख होऊ नये हे त्या वासनेचे स्वरूप असते. वासना म्हणजे केवळ दृढ झालेली इच्छा असे म्हणता येणार नाही.

यावर कोणीच काही बोलले नाही तेव्हां पू. बाबा पुढे म्हणाले : वेदान्त वासनेबद्दल काय म्हणतो ते सांगतो. मग तुम्हांला त्याबद्दल काय वाटते ते सांगा. वास्तविक माणूस ही भगवंताचीच कृति, नव्हे सुकृति आहे. सुरुवातीला माणूस पूर्ण होता, तृप्त होता. जसे खरी शांती म्हणजे काय ते आपल्याला माहीत नाही तसे खरी तृप्तीही आपल्याला माहीत नाही. माणसाला ही तृप्ती असतांनाच कोठून तरी अतृप्ती शिरली. ती कशी शिरली ते माहीत नाही. पण अतृप्तता आल्यावर माणूस तृप्तीसाठी धडपड करू लागला. बरे, हे येवढ्यावरच थांबले नाही. आपल्याच कल्पनेने माणूस ती तृप्ती मग वस्तूंमधे शोधू लागला. उदाहरणार्थ, मला पैसा मिळाला म्हणजे मी सुखी होईन, तृप्त होईन. वास्तविक पैशात सुखही नाही आणि दु:खही नाही. माणसाने आपल्या कल्पनेने ते निर्माण केले. वस्तूंपासून सुख मिळते म्हणतानाही काही गोष्टींना माणसाच्या जीवरक्षणाच्या गरजा (biological needs) म्हणता येईल. अन्न, वस्त्र, निवारा किंवा रोटी, कपडा, मकान ह्या सर्व देशांतील आणि सर्व लोकांच्या - अगदी आदिवासी टोळ्यांत देखील आढळणाऱ्या गरजा आहेत. या गरजा भागल्या की मग माणसाला वाटते की नुसता निवारा नको, स्वत:चे घर बांधले की मी सुखी होईन. वास्तविक देह झाकण्यासाठी कपडा पाहिजे म्हटले तर तो अमुक तऱ्हेचाच पाहिजे इत्यादि वासनांना सांस्कृतिक संदर्भ (cultural reference) आहे. म्हणजे आपण आपल्या राहणीचा एक साचा (pattern) ठरवतो आणि त्याला धक्का लागू नये म्हणून धडपडत असतो. म्हणजेच असे म्हणता येईल की आपल्या अहम् भोवती वासनांचा पुंज आहे आणि तो आपल्याला स्वस्थ बसू देत नाही; एकसारखी कर्माची प्रेरणा देत असतो.

वासना आणि त्या पूर्ण करण्याची धडपड यांची आपल्याला सवय आहे. प्रश्न आहे की या वासना नाहीशा कशा करता येतील आणि त्या ठिकाणी भगवंताची वासना कशी निर्माण होईल. सत्पुरुष, तुमच्या वासना तृप्त करून तरी नाहीशा करतात किंवा मुळात त्या नष्ट करतात. ब्रह्मानंद महाराज जेव्हां श्रीमहाराजांसंबंधी 'वासनेचें मूळ दूर केलें' म्हणतात तेव्हां त्यांनी शिष्याचा अहम्‌च नाहीसा केला असा त्याचा अर्थ आहे; कारण वासनापुंजाच्या मुळाशी अहम् आहे. तथापि अहम् नाहीसा करूनही गुरु आणि शिष्य वेगळे राहातात. योगमार्गात वासनांचे दमन आहे. त्यासाठी माणसाची बुद्धी, त्याचा मेंदू आणि नसा बळकट पाहिजेत. अत्यंत तीव्र धारणेखेरीज ध्यान आणि समाधी शक्य नाही. अशा माणसाचे शरीर कदाचित दुबळे असेल. वासुदेवानंद सरस्वती आणि स्वरूपानंद असे होते. मनाच्या हठयोगात मेंदू मजबूत लागतो. असा योग साधणारांच्या मेंदूतील उष्णता वाढते म्हणूनच ते केशरमिश्रित चंदनाचा त्रिपुंड लावतात.

भक्तिमार्गाने, वासनांचे दमन न करता त्या भगवंताकडे वळविल्या आहेत. तुलसीदासांच्या रामचरितमानसमधे शेवटचा दोहा अप्रतिम आहे. "कामिहि नारि पिआरि जिमि लोभिहि प्रिय जिमि दाम। तिमि रघुनाथ निरंतर प्रिय लागहु मोहि राम॥" भगवंताचे नाम असे प्रिय झाले पाहिजे. भक्तीमधे गुरु आणि शिष्य दिसायला दोन दिसतात पण दोघेही पूर्ण झाल्यामुळे एकच असतात.

**साधक ज** : हे थोडे विचित्र वाटते. पूर्ण आणि त्याचवेळी वेगळे हे कसे शक्य आहे?

**पू. बाबा** : तीच तर भक्तिमार्गाची थोरवी आहे. सर्व अद्वैत सांगून झाल्यावर आचार्य म्हणाले, "अद्वैतं त्रिषु लोकेषु नाद्वैतं गुरुणा सह।" ब्रह्मभाव प्राप्त झाल्यानंतर तुकाराम महाराज म्हणतात "नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। मी भक्त तूं देव ऐसें करीं॥" पण हे व्हायला तीव्र धारणा पाहिजे. एकसारखे त्यावर चिंतन पाहिजे आणि म्हणून मी म्हणतो की वासना नाहीशी करायची धडपड करण्यापेक्षा ती भगवंताची कशी होईल?

**साधक ब** : नामामुळे वासना क्षीण होतात, नाहीशा होतात याचे काहीतरी प्रत्यंतर आले पाहिजे.

**पू. बाबा** : प्रत्यंतर म्हणजे तुम्हांला काय पाहिजे? उदाहरणार्थ, पैशाची वासना घ्या. जसजसे नामस्मरण वाढू लागेल तसतशी पैशाची हाव कमी होईल. पहिल्यासारखीच सर्व परिस्थिती असूनही पुरे आता असे माणसाला वाटेल.

पैशामुळे येणारी अस्वस्थता नाहीशी होईल. हा नकारात्मक भाग झाला. होकारात्मक भाग म्हणजे त्याला एकसारखे नामच घेत राहावे असे वाटू लागेल. आपल्या सर्व वासनांना स्थल, काल, निमित्ताच्या मर्यादा आहेत, पण नामाला या मर्यादा नाहीत. त्यामुळे नामाची वासना आपल्याला या मर्यादांपलीकडे नेईल. नामात माझा प्राण आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे, त्याचा अर्थ समजेल. पण हे सगळे, वासनांचे तोंड भगवंताकडे वळवले तर शक्य आहे. ते कसे वळवावयाचे ?

**साधक प :** आपण जेव्हां एखाद्या वस्तूची वासना आहे असे म्हणतो तेव्हां त्याबद्दल आपल्याला प्रेम असते. म्हणजे वासनेत प्रेम आहे.

**पू. बाबा :** तुमचा हा मुद्दा मला आवडला. भगवंताचे, नामाचे आपल्याला प्रेम वाटले पाहिजे. (साधक ब यांना) त्या दृष्टीने तुम्ही नाम घेतांना 'तू मला हवास' असे जे नेहमी म्हणता ते वाटले पाहिजे. श्रीमहाराजांचे प्रेम वाटले पाहिजे.

**साधक ज :** मागे आपले बोलणे झाले होते की 'तू मला हवास'पेक्षा 'तूच मला हवास' असे जेव्हां वाटू लागेल तेव्हांच इतर गोष्टींचे महत्त्व कमी होईल.

**साधक ग :** होय, नाहीतर इतर अनेक गोष्टी मला हव्या असे वाटते तसेच तूही हवास इतके ते सपक होईल.

**साधक प :** प्रेमामधे दुसऱ्यापासून काही अपेक्षा नसते. उलट, सारखे त्याच्यासाठी काहीतरी करावेसे वाटते. त्या दृष्टीने 'तू मला हवास' पेक्षा 'मला तुझे होऊ दे' हा भाव बरोबर होईल.

**पू. बाबा :** तत्सुखे सुखित्वम् हे प्रेमाचे लक्षण आहे. तुला आवडेल तसा मी राहीन. तू ठेवशील तसा राहीन. तुझ्या सुखात माझे सुख आहे, हे खरे.

**साधक ड :** वासना आणि अहंकार यांचा काय संबंध आहे ?

**पू. बाबा :** वासना अंमलात आणायचे - execute करायचे काम अहंकार करतो.

**साधक ड :** म्हणजे आपल्या गुरूंचे प्रेम वाटू लागण्यासाठी अहंकार मारला पाहिजे. मी कसा क:पदार्थ आहे, सगळे कर्तृत्व त्यांचेच आहे असा भाव वाढवता आला तर त्याचा साधनात उपयोग होईलसे वाटते. त्यामुळे अहंकारावर ताबा येईल.

**पू. बाबा :** याचा उपयोग होईलच. पण याखेरीज प्रेमामधे चिंतन आहे आणि ते टिकवून धरण्यासाठी धारणा पाहिजे. ती धारणाही श्रद्धा ठेवून नाम घेतले तरच निर्माण होईल. वैखरीने नाम घेत घेत आत उतरता येईल.

**साधक ज :** श्रद्धा ठेवता आली तर उत्तमच आहे; पण कसेही घेतले तरी नाम आपले काम करतेच. ते घेत राहिले पाहिजे.

**साधक ग :** होय; पण मग हे अमक्या दिवसांत साधावे अशासारखी अट किंवा अपेक्षा असता कामा नये. मी नाम घेतो आहे, आता यातून केव्हां काय व्हायचे ते होईल अशी तरी श्रद्धा पाहिजे.

**पू. बाबा :** महाराज भेटले, माझे काम झाले. आता त्यांना आवडते म्हणून नाम घेतो असे म्हणणारी श्री. भाऊसाहेबांसारखी माणसे विरळाच. आणखी एक गोष्ट सांगतो, नाम घेतांना आज आपल्याला नाम हा महाराजांचा प्राण आहे ही गोष्ट समजत नाही. तथापि जेथे नाम आहे तेथे त्यांचे अस्तित्व आहे असा भाव आणण्याचा प्रयत्न करावा. मी नाम घेतो म्हणजे ते आहेतच म्हणावे. नामाला श्रीमहाराजांचे व्यक्तिमत्त्व देण्याचा प्रयत्न करावा. नामाला त्यांचा रंग आला पाहिजे. त्यांचे व्यक्तिमत्त्व, त्यांची राहणी, आवडी-निवडी आपल्याला माहीत आहेत; त्याचा उपयोग करून घेता येईल. त्यांना जे आवडते ते आपल्याला आवडू लागणे हे त्याचे गमक आहे. वास्तविक ते म्हणजे निराकार स्पंदन आहे.

**साधक ग :** मुख्य म्हणजे त्यांना नाम आवडते; ते घेत राहिले पाहिजे. सारखे त्यांचे चिंतन पाहिजे.

**साधक ब :** एक प्रकारे auto suggestion - स्वयंसूचना म्हणाना! दुसरे मला वाटते, तुकाराम महाराजांना जसे कामक्रोधादी विकारांचे तोंड काळे केले असे जाणवले तसे आपल्यालाही वासना कमी झाल्याचे जाणवले पाहिजे.

**पू. बाबा :** तसे कदाचित एकदम नाही समजणार. कारण असे पहा की जीवाची शक्ती मर्यादित आहे. ती जसजशी नामाकडे जास्त वळू लागेल तसतशी इतर बाबतीत ती कमी होत जाईल. नामाखेरीज बाकीचे सगळे करणे रटाळ, रसहीन वाटू लागेल. आता फक्त नामच घेत बसावे, बाकी सगळे आता पुरे असे वाटू लागेल.

**साधक प :** मला वाटते की इतर गोष्टींतील रस कमी झाला तर पोकळी निर्माण होईल.

**साधक ब :** तसे होणार नाही. नामात अशी शक्ती आहे की ते सर्व जीवन व्यापून टाकील.

**साधक ग :** (पू. बाबांना) आणि आपण 'मनाची शक्ती' या पुस्तकात म्हटले आहे की जीवाची शक्ती मर्यादित असली तरी नामाच्या शक्तीला मर्यादा

नाही. त्यामुळे नाम घेण्यासाठी लागणारी शक्ती संपली असे होणार नाही. नाम घेण्यासाठी लागणारी शक्ती नामाकडूनच मिळत राहील.

**साधक ब :** होय, पण त्यासाठी आधी इकडे वाया जाणारी सगळी शक्ती थांबली पाहिजे, नाहीतर नामाने मिळणारी शक्ती संसारात जाईल.

**साधक ग :** ते channelizing च आहे. पाट इकडून तिकडे वळवावयाचा आहे.

**पू. बाबा :** भगवंताबद्दल किंवा आपल्या गुरूबद्दल प्रेम वाटायला तीन गोष्टी पाहिजेत. १) सहवास २) आपलेपणा आणि ३) निकड किंवा तळमळ. यांपैकी पहिली गोष्ट सहवासाची. नामाच्या सहवासात श्रीमहाराज आहेतच. त्यांचे चरित्र आठवून आपलेपणा वाढविता येईल. आणि बाकी सगळे नीरस वाटू लागल्याशिवाय - वैराग्याशिवाय त्यांची निकड वाटणार नाही. (साधक प यांना) तुमचा हा प्रेमाचा मुद्दा चांगला आहे. नामाचे प्रेम वाटले पाहिजे. कसे सांगू! मलाच नीट सांगता येत नाही. सुरुवातीला नाम आणि श्रीमहाराज यांचे अस्तित्व वेगवेगळे वाटेल पण मग ती दोन्ही एक होऊन जातील आणि मग प्रत्यय येईल की खरोखर ते आतच आहेत.

## |२७०| (२९ मे १९९२)

आज नेहमीच्या साधकांपैकी साधक क आले नव्हते. पुण्याचे श्री. भाऊसाहेब परांजपे आले होते. वर्षातले बरेच महिने ते गोंदवल्यासच असतात.

**श्री. भाऊसाहेब :** हल्ली गोंदवल्याला माझे एकसारखे नामस्मरण चालू असते असे नाही; पण आठ आठ तास मी त्यातच असतो. किती नाम झाले ते मोजत नाही.

**पू. बाबा :** नाम चालू पाहिजे. सध्याची स्थिती Contemplation ची आहे. त्यातूनच Meditation म्हणजे ध्यान येईल. पण चांगले चालले आहे.

आपला वासनेचा विषय चालू होता. माझ्या असे लक्षात आले की वासना म्हणजे काय ते निश्चितपणे सांगता आले नाही तरी तिचे स्वरूप expression आपल्याला दिसते. काहीतरी कमतरता आहे असा भाव असतो. गेले आठ दिवस हाच विचार डोक्यात आहे त्यामुळे म्हणा, किंवा काल रात्री एकच्या सुमारास आमचे मेहुणे अमेरिकेतून आले, त्यानंतर झोप न लागल्यामुळे एक ते अडीच चांगला जप झाला त्यामुळे म्हणा, पहाटे एक चांगला अनुभव आला तो

तुम्हांला सांगतो. पहाटे बाथरूममधे आंघोळीला गेलो. थंड आणि गरम पाण्याच्या दोन बादल्या होत्या. एका बाजूला रात्रीची खरकटी भांडी पडलेली होती. तिथेच तीन-चार झुरळे होती. तिकडे पाहतांना एकदम वाटले की हे सगळे कसे बरोबर आहे, पूर्ण आहे. यात एक हार्मनी - सुसंवाद आहे. याच्यापेक्षा चांगले दुसरे असूच शकत नाही. यात सौंदर्य आहे असे वाटले आणि त्यामुळे अवर्णनीय आनंद झाला. मग वाटले की जगात जे काही आहे ते बरोबरच आहे. लक्षात आले की असे वाटू लागले की वासनेचे मूळच नाहीसे होईल. मग जगात सौंदर्याखेरीज, आनंदाखेरीज दुसरे काही नाहीच. वासनेमधे काहीतरी हवे, काहीतरी कमी आहे असे वाटते हे लक्षात येऊन भगवंताची वासना म्हणजे काय याचा उलगडा झाला. हे जग भगवंताने निर्माण केलेले आहे. ते बरोबरच आहे. त्यात विरोध नाहीच. म्हणून सतत त्याचे स्मरण राहाणे ही भगवंताची वासना म्हणता येईल. पाँडिचरीच्या मदरना पूर्णतेचा असाच एक अनुभव आला आणि तो सुमारे पाऊण तास टिकला असे त्यांनी सांगितले आहे. याबद्दल तुम्हांला काय वाटते?

**साधक ग** : वासना नाहीशा झाल्यावर ही अवस्था येत असावी. वासनेमधे अपूर्णतेची जाणीव आहे. अमुक झाले की मी सुखी होईन, तृप्त होईन असे वाटते.

**साधक ज** : कित्येकदा असेही होते की नेमके काय मिळाले म्हणजे तृप्त होईन तेही समजत नाही. पण आज आहे ते अपुरे आहे असे वाटत राहते.

**साधक प** : हे अपुरेपण वस्तूंमुळे पूर्ण होईल असे वाटणे हे वासनेचे आणखी एक लक्षण म्हणता येईल.

**पू. बाबा** : मदरना आलेला अनुभव जास्त व्यापक आणि खोल आहे. सुमारे पाऊण तास तो टिकला असे त्यांनी सांगितले आहे.

**श्री. भाऊसाहेब** : (पू. बाबांना) तुम्हांला आलेला अनुभव स्थिर झाला की झाले. अनुभव तोच आहे. सगळ्या गोष्टींत हार्मनी, सौंदर्य दिसू लागले की त्याचीच आठवण राहील.

**साधक प** : त्याने केलेले सगळे बरोबरच आहे असे वाटू लागले की आपले कर्तृत्व गेलेच. मी नाहीसाच होईल.

**पू. बाबा** : म्हणजे ठरले, की आपले कर्तेपण गेल्याशिवाय वासना जाणार नाहीत. जे काही घडते आहे ते त्याच्या सत्तेने घडते आहे आणि ते बरोबरच आहे असे वाटू लागले की वासना राहीलच कुठे? आणि त्याच वेळी तो हवा

असे वाटू लागले म्हणजेच भगवंताची वासना होईल. हे साध्य करण्यासाठी नामस्मरण हाच उपाय आहे. रोज झोपण्यापूर्वी आज शक्य होता तितका जास्तीत जास्त वेळ नामस्मरणाला दिला का याचा आपल्या मनालाच हिशोब द्यावा.

## ।२७१। (५ जून १९९२)

**पू. बाबा :** आज मला एका वेगळ्याच प्रश्नाची चर्चा करायची आहे. गुरुदेव रानड्यांचे गुरु प्रू. भाऊसाहेब उमदीकर यांची शिवलिंगव्वा नांवाची एक शिष्या होती. मोठी साधनी स्त्री होती. लिंगायत होती. तिच्यावर खूप प्रापंचिक संकटे कोसळली. दोन मुलगे वारले. त्यांच्या पाठोपाठ नवराही वारला. नवऱ्याने केलेले कर्ज उरावर होते. त्यातच भर म्हणून सर्व कारभार पाहणारा भाऊही वारला. असे आकाश फाटल्यानंतर तिने पू. भाऊसाहेबांना पत्र लिहिले. ते पत्र मराठीत आहे. त्या पत्रात ती म्हणते की आत्तापर्यंत मी केळीला घागरीने पाणी घालत होते, आता मोटेने घालते आहे. म्हणजे नामस्मरण इतके धो धो चाललेले आहे. हे वाचल्यावर वाटले की आज आपण जे जीवन जगतो तो भ्रम आहे. ते सगळे खोटे आहे. फक्त नाम, सद्गुरु किंवा भगवंतच खरा आहे असे आपल्याला वाटते का? पाँडिचरीच्य मदरनीही त्यांना आलेला अनुभव दिला आहे तो वाचून दाखवतो. त्या म्हणतात :

"Yesterday I felt so strongly that all our constructions, all our habits, all our ways of seeing and reacting to things, all that was completely collapsing. I felt as if I was suspended in something... totally different something... I don't know. And really, the feeling that everything we have lived, everything we have known, everything we have done is a perfect illusion. So you see... Men have had the spiritual realization that material life is an illusion (some people find it painful, but I found if marvellously beautiful and joyous that it was one of the most beautiful experiences of my life), but here it is the whole spiritual construction one has lived with, which becomes a complete illusion - and not the same kind of illusion, a far more serious illusion ! And I'm not exactly a

**baby. I have been doing yoga for over sixty years and here it is."**

**(Mind of the cells. p.155.)**

(काल मला तीव्रतेने जाणवले की आपल्या सगळ्या कल्पना, आपल्या सगळ्या सवयी, घटनांकडे किंवा वस्तूंकडे पाहण्याचे आणि प्रतिक्रिया व्यक्त करण्याचे आपले सर्व प्रकार पूर्णपणे ढासळून पडत होते. मला वाटले की मी जणू काही कशामधे तरी अधांतरी लोंबकळते आहे - ते काहीतरी वेगळेच आहे... मला माहीत नाही आणि खरोखर आपले आतापर्यंतचे जीवन, आपले ज्ञान, आपले करणे हे सर्व पूर्ण भ्रम आहे असे वाटू लागले. भौतिक जीवन हा भ्रम किंवा माया आहे असे आध्यात्मिक ज्ञान काही माणसांना झालेले आपणांस माहीत आहे. (मला आलेला हा अनुभव काहींना कष्टदायक वाटतो, पण मला मात्र तो अतिशय सुंदर आणि आल्हाददायक वाटला. माझ्या जीवनातला सर्वात सुंदर असा तो अनुभव होता.) पण आत्तापर्यंत ज्या आध्यात्मिक कल्पनांत आपण वावरलो तो पूर्ण भ्रम होता हेही सामान्य अर्थाने नव्हे तर विशेष अर्थाने प्रतीतीस आले. मी काही कुकुले बाळ नाही. गेल्या साठ वर्षांपेक्षा जास्त काळ मी योगाचा अभ्यास करीत आहे. आणि आता मला हा अनुभव आला. (Mind of the cells. पृष्ठ १५५)

**पू. बाबा** : आपल्या सभोवतालचे जग, आपल्या कल्पना हे सगळे कोसळून पडले. जे दिसते ते सगळे पूर्णपणे भ्रम आहे हे जाणवले. हा भ्रम आहे ही विचाराने समजणारी गोष्ट नाही. हा अनुभव आहे.

**साधक ब** : विचाराने हे समजणार नाही हे खरे असले तरी काही वेळा हे सगळे फुसके आहे, यात काही अर्थ नाही असे वाटते.

**पू. बाबा** : हे काही वेळाच वाटते आणि फुसके वाटले तरी त्याच्या खरेपणाबद्दल शंका नसते.

**साधक प** : याचे कारण, मला वाटते, मी देह आहे ही भावना विचाराने दूर करता येण्यासारखी नाही. नामाची Reality - सत्यता जाणवल्याशिवाय बाकीचे सारे भ्रम आहे हे जाणवणार नाही; मग विचाराने तुम्ही त्याला भ्रम म्हणा, पण ते खरे नाही.

**पू. बाबा** : भ्रम म्हणजे नेमके काय म्हणता येईल ?

**साधक ज** : लहान मुली भातुकली खेळतात तेव्हां त्यांचे ते खेळणे भ्रम आहे असे मोठ्या माणसांना वाटते पण मुलींना ते सगळे खरेच असते.

**पू. बाबा** : नाही, त्यांनादेखील ते खोटे आहे याची जाणीव असते. तथापि एक गोष्ट खरी की आपल्या भोवतालच्या या जगाला आपण चिकटलेले आहोत.

**साधक प** : सद्वस्तूची ओढच या आसक्तीतून सोडवील.

**पू. बाबा** : म्हणजे भ्रमाच्या मुळाशी वासना आहे असे म्हणता येईल का?

**साधक ड** : वासना आहेच आणि त्याबरोबर मी कर्ता हा भावही आहे.

**साधक ग** : स्वप्न पडते तेव्हां ते खरेच वाटते. पण जागे झाल्यावर तो भ्रम होता हे जसे लक्षात येते तसे आत्मदर्शन झालेल्या माणसालाच जग हा भ्रम आहे असे वाटेल.

**साधक प** : काही वेळा स्वप्नात देखील हे स्वप्न आहे ही जाणीव असते. फाइनमनला तर हुकमी स्वप्न पडत असे; पण ते जाऊ द्या. मदरनी हा अनुभव लिहिला आहे याचे कौतुक वाटते. अरविंदांना माया मान्य नव्हती. तथापि मदरनी त्यांचा अनुभव स्पष्ट सांगितला आहे.

**पू. बाबा** : आणि म्हटले आहे की I am not a baby. I have practiced yoga for over sixty years! तथापि मूळ मुद्दा राहिलाच. आजचे जीवन भ्रम आहे हे कसे जाणवेल?

**साधक ब** : हे क्रमाक्रमाने होईल की एकदम फ्लॅश येईल?

**पू. बाबा** : दोन्ही शक्य आहे. पण सामान्यत: क्रमाक्रमाने होईल. उदाहरणार्थ, पैशाबद्दल, नातेवाइकांबद्दल पूर्वी वाटणारा खरेपणा कमी होत जाईल.

**साधक प** : विवेकानंदांना फ्लॅश आला होता. श्रीरामकृष्ण जग भ्रम आहे म्हणतात याची ते हसून थट्टा करीत असत. एक दिवस रामकृष्णांनी आपल्या पायाने त्यांच्या खांद्याला स्पर्श केला आणि "तत्क्षणीच नरेंद्रनाथांचें अभूतपूर्व भावान्तर झालें. त्यांना वाटूं लागलें की, जणुकांहीं त्यांच्या भोवतालच्या सर्व जिनसा एका अनंत सत्तेंत विलीन होऊन गेल्या आहेत. राहिले केवळ ते स्वत:च एकटे आणि अखेर त्यांचें 'मीपण' देखील लय पावण्याच्या बेतांत आलें. भयविस्मयकंपित स्वरांत नरेंद्रनाथ एकदम ओरडले, 'अहो, तुम्हीं मला हें केलें तरी काय - मला आईबाप आहेत ना'. त्यावर श्रीरामकृष्णांनी त्यांच्या छातीवरून अमळ हात फिरवितांच ते फिरून पहिल्यासारखे झाले!" म्हणजे भ्रम आहे हे जाणवल्यावर ते पचायला आतून तयारी व्हावी लागते ती झाली नव्हती.

**पू. बाबा :** होय, नाहीतर वेड्यासारखी स्थिती व्हायची. जग भ्रम आहे असे क्रमाक्रमाने वाटायला लागणे याला नादिष्टपणा म्हणता येईल का?

**साधक प :** नादिष्टपणा काही वेळा चांगलाही असतो. संशोधन करणारांनाही लोक बरेचदा नादिष्टच समजतात. जे खरे नाही ते खरे मानणे हे भ्रमाचे स्वरूप आहे. तसेच तो वेडापेक्षा वेगळा आहे.

**साधक ज :** वेड्याचा वेडाचा विषय सोडला तर एरवी कित्येकदा तो सर्वसामान्य वाटतो. अशा वेळी तो वेडा आहे असे वाटत नाही. आपल्याला जग भ्रम वाटत नाही कारण त्याचे मूळ वासनेत आहे. बहुतेक सर्वांच्या वासना ढोबळमानाने सारख्याच असतात. त्यामुळे जग खरे वाटते.

**पू. बाबा :** वासनांच्या मुळाशीही मी कर्ता ही जाणीव आहे. ही जाणीव जाऊन त्याच्याऐवजी माझे कर्तृत्व काही नाही हे जाणवले तर?

**साधक ब :** तसे वाटते ना! आपल्याच भूतकाळाकडे पाहिले की हे सगळे घडले असे वाटते. खरोखर हे मीच केले का असा भ्रम होतो.

**साधक प :** भूतकाळासंबंधी नाही, आत्ता तसे वाटले पाहिजे.

**साधक ग :** भूतकाळाबद्दल तसे वाटते कारण त्यातला आपला कर्तेपणाचा अभिनिवेश संपलेला असतो. मात्र आज जे घडते आहे ते घडत नसून मी करतो आहे असेच वाटते. हे जायला, मला वाटते, मागच्या वेळी साधक ड म्हणाले तसे आपण किती सामान्य, नव्हे यःकश्चित आहोत हे स्वतःला पुनःपुन्हा सांगितले पाहिजे.

**साधक ब :** म्हणजे पुन्हा auto suggestion - स्वयंसूचन आले!

**पू. बाबा :** होय, हे मनानेच करायला पाहिजे.

**साधक प :** आज चांगला मी आणि वाईट मी यांचा झगडा चालू आहे. तो मिटवून चांगला मी जास्त बळकट केला पाहिजे, नाहीतर दोन्ही मी नाहीसे झाले पाहिजेत.

**पू. बाबा :** यासाठी उपाय म्हणजे सगुणाचे खरेपण वाटले पाहिजे. ते वाटू लागले की त्यातूनच निर्गुणाकडे जाता येईल. सगुणाची पूजा, उपासना करता करता त्यातून नामात चित्त रमू लागेल. समर्थांनी सांगितले आहे की "सगुणाचेनी आधारें। निर्गुण पाविजे निर्धारें।" म्हणून सगुणाचा आधार घेऊन निष्ठेने नामात राहिले पाहिजे. सगुणाच्या प्रेमातूनच नामाचे प्रेम येईल. भगवंताचे चरित्र किंवा श्रीमहाराजांचे चरित्र आणि त्यांच्या लीला आठवाव्या आणि नामस्मरण करावे म्हणजे मन लवकर एकाग्र होईल आणि वासना क्षीण होतील.

## |२७२| (१२ जून १९९२)

**पू. बाबा :** मागच्या शुक्रवारी आपला भ्रमाचा विषय चालला होता. हा भ्रम नाहीसा कसा करता येईल ते सांगतो. आजपर्यंतच्या ज्ञात इतिहासात कोट्यवधी माणसे आली आणि गेली. त्यापूर्वीही हेच घडले. आणि तरी कालप्रवाह चालू आहे. एक चित्र पाहिले होते. एक डोंगर आहे. त्याच्या कड्यावर मेंढरांचा कळप येतो आहे आणि कड्यावरून एकामागून एक खाली पडून ती मेंढरे गडप होत आहेत. या चित्राला काल असे नांव दिलेले आहे. याच नांवाचे दुसरे एक चित्र पाहिले होते. कोणाचे ते आता आठवत नाही. समुद्राच्या किनाऱ्यावर एक म्हातारा बसलेला आहे. त्याच्या हातात एक कोयता आहे. माणसांच्या झुंडीच्या झुंडी येत आहेत आणि वाळू संपून पाणी सुरू होते तेथे त्या गडप होत आहेत. म्हातारा तिकडे नुसते पाहतो आहे. तत्त्वज्ञान म्हणते की काळ हादेखील भ्रमच आहे.

प्रश्न उभा राहतो की एक परमात्मतत्त्व तेवढेच सत्य आहे आणि जीव आणि जगत् हा जर भ्रम आहे तर तो भ्रम नाहीसा कसा करायचा? या बाबतीत बोलतांना श्रीमहाराज म्हणाले की कंटकेनैव कंटकम्, म्हणजे काट्यानेच काटा काढायचा. जीव आणि जग यांचा भ्रम प्रथम अवतारांच्या भ्रमाने नाहीसा करायचा आणि मग त्याही भ्रमाचा निरास करून परब्रह्म जाणायचे. तथापि जगाचा भ्रम आणि अवतारांचा किंवा सत्पुरुषांच्या चरित्राचा भ्रम यात फरक आहे. त्यांच्या लीला किंवा कर्म दिव्य आहेत. 'जन्म कर्म च मे दिव्यम्' असे भगवंतांनी सांगितले आहे. त्यांचे कर्म दिव्य असते कारण ते करतांना त्यांच्या ठिकाणी 'मी हे करतो' असा अहंभाव नसतो. याला एकनाथ महाराजांनी अकर्तात्मयोग म्हटलेले आहे. ते म्हणतात, माझ्या गुरूंनी म्हणजे जनार्दन स्वामींनी मला अकर्तात्मयोग शिकवला. पॉल ब्रंटननेही त्याच्या एका ग्रंथात फार छान तत्त्वज्ञानपूर्ण युक्तिवाद (philosophical argument) केला आहे. तो म्हणतो की जगात घडणारी सर्व कर्मे हा जर भ्रम असला तर सत्पुरुषांची कर्मेपण भ्रमच ठरतात. तथापि ती कर्मे दिव्य कर्मे असतात; कारण त्यांच्या अनुकरणाने माणूस बंधनातून (भ्रमातून) मुक्त होतो.

आपल्या शक्तीने हा भ्रम दूर करता येणे अशक्य आहे असे मागच्या शुक्रवारपासून मी कां म्हणतो आहे ते आता तुमच्या लक्षात येईल. ध्यानाखेरीज समाधी किंवा आत्मदर्शन शक्य नाही; मग तुमचा मार्ग कोणताही असो.

नामस्मरण करत असलात तर त्यातदेखील ध्यानाची अवस्था आलीच पाहिजे. **Meditation is a gateway to God realization** असे गुरुदेव रानड्यांनी म्हटले आहे. मेडिटेशन म्हणजे ध्यान आणि त्यानंतर Ecstasy म्हणजे समाधी. धारणा - Contemplation, ध्यान आणि समाधी ही अष्टांगयोगाची अंतरंग साधने आहेत. 'तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्'॥ ३.२॥ असे पतंजलींनी ध्यानासंबंधी सूत्र दिले आहे. धारणेमधे चित्त कोणत्या तरी एका देशावर, मूर्तीवर म्हणा स्थिर करायचे असते. 'देशबन्धश्चित्तस्य धारणा'॥ ३.१॥ पण ध्यानात त्या मूर्तीवर स्थिर केलेल्या चित्ताला कोणती तरी भावना, उदाहरणार्थ, रामाचे पितृप्रेम आलंबनासाठी घेऊन त्या भावनेचा प्रत्यय म्हणजे अनुभव विलीन होऊ न देता पुढील पुढील क्षणांत टिकवावयाचा असतो. अशा प्रकारे तो अनुभव किंवा वृत्ती टिकवणे ही त्या प्रत्ययाची एकतानता आणि ती टिकू लागली की त्या अवस्थेला ध्यान म्हणतात. धारणेपेक्षा ध्यानाची अवस्था जास्त सूक्ष्म आहे. वेगळ्या भाषेत सांगायचे झाले तर सामान्यत: आपले मन जडामधे म्हणजे भूताकाशात असते. तेथून ते चित्ताकाशात न्यायचे. असे ते नेता आले म्हणजे भ्रमच, पण तो जडदेहातून सूक्ष्मदेहात प्रवेश करतो. शेवटी ध्यानाने तो नाहीसा होऊन केवळ चिदाकाश उरते.

**साधक ज** : हे चित्ताकाश आणि चिदाकाश म्हणजे काय ते परत एकदा सांगा.

**पू. बाबा** : आपल्याला पाहिजे तेव्हां आपण आपल्या मनापुढे रामाची किंवा श्रीमहाराजांची मूर्ती आणू शकलो तर धारणा साधली म्हणता येईल. तथापि ती धारणा सूक्ष्म देहात शिरली म्हणता येणार नाही. पण रामाचे किंवा श्रीमहाराजांचे चरित्र आठवून त्यामधे वृत्ती लीन होऊ लागली की ध्यान साधून मन चित्ताकाशात उतरले म्हणता येईल. चिदाकाश हा त्याच्या पलीकडचा, शब्दांनी सांगण्यास अवघड असा प्रांत आहे.

**साधक ज** : आज तरी श्रीमहाराजांचे चिंतन म्हटले की त्यांचा देहच डोळ्यासमोर उभा राहातो; आणि ते तर म्हणतात की मी देहात नव्हतोच. तेव्हां या दोन्हींचा मेळ कसा घालायचा ?

**पू. बाबा** : ते बरोबर आहे. भ्रम नाहीसा करायला आपल्याला सगुणापासूनच सुरुवात केली पाहिजे. प्रथम श्रीमहाराजांच्या देहाचे चिंतन, नंतर त्यांच्या गुणांचे चिंतन या मार्गानेच जावे लागेल. हे चिंतन करतांना ती ती घटना घडतांना जणू काही आपण प्रत्यक्ष तेथे आहोतच अशा भावनेने ती

जिवंत (relive) केली पाहिजे. कारण घडून गेलेली प्रत्येक घटना कालात कोठेतरी आहेच. ती नष्ट झालेली नाही.

युरोपमधे एक बाई होती. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेली. ती क्रूसावर चढवलेल्या ख्रिस्ताचे (Christ in Passion) चिंतन करीत असे. सेंट जोन ऑफ लिमादेखील असेच ध्यान करीत असे. (पहा : अध्यात्म संवाद भाग पहिला, संवाद क्र. ७८) ख्रिस्ताच्या या तीव्र चिंतनाने या बाईच्या दोन्ही तळहातांतून खिळे ठोकल्यासारख्या जखमा होऊन त्यातून रक्त वाहात असे. आश्चर्य म्हणजे त्या जखमा चिघळत किंवा सडत नसत. (मिस्टिसिझम संबंधीच्या एका पुस्तकात तिचे चित्र दिलेले आहे ते पू. बाबांनी दाखवले. चित्राखाली तिचे Beatrix असे नांव दिलेले आहे) जखमा ब-या होत पण त्यांच्या खुणा राहात. या खुणांना ते stigmata म्हणतात. (डिक्शनरीत stigmata चा ecclesiastical म्हणजे धर्मोपदेशकांच्या संदर्भात Marks corresponding to those left by the nails and spear at the Crucifixion developed by st. Francis of Assisi and others and attributed to divine favour असा अर्थ आहे. Anatomy म्हणजे शरीरशास्त्राच्या संदर्भात spots on person's skin that bleed periodically or under mental stimulus असा अर्थ दिलेला आहे).

**साधक ग :** पतंजलींनी प्रत्यय एकतानता म्हटले आहे. प्रत्यय म्हणजे काय ?

**पू. बाबा :** प्रत्यय म्हणजे अनुभव. एकच अनुभव किंवा वृत्ती म्हणा, एकसारखी टिकणे ही प्रत्ययाची एकतानता. तुकाराम महाराजांना ध्यानीं, मनीं, स्वप्नीं पांडुरंग दिसू लागला तसे एकसारखे झाले पाहिजे. ध्यानाचे चार प्रकार सांगता येतील. वास्तविक ते दोनच प्रकार आहेत. स्थूलातील ध्यानात चित्त प्रथम सगुण मूर्तीचे ध्यान करीत राहील. नंतर मूर्तीऐवजी ते गुणांवर स्थिर होईल. रविवारी ज्ञानेश्वरी सांगायची असते म्हणून त्याबद्दलची काही पुस्तके पाहतो आणि मग रविवारी सांगतांना माझ्या डोळ्यांसमोर ती वाचलेली पाने, ओव्या इत्यादी दिसतात. सूक्ष्मातील ध्यानात चित्त प्रथम गुणांच्याही पलीकडे जे भगवत्तत्त्व त्याचे चिंतन करू लागेल आणि नंतर ते नामाच्या स्मरणात, चिंतनात रमून जाईल; कारण नाम हा भगवंताचा पहिला विग्रह आहे. ते स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारे आहे. म्हणून कंटकेनैव कंटकम् म्हणजे दिव्य भ्रमानेच संसारभ्रम नाहीसा करावा लागेल.

नामस्मरणाला बसतांना श्रीमहाराजांच्या चरित्रातला एखादा प्रसंग मनात घोळवावा आणि त्या प्रसंगाचे चिंतन करीत नाम घ्यावे. नाहीतरी नाम घेतांना चित्त कुठे एकाग्र होते? काहीतरी फालतू विचार चालू असतात. त्यापेक्षा सत्पुरुषांच्या दिव्य जीवनाचे चिंतन करावे. उदाहरणार्थ, शबरी घ्या. अनाडी स्त्री. पण श्रद्धा केवढी! कोणत्याही दिवशी राम येईल म्हणून रोज त्याच्या स्वागताची तयारी करायची. तिचा भाव अनुकरण करण्यासारखा आहे. भगवंताचे दर्शन होण्यासाठी दोन गुणांची आवश्यकता आहे असे अरविंदांनी म्हटले आहे. Intense aspiration and infinite patience. शबरीच्या ठिकाणी या दोन्ही गुणांचा उत्कर्ष आढळतो. भरत किंवा हनुमंत हे फार वरच्या दर्जाचे आहेत. प्रल्हादही तसाच. तेव्हा आपल्याला अनुकरणासाठी शबरी बरी. तुलसीदासांनाही रामाशिवाय दुसरे काही सुचतच नसे. भ्रमच म्हणायचा तो; पण तो दिव्य होता. विनयपत्रिका, दोहावली, कवितावली, रामचरितमानस सर्वात एका रामाखेरीज दुसरे काही नाही. सूरदासही तसेच.

श्रीमहाराज अनेकदा द्रौपदीची कथा सांगत. पांडव वनवासात असतांना एकदा श्रीकृष्ण त्यांना भेटायला गेले. त्यावेळी द्रौपदीने श्रीकृष्णाला विचारले की भरसभेत कौरव माझे वस्त्रहरण करत होते तेव्हां यावयाला तू इतका उशीर का केलास? यावर श्रीकृष्ण म्हणाले की, तुला वाटत होते की सिंहासारखे हे माझे पाच पती माझे रक्षण करतील. तो आधार सुटल्यावर वाटले की भीष्म, द्रोण, कृपाचार्य सोडवतील. पण तेही गप्प बसले. दु:शासनाने वस्त्र ओढल्यावर जेव्हां तुझा निरीवरचा हात सुटला तेव्हांच तू खरी शरण आलीस आणि मला यावेच लागले. वास्तविक सर्वकाळ मी तेथेच होतो; पण तुझ्या दृष्टीने नव्हतो.

तशीच एक हरदासी गोष्ट आहे. एकदा कृष्ण आणि रुक्मिणी खेळत बसलेले असतांना कृष्ण लगबगीने उठले आणि उंबऱ्यापर्यंत जाऊन परत आले. रुक्मिणीने विचारले, हे काय? तेव्हां ते म्हणाले, माझा एक भक्त रस्त्याने जात होता आणि लोक त्याला दगड मारीत होते. त्याचे रक्षण करण्यासाठी म्हणून मी निघालो. पण त्याने डोक्यावर हात धरल्यावर माझी खात्री झाली की तो स्वत:चे रक्षण करतो आहे. माझ्या मदतीची त्याला गरज नाही म्हणून परत आलो. संपूर्ण शरणागती म्हणजे तू ठेवशील तसे; प्रतिकार नाही.

**साधक ग :** स्वामी रामदास तसे वागले. तुम्ही मागे म्हणाला होतात तसे चांगल्या अर्थाने obsession झाले पाहिजे.

**साधक ब** : यासाठी, मला वाटते, बाकीचे सगळे वाचन वगैरे बंद झाले पाहिजे. ते फार विक्षेप निर्माण करते.

**पू. बाबा** : मी जे भ्रमाचे विवरण केले त्या बाबतीत तुम्हांला काय वाटते ते सांगा.

**साधक ग** : सांगायचे काय? ही आचरणात आणायची गोष्ट आहे.

**साधक ब** : आज घरातून निघतांना माझ्या मनात विचार आला होता की तुम्ही भ्रमाबद्दल सांगताहात पण आम्हांला तो केवळ एक शब्द आहे. भ्रमाची खरी कल्पना नाही. वाटले की तुम्ही काही सांगाल, आम्ही ते लिहूनही ठेवू, पण तरी शेवटी ते शब्दच राहतील.

**पू. बाबा** : पण काही थोडा तरी उलगडा झाला का?

**साधक ब** : अंधुकशी का होईना, कल्पना आली. भ्रम नाहीसा करण्यासाठी भ्रमाचा उपयोग करून घेण्याखेरीज दुसरा मार्ग नाही.

**पू. बाबा** : तरीदेखील आपण पुन्हा एकदा जास्त विचार करू.

## |२७३| (१९ जून १९९२)

गेले तीन-चार दिवस पू. बाबांना सर्दीचा त्रास होतो आहे. आज शंभर अंशांपर्यंत तापही होता. आम्ही गेलो तेव्हां थोडा कमी आहे म्हणाले.

**पू. बाबा** : नुकतेच रिझर्व बँकेतले दोघे अधिकारी आले होते. त्यांच्यापैकी एकजण श्रीमहाराजांचे अनुग्रहीत आहेत. त्यांनी सांगितले की त्यांचे काका आणि आजोबा रमणमहर्षींकडे जात असत. त्यांच्या काकांनी एकदा रमणमहर्षींना विचारले की आत्मज्ञानाचा मार्ग कोणता? भगवान म्हणाले, दोन मार्ग आहेत. पहिला मार्ग विचाराचा. पण तो अवघड आहे. आद्य शंकराचार्य किंवा नागार्जुन यांच्यासारख्यांना तो शक्य आहे. दुसरा मार्ग त्यापेक्षा कमी अवघड आहे. तो म्हणजे शरणागती. काकांनी विचारले, शरणागती म्हणजे काय? भगवान म्हणाले, शरण जा म्हणजे कळेल. पुढे या काकांनी माझ्याकडे आलेल्या या गृहस्थांना - पुतण्याला विचारले की ही शरणागती शिकविणारे कोणी आहेत का? ते म्हणाले, श्रीमहाराज आहेत. म्हणून त्यांना गोंदवल्याला जाण्याची इच्छा झाली. श्री. हुच्चूराव आणि ते जाणारही होते पण त्यापूर्वीच काका वारले. सांगण्याचा मुद्दा असा की रमणांनीही शरणागतीला महत्त्व दिलेले आहे. माझा प्रश्न आहे की शरणागतीला सुरुवात कशी करायची? व्यवहारात

आपण पैसा देणाऱ्याला किंवा विद्या देणाऱ्याला शरण जातो, त्याचे उपकार मानतो, पण आपल्या गुरूंना, श्रीमहाराजांना शरण कसे जायचे ?

**साधक ग :** विद्या किंवा पैसा देणारे आणि श्रीमहाराज यात फरक आहे. पहिल्या उदाहरणात आपण आणि ते दोघेही दृश्यात आहोत. पण श्रीमहाराज सूक्ष्मात आहेत. त्यांना शरण जायचे म्हणजे त्यांच्या पातळीवर म्हणजे जडातून सूक्ष्मात जाता आले पाहिजे. आज ते आम्हांला जमत नाही म्हणून मला वाटते की आज त्यांना आवडते ते करायचे आणि त्यांना आवडत नाही ते टाळायचे असे करू लागलो तर शरण जाणे शक्य होईल.

**साधक ज :** शरण जायला 'मी' आड येतो. तो आहे तोपर्यंत शरण जाता येणार नाही.

**साधक ब :** 'मी' जाणे ही फार वरची अवस्था आहे. 'मी' गेलो की साधक तयारच झाला. म्हणून सुरुवातीला 'मी' घालवायच्या प्रयत्नापेक्षा माझे कर्तेपण लंगडे आहे ते घालवायचा प्रयत्न केला पाहिजे. मी कर्ता नाही आणि जे घडते ते श्रीमहाराज करत आहेत असा भाव आला पाहिजे.

**साधक प :** शरण जायचे म्हणजे माझे कर्तेपण नाहीसे करायचे, मी नाहीसा करायचा आणि हे मीच करायचे आहे, असे हे त्रांगडे आहे. कर्तेपण घालवायच्या प्रयत्नांपेक्षादेखील शरणागती प्रथम जाणिवेपर्यंत पोचली तर पुढे ती टिकून राहीलसे वाटते. कारण माझे अस्तित्व आणि कर्तेपण जाणिवेत आहे.

**पू. बाबा :** गुरूला शरण जाण्याच्या बाबतीत कृष्णप्रेमनी म्हटले आहे की GIVE EVERYTHING, ASK NOTHING. (दिलीपकुमार रॉय यांची शिष्या इंदिरा हिला आशीर्वाद देतांना कृष्णप्रेम म्हणाले, "I have only one thing to tell you - the greatest mantra I have learnt from my GURU - GIVE EVERYTHING, ASK NOTHING - the supreme key to HIS HEART'S treasury." Yogi Shri Krishnaprem by D. K. Roy p. 129. कृष्णप्रेमसंबंधी रमणमहर्षी म्हणाले होते की, "a bhakta and jnani in one, a rare combination". (Ibid p. 126)

**साधक प :** शरण जायची पहिली पायरी म्हणजे आग्रह गेला पाहिजे. आग्रह हे कर्तेपणाचे, अहंकाराचे व्यक्त रूप आहे. सगळे काही तोच करतो असे वाटू लागले की आग्रह कमी होईलच.

**पू. बाबा :** बरोबर आहे. दुसऱ्यासाठी काही करतांना मी त्याच्यासाठी काहीतरी करतो आहे असे न वाटता, त्याच्यामुळे मला ही सेवेची संधी

मिळाली असे वाटून कृतज्ञता वाटली पाहिजे. शिवभावाने जीवाची सेवा करावी असे श्रीरामकृष्ण आपल्या भक्तांना सांगत असत.

**साधक :** त्याचबरोबर, मला वाटते, श्रीमहाराजांच्याबद्दल प्रेम वाटू लागून त्यातून शरणागती येईल. मी भजन म्हणावे म्हणून माझा नातू हट्ट धरतो तेव्हां त्याच्यामुळे भगवंताचे भजन करायची मला संधी मिळते आहे असे मला वाटते. शरणागती म्हणजे काय ते मला माहीत नाही, पण आत कोठेतरी श्रीमहाराजांबद्दल प्रेम आहे. आज म्हणावे तसे नामस्मरण होत नाही, कारण त्याला तसे motivation - प्रेरक हेतू नाही. श्रीमहाराजांबद्दल मला प्रेम वाटते, तेव्हां त्यांना आवडते म्हणून मी नाम घेतो हे मनाला पटले की त्या नामाला मोटिव्हेशन मिळून साधन चांगले होईल.

**पू. बाबा :** भजनाचे ठीक आहे, त्याचा साधनाशी संबंध आहे. पण इतर व्यवहार करतांना कसे करायचे?

**साधक प :** इतर व्यवहार करतांना काही अडचण येईलसे वाटत नाही. बऱ्याचशा गोष्टी आपण सवयीने करतो. अडचण अशी आहे की साधन हाही सवयीचाच भाग होतो.

**साधक ब :** आतून स्वच्छ झाल्याखेरीज खरी शरणागती येणार नाही. त्यासाठी करत राहाणे हाच मार्ग आहे. माझे साधन असे झाले पाहिजे, तसे झाले पाहिजे असा आग्रह का? तो ज्ञानी आहे, सर्वशक्तिमान आहे. माझे साधन कसे करून घ्यायचे, किती करून घ्यायचे हे देखील तोच ठरवतो. आज माझ्या मीचे प्रोजेक्शन इतके आहे की त्याला आत जागाच नाही. हे प्रोजेक्शन नाहीसे झाले की there is vast inner space. ती त्याने व्यापली की एकदम सगळे मोकळे होईल.

**साधक प :** वेगळ्या शब्दांत तुम्ही शरणागतीच सांगत आहात.

**साधक ज :** शरणागतीमधे मी उरता कामा नये. तो विलीन झाला पाहिजे. मिठाची बाहुली समुद्रात विरघळते तसे ते आहे.

**साधक प :** तुम्ही दुसरे टोक बोलत आहात. त्याच्या आधीची मी आणि तू ही भक्तीची अवस्था मोठी गोड असली पाहिजे.

**साधक ग :** शरण जातांना मी शरण जातो. त्यानंतर माझी इच्छा राहात नाही. तुझी इच्छा ती माझी इच्छा असे होते. म्हणजे माझे स्वातंत्र्य आणि कर्तृत्व काही उरले नाही तरी मी आणि तू राहातातच.

**पू. बाबा :** ज्ञानेश्वर महाराजांनी हात पाय तोडलेला माणूस जसा घरातच राहातो म्हटले आहे तसा तो मी असतो. काही म्हणा, आता हे जमले पाहिजे. जपात् सिद्धिः जपात् सिद्धिः असे म्हटले आहे. बहुधा मनुस्मृतीत असावे. जपाने सिद्धी होते कारण तो मंत्र देतांना गुरूने त्यात आपली शक्ती घातलेली असते. तो शक्तिमय असतो. म्हणून एकसारखे आपल्या गुरूच्या अस्तित्वाचे भान पाहिजे. आपली प्रत्येक कृती ते पाहात आहेत असे वाटू लागले की त्यांच्यासमोर करायला ज्याची लाज वाटेल असे कर्म माणसाच्या हातून घडणारच नाही. हा भाव सतत टिकला की देहशुद्धी आणि चित्तशुद्धी होईल आणि आतून मोकळे झाल्यामुळे त्यांना शरण जाता येईल. त्या दृष्टीने सुरुवातीची शरणागती आणि वासनाशून्य झाल्यानंतरची शरणागती ह्या दोन्ही शरणागतीच असल्या तरी त्यात महदंतर राहील.

## |२७४| (२६ जून १९९२)

**पू. बाबा :** गेल्या शुक्रवारी शरणागतीसंबंधी चर्चा चालू होती, त्यावर आणखी काही विचार केला का?

**साधक ड :** मीपणा, माझे कर्तेपण जाईपर्यंत शरणागती होईलसे वाटत नाही आणि माझे कर्तेपण मीच नाहीसे करणे शक्य नाही. म्हणून मला श्रीमहाराजांबद्दल प्रेम वाटते, त्यांना आवडेल ते करायचा मी प्रयत्न करतो आहे हा भाव वाढवून नामस्मरण करावे म्हणजे शरणागती येईल. श्रीमहाराजच सर्व काही करतात हे बुद्धीच्या पातळीवर जाणवत असले तरी दृश्याची खेच जबरदस्त आहे. त्यामुळे आपल्या प्रयत्नाने यातून बाहेर पडणे शक्य नाही. म्हणून आपल्यासाठी प्रेमाचा मार्गच खरा असे वाटते.

**पू. बाबा :** पण श्रीमहाराजांबद्दल खरे प्रेम आहे का?

**साधक ड :** अगदी टोकाचे प्रेम नसेल. तोच हवा ही स्थिती नसेल पण तो हवा येवढे तरी खास वाटते.

**पू. बाबा :** गेले आठ दिवस मी यावर बराच विचार केला. मला काय वाटते ते सांगतो. श्रीमहाराजांना किंवा आपल्या गुरूंना शरण जायचे ते सर्व बाजूंनी शरण जायचे आहे, कारण जीवन समग्र आहे. शरणागतीच्या तीन पायऱ्या सांगता येतील. १) पहिली पायरी म्हणजे जगात आणि माझ्या जीवनात जे काही घडते आहे ते सगळे बरोबरच आहे. जरी मला अप्रिय वाटणारी गोष्ट झाली तरी ती बरोबरच आहे. ते करतात ते माझ्या हिताचेच करतात असे

वाटले पाहिजे. २) दुसरी पायरी म्हणजे माझे कर्तृत्व खरे नाही, ते लंगडे आहे याची खात्री पटली पाहिजे. मी अमुक करणार असे म्हणतो पण ते तसे घडतेच असे नाही. म्हणून त्यांची इच्छा तशी म्हणजे माझ्या इच्छेपेक्षा वेगळी होती असे नंतर म्हणण्यापेक्षा सुरुवातीपासूनच त्यांची इच्छा असेल तसे घडेल म्हणायला काय हरकत आहे. माझे कर्तृत्व लंगडे आहे, ते खरे नाही आणि तो कर्ता आहे या दोन्ही गोष्टी एकाच वेळी घडणाऱ्या आहेत. ३) तथापि, हे पटले तरी काही वेळा आपली इच्छा, आपला आपल्या कर्तृत्वासंबंधीचा भ्रम उफाळून येत असतात. ते नाहीसे होऊन, कर्तृत्व त्यांचे आहे ह्या विश्वासावर आरूढ होणे ही शरणागतीची तिसरी पायरी आहे. ही साधली की शरणागती पूर्ण झाली.

**साधक ब :** हे सगळे करण्याच्या आड माझे मनच येते. ते जीवनाचा समग्र विचार करू देत नाही कारण तसा विचार करता येऊ लागला तर त्यात त्याचे मरण आहे. म्हणून काहीतरी करून या मनाला किंवा खोट्या मी ला बाजूला ठेवता आले पाहिजे.

**साधक क :** जीवनात नित्य काय आहे आणि अनित्य काय आहे यावर विचार करून अनित्य सोडायचा निश्चय झाला तरच हे घडेल.

**साधक प :** पण ते सोपे नाही. आपल्या जाणिवेत मीपणा खोल आहे.

**पू. बाबा :** माणसाची स्मृती त्याला त्रास देते. पूर्वी झालेले अपमान किंवा घटना माणूस विसरू शकत नाही. तसेच पुढे करायच्या गोष्टींचे कर्तृत्वही स्वत:कडे घेतल्यामुळे तो त्याच्या चिंतनात राहातो.

**साधक ग :** पूर्वीच्या स्मृती तुम्ही म्हणता तसा त्रास देतात असे वाटत नाही.

**साधक प :** सामान्य स्मृतींचा तसा त्रास होत नाही. मात्र जेथे भावना गुंतलेली असेल त्या स्मृती चांगल्या असल्या तर माणूस त्यांनी सुखावतो आणि त्या वाईट असतील तर अस्वस्थ होतो.

**साधक ज :** चांगल्या स्मृतींत माणूस क्वचितच गुरफटतो. वाईट स्मृती मात्र त्याला त्रास देतात.

**साधक प :** मला वाटते, काय घडले किंवा त्यापेक्षा काय घडावे यावर आपण खूप विचार करतो. आत्ता या क्षणाला मी बोलत असतांना काय घडले पाहिजे याचा आपण विचारच करत नाही.

**पू. बाबा :** तुमचे हे म्हणणे महत्त्वाचे आहे.

**साधक प** : तीन्ही अवस्थांमध्ये, तीन्ही काळात जो मी आहे त्याला जाणायला आत जाण्याखेरीज दुसरा मार्ग नाही.

**पू. बाबा** : यासाठी पाँडीचरीच्या मदरनी समग्र जीवनाचा विचार करून शरण जायचा मार्ग सुचवला आहे.

**साधक ग** : मागे तुम्ही जीवनात कोणत्या गोष्टींची cash value वाटते, म्हणजेच valuation कशाचे आहे यावर विचार करावा असे सांगितले होते. त्या संदर्भात साधक प म्हणतात ते खरे आहे. one must encash the present.

**साधक ब** : त्याच्या आड तो खोटा मी येतो कारण खरे valuation होण्यात त्याच्या अस्तित्वाला धोका आहे.

**पू. बाबा** : त्यागाखेरीज शरणागती नाही. माहेर सोडल्याशिवाय जसे सासरचे सुख नाही तशी संसाराची आसक्ती गेल्याखेरीज परमार्थ नाही.

## |२७५| (३ जुलै १९९२)

**पू. बाबा** : तुमच्यासाठी ह्या पुस्तकातले - Mother's Agenda Vol.I काही वाचून दाखवणार आहे. परमार्थाचा अनुभव आणि परमात्मस्वरूप म्हणजे काय याची त्यावरून थोडीशी कल्पना येईल. मदरच्या आणि ब्रह्मानंद महाराजांच्या अनुभवात विलक्षण साम्य आहे. वास्तविक ब्रह्मानंद महाराजांनी १९१८ मधे देह ठेवला आणि मदरनी त्यांचा १९५८ मधील अनुभव सांगितला आहे. श्री. भीमरावांनी त्यांच्या काकांना म्हणजे ब्रह्मानंद महाराजांना तीन-चार वेळा तरी विचारले होते की श्रीमहाराजांनी तुम्हांला काय दिले? प्रथम त्यांनी तिकडे दुर्लक्ष केले. पण नंतर म्हणाले, भिमू, समर्थांनी (ते श्रीमहाराजांना समर्थ म्हणत) काय दिले म्हणून सांगू? अरे, आत तेच आहेत. मी वेगळा राहिलोच नाही. ''तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें'' सारखी ती अवस्था होती.

पुढे एकदा श्री. भीमराव श्रीमहाराजांना (पेटीवर) म्हणाले की महाराज, आपण काकांना दिले ते मला द्या. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, एका माणसाला त्याचा मित्र स्टेशनवर पोचवायला गेला होता. तो माणूस डब्याच्या दारात उभा राहून मित्राला डब्यात बोलवत होता. तेव्हां मित्र म्हणाला की अरे, तू बाजूला हो. तू बाजूला झाल्याखेरीज मी आत कसा येणार? तसे तुम्ही आपला मी बाजूला करून जागा केल्याखेरीज मला आत कसे येता येईल? म्हणजे हा मी नाहीसा करून त्यांना आत जागा करून दिली पाहिजे.

आता मदर काय सांगतात ते ऐका. १ मे १९५८ तारीख दिलेली आहे. पृष्ठ १५४वर त्या म्हणतात :

"These days I am having every possible experience in the body, one after the other. Yesterday and this morning... oh, this morning !"

"I saw there (center of the heart) the Master of the yoga; he was no different from me, but nevertheless I saw him, and he even seemed slightly imbued with color. Well, he does everything, he decides everything, he organizes everything with an almost mathematical precision and in the smallest details - everything." (P. 154.)

("अलीकडे माझ्या या देहात मला सर्व प्रकारचे (पारमार्थिक) अनुभव एकामागून दुसरा असे येऊ लागले आहेत. काल आणि आज सकाळी... होय, आजच सकाळी!"

"मी येथे (हृदयाच्या मध्यभागी) योगीश्वर पाहिला. तो माझ्याहून कोणी वेगळा नव्हता, तथापि तरीही मी त्याला पाहिले आणि त्याच्या त्या दिसण्यामधे रंग भरलेला आहे असे वाटले. खरोखर सर्व काही तोच करतो. सर्व गोष्टी तोच ठरवतो. अगदी गणिती अचूकपणाने तो सगळी जुळणी करतो. प्रत्येक गोष्टीतले अगदी बारीक सारीक तपशील देखील तो भरतो.")

पुढे १० मे १९५८ रोजी पृष्ठ १५७वर त्या सांगतात :

"I know that the experience I had the other day is new and that I was the first person on earth to have it. But it is the only thing that is true. All the rest..."

"I began my sadhana at birth, without knowing that I was doing it. I have continued it throughout my whole life, which means for almost eighty years (even though for the first three or four years of my life it was only something stirring about in unconsciousness). But I began a deliberate conscious sadhana at about the age of twenty-two or twenty-three, upon prepared ground. I am now more than eighty years old : I have thought of nothing but that, I have no other interest in

life, and not for a single minute have I ever forgotten that it was THAT that I wanted. There were no periods of remembering and forgetting : it was continuous, unceasing, day and night, from the age of twenty-four and I had this experience for the first time about a week ago ! So, I say that people who are in a hurry, people who are impatient, are arrogant fools." (P. 157)

("मला माहीत आहे की नुकताच मला आलेला अनुभव नवीन आहे; इतकेच नव्हे तर तो अनुभव येणारी पृथ्वीवरील मी पहिली व्यक्ती आहे. पण फक्त तेच सत्य आहे. बाकीचे सगळे..."

"मी जन्मापासूनच माझ्या नकळत साधनेला सुरुवात केली. माझ्या पुढील सर्व जीवनात मी ती चालू ठेवली. म्हणजे आज जवळजवळ ऐंशी वर्षे साधना चाललेली आहे. (अर्थात जन्मानंतरची पहिली तीन-चार वर्षे ती अबोध मनातून जागृत झालेली होती) वयाच्या बाविसाव्या किंवा तेविसाव्या वर्षी प्रयत्नपूर्वक आधी तयार झालेल्या भूमीवर मी जाणीवपूर्वक साधना करू लागले. आता माझे वय ऐंशी वर्षापेक्षा जास्त आहे. ह्या सर्व काळात मी आत्मदर्शनाखेरीज दुसऱ्या कशाचाही विचार केलेला नाही. जीवनात मला दुसऱ्या कोणत्याही गोष्टीत रस नाही आणि मला ते (आत्मदर्शन) पाहिजे याचा मला कधी क्षणभरही विसर पडलेला नाही. विस्मरणाचा काळ आणि स्मरणाचा काळ असे कधी झालेलेच नाही. चोविसाव्या वर्षापासून रात्रंदिवस कधीही विश्रांती न घेता अथकपणे अखंड स्मरण चालू आहे. आणि आता एक आठवड्यापूर्वी मला हा अनुभव आला! म्हणून मी म्हणते की ज्या लोकांना घाई झालेली आहे, जे उतावळे आहेत (ज्यांना धीर नाही) ते खरोखर उद्धट आणि मूर्ख आहेत." पृष्ठ १५७)

साधनमार्ग इतका खडतर आहे. सर्व काळ आपल्या ध्येयावर दृष्टी ठेवून साधन केले. मला काय पाहिजे याचा क्षणभरही विसर पडला नाही असे त्या म्हणतात. आणि मला हे फार आवडले. There were no periods of remembering and forgetting.

**साधक ग :** हेच अखंड अनुसंधान.

**पू. बाबा :** Master of Yoga पाहिला असे त्या म्हणतात. म्हणजे काय ते स्पष्ट होत नाही. शंकराला योगीश्वर म्हणतात आणि कृष्णाला योगेश्वर म्हणतात;

गीतेत म्हटलेच आहे 'यत्र योगेश्वर: कृष्णो यत्र पार्थो धनुर्धर:।' केवढा विलक्षण अनुभव आहे! फ्रान्समधे जन्मलेली बाई, भारतात साधना केली. सगळेच और आहे.

**साधक प :** हे घेऊनच ती जन्माला आली. मागच्या जन्मी ह्या वासनेतच तिचा अंत झालेला असला पाहिजे. अगदी लहानपणापासूनच तिला अनुभव येऊ लागले. तीन-चार वर्षांची असतांना फिरत होती आणि एकाएकी दहा-बारा फूट खोल खड्ड्यात पडली आणि कुणीतरी तिला अलगद झेलले! पुढे तिच्या वाचनात भगवद्गीता आली. अरविंदांना भेटण्यापूर्वीच तिने त्यांना पाहिले होते. अशी जी उदाहरणे असतात त्यात पूर्वजन्मीच्या साधनाचेच continuation असते.

**पू. बाबा :** हे खरे आहे. पण नामाची निष्ठा केवढी आहे! त्याला ती मंत्र म्हणते. झोपेबद्दल त्या काय सांगतात ते ऐका :

"Myself, I go to bed very early, at eight o' clock. It is still quite noisy everywhere, but I don't mind; at least I am sure of no longer being disturbed. First you must stretch out flat and relax all your muscles, all your nerves - you can learn this easily - become like a 'dishrag' on the bed, as I call it; there should be nothing left." (हा शवासनाचा अभ्यास आहे - पू. बाबा) "And if you can also do that with the mind, you get rid of a lot of idiotic dreams that make you more tired when you wake up than when you went to bed; they are the result of the cellular activity of the brain going on uncontrollably, which is very tiring, Therefore, relax fully, bring everything to a complete tensionless calm in which everything has stopped. But this is only the beginning."

"Once I am relaxed, I have developed the habit of repeating my mantra. But it's very strange with these mantras - I don't know how it is for others; I'm speaking of my own mantra, the one I myself found - it came spontaneously. Depending on the occasion, the time, depending on what I might call the purpose of repeating it, it has quite different results. For example, I use

it to establish the contact while walking back and forth in my room - my mantra is a mantra of evocation; I evoke the supreme and establish the contact with the body."

"This is the main reason for my japa. There's a power in the sound itself, and by forcing the body to repeat the sound, you force it to receive the vibration at the same time. But I've noticed that if something in the body's working gets disturbed (a pain or disorder, the onset of illness) and I repeat my mantra in a certain way - still the same words, the same mantra, but said with a certain purpose and above all in a movement of SURRENDER, surrender of the pain, the disorder, and a cell, like an opening - it has a marvellous effect. The mantra acts in just the right way, in this way and in no other. And after a while everything is put back in order. And simultaneously, of course, the precise knowledge of what lies behind the disorder and what I must do to set it right comes to me. But quite apart from this, the mantra acts directly upon the pain itself."

"I also use my mantra to go into trance. After relaxing on the bed and making as total a self-offering as possible of everything, from top to bottom, and after removing as fully as possible all the resistance of the ego, I start repeating the mantra. After repeating it two or three times, I am in trance (at the beginning it took longer). And from this trance I pass into sleep; the trance lasts as long as necessary and, quite naturally, spontaneously, I pass into sleep. And when I come back, I remember everything. The sleep was like a continuation of the trance. And essentially, the only reason for sleep is to allow the body to assimilate the results of the trance, than to allow these results to be accepted throughout and to let the body do its natural night's work of eliminating

**toxins. My periods of sleep practically don't exist; sometimes they are as short as half an hour or even fifteen minutes. But in the beginning, I had long periods of sleep, one or even two hours in succession. And when I woke up, I did not feel this residue of heaviness which comes from sleep - the effect of trance continued." (PP. 379)**

("मी लवकर म्हणजे रात्री आठ वाजताच झोपते. त्यावेळी आजूबाजूला सगळी गडबड, आवाज चालू असतात पण मला त्याचे काही वाटत नाही. मला त्याचा कधी त्रास झालेला नाही. (त्यासाठी) प्रथम मी पाठीवर झोपून सगळे स्नायू आणि नसा शिथिल सोडते. हे सहज शिकता येते. या स्थितीला एखाद्या पोतेऱ्यासारखे अंथरुणावर पडावे असे मी म्हणते. शरीरात कोणत्याही प्रकारचा तणाव नसावा. आपले मनही असे मोकळे शिथिल करणे तुम्हांला साधले तर झोपेत वेडीवाकडी स्वप्ने पडून जागे झाल्यावर तुम्ही झोपेआधी होता त्यापेक्षा जास्त थकलेले असता, तसे होणार नाही. स्वप्ने ही मेंदूतील पेशींच्या अनियंत्रित हालचालींचा परिणाम असतो, आणि त्यामुळे थकवा येतो. म्हणून पूर्ण स्वस्थ व्हावे. सर्व प्रकारच्या ताणतणावांपासून मुक्त व्हावे. ह्या स्थितीत सर्व क्रिया थांबून सगळे काही शांत झालेले असेल. पण ही केवळ सुरुवात म्हणता येईल."

"अशा प्रकारे मी स्वस्थचित्त झाले की आपल्या मंत्राचा जप करण्याचा मी अभ्यास केलेला आहे. या मंत्राचे सगळे वेगळेच आहे. इतर मंत्रांचे मला माहीत नाही. मी ज्या मंत्राचा जप करते तो मंत्र मला आपोआप स्फुरला. जपाचे कारण, जप करण्याची वेळ, त्यामागचा हेतू यांचे वेगवेगळे परिणाम दिसतात. उदाहरणार्थ, मी खोलीत इकडून तिकडे फेऱ्या मारते तेव्हां 'त्याच्याशी' संबंध ठेवण्यासाठी मला मंत्राचा उपयोग होतो. माझ्या मंत्रात 'त्याला' आवाहन आहे. मी त्या परमात्मतत्त्वाला आवाहन करून त्याचा शरीराशी संबंध प्रस्थापित करते."

"माझ्या जपाचे हेच प्रमुख कारण आहे. ध्वनीमध्ये अशी शक्ती आहे की शरीराने पुन:पुन्हा तो मंत्रोच्चार केला की त्याची स्पंदने शरीरात शिरतात. माझ्या लक्षात आले आहे की शरीरात काही बिघाड झालेला असला तर (मग ती वेदना असो किंवा आजाराच्या सुरुवातीचा बिघाड असो) मी विशिष्ट प्रकाराने जपाचा उच्चार करीत राहाते. तोच मंत्र, तेच शब्द पण विशिष्ट हेतू मनात धरून आणि

मुख्यत: शरण जाऊन तो मंत्रजप केल्यामुळे तो जणू काही वाट काढत शरीरातील पेशींपर्यंत, वेदनांपर्यंत आणि शरीरात झालेल्या बिघाडापर्यंत पोचतो आणि त्याचा आश्चर्यकारक परिणाम दिसून येतो. मंत्राचा योग्य तोच परिणाम झालेला असतो. तो इकडे तिकडे वाया जात नाही आणि थोड्याच वेळात शरीर पूर्वस्थितीस आलेले असते. अर्थात शरीरात नेमका काय बिघाड झाला आहे आणि तो नाहीसा करण्यासाठी काय केले पाहिजे याचे अचूक ज्ञान मला आपोआप होते. पण याखेरीज (असाही अनुभव आहे की) मंत्रजपाचा वेदनांवर, दु:खावर प्रत्यक्ष परिणाम होतो.''

''तंद्रीत जाण्यासाठीही मी माझ्या मंत्राचा उपयोग करते. अंथरुणावर स्वस्थ पडून, आपले सर्व काही 'त्याला' अर्पण करून आणि डोक्यापासून पावलांपर्यंत येणारा 'मी'चा (अहम्‌चा) अडथळा शक्य तितका नाहीसा करून मी जपोच्चारण सुरू करते. जप सुरू झाला नाही तोच मी तंद्रीत जाते. (सुरुवातीला जास्त वेळ लागत असे.) या तंद्रीतूनच मी झोपी जाते. आवश्यक तेवढा वेळ तंद्री आपोआप विनाकष्ट टिकून राहाते आणि मग झोप लागते. जागी होते तेव्हां मला सर्व आठवते. झोप हा जणू त्या तंद्रीचाच भाग असतो. रात्री झोपेचे कार्य शरीरात निर्माण झालेली विषारी द्रव्ये नाहीशी करण्याचे असते. या झोपेचा त्यासाठी उपयोग न होता, तंद्रीचा परिणाम घडावा यासाठीच प्रामुख्याने झोप लागते. माझा झोपेत असा फारसा वेळ जात नाही. काही वेळा झोप अर्धा तास किंवा पंधरा मिनिटेच लागते. सुरुवातीच्या काळात जास्त वेळ म्हणजे सलग तास-दोन तास झोप लागत असे. काही वेळा झोपेतून उठल्यावर जे जाड्य किंवा आळस येतो तसे कधीच होत नाही. तंद्रीचा परिणाम टिकून राहातो.'')

**पू. बाबा :** साधकाने निद्रा कशी घ्यावी ते बाईने सविस्तर सांगितले आहे. भगवद्गीतेतही म्हटले आहे की ''या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी।'' ज्यावेळी जग झोपलेले असते त्यावेळी साधक जागा असतो. एकांताबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणत की रात्री बारा ते तीन हा प्रांपचिकाचा एकांत. त्यावेळी जप करावा. अशा वेळी मन जपाला जास्त अनुकूल असते.

**साधक ब :** अशा वेळी मनाची एक वेगळीच अवस्था असते. त्या वेळी व्यवहारातल्या गोष्टी मनाला अवघड वाटतात.

**पू. बाबा :** रात्री झोपतांना आपण जप करत झोपतो तेव्हां अगदी झोपेच्या क्षणाला जपाखेरीज दुसरा काहीतरी विचार मनात येतो. पण तो विचार टाळून जप करत झोपी जाणे जमले तर जागे झालो की पुन्हा नकळत जप सुरू होतो.

**साधक ग** : साधक ब म्हणतात ते खरे आहे. रात्री व्यावहारिक विचार करण्याच्या बाबतीत मन कमकुवत असते.

**साधक ब** : तथापि रात्री जप करण्याला एक अट आहे. एकतर संध्याकाळपर्यंत व्यवहारातले प्रश्न हातावेगळे करता आले पाहिजेत, नाहीतर फ्रीज करता आले पाहिजेत. कारण तसे केले नाही तर मन त्यात गोते खात राहाते. जपाने शरीराचे आजारदेखील नाहीसे होतात असे मदरनी म्हटले आहे ही आशेला जागा आहे. कारण शरीरदु:ख सुरू झाले की जपाकडे लक्ष लागत नाही.

**पू. बाबा** : मध्यंतरी माझे दोन्ही गुडघे सुजले होते तेव्हा रात्री फार त्रास होत असे. पाय अजिबात हालवता येत नसत. रात्रभर जप करत पडून राही आणि त्यामुळे देहाचे दु:ख विसरून जात असे. तथापि हेही खरे की आपण क्षुल्लक गोष्टींनी, उदाहरणार्थ, आज मोलकरीण आली नाही अशासारख्या गोष्टींनीदेखील एकदम खाली येतो ते टाळले पाहिजे. साधनात सहजता आली पाहिजे. नामात गोडी आली की ती येईल. तोपर्यंत कष्ट आहेत. जीवनातल्या सर्व घटनांमागे तो आहे याची सतत जाणीव पाहिजे. तुकाराम महाराजांसारखी मदरनाही नामाच्या शक्तीची जाणीव झाली होती. 'तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें।' यासारखीच त्यांची अवस्था झाली. खरोखर त्यांच्या साधनाची लोकांना कल्पना आली नाही. ह्या Agenda मधून नामस्मरणासंबंधीचे त्यांचे म्हणणे निवडून वेगळे काढले पाहिजे. साधकांना खूप मदत होईल.

**साधक ज** : बुद्धीच्या पातळीवर नामाचे महत्त्व समजले तरी अखंड नामस्मरण होणे वेगळेच आहे.

**पू. बाबा** : त्यासाठी सत्संग पाहिजे. त्याच्या सहवासात मनुष्य आपोआप साधन करू लागतो.

## |२७६| (१० जुलै १९९२)

निसर्गदत्त महाराज आणि अनेक साधक यांमधील सुखसंवादाचे आत्मबोध नांवाचे पुस्तक आहे. पू. बाबांनी आज या पुस्तकातील काही भाग वाचून दाखविला.

"**साधक** (निसर्गदत्त महाराजांना) : आपण ज्ञानी आहात काय?

**निसर्गदत्त महाराज** : मी ज्ञानीही नाही आणि अज्ञानीही नाही; मी ज्ञानस्वरूप आहे.

**साधक :** "मी ज्ञानी आहे" असें ज्ञानी पुरुष समजतो काय? लोक त्याला फार मानतात तेव्हां त्याला आश्चर्य वाटत नाही? स्वत:ला तो सामान्य समजत नाही काय?

**निसर्गदत्त महाराज :** सामान्य नाही किंवा असामान्य नाही... तो स्वत:ला जगापेक्षा वेगळा समजत नाही. तो स्वत:च जग असतो. आपली संपत्ती नेहमी वाटून टाकणाऱ्या अति धनिकाप्रमाणे तो स्वत:पासून मोकळा असतो. त्याच्यापाशी काही नसल्यामुळे तो श्रीमंत नसतो. भरपूर देत असल्यामुळे तो गरीब नसतो. तो संपत्तिरहित असतो. त्याचप्रमाणे ज्ञानी मनुष्य अहंभावरहित असतो.

**साधक :** तें मला रहस्य वाटतें. मी साधा मनुष्य आहे.

**निसर्गदत्त महाराज :** तुम्हीच खोल, गुंतागुंतीचें, रहस्यमय, समजण्यास कठीण आहात. तुमच्यापाशी तुलना करता मी प्रत्यक्ष साधेपणा आहे. जे आहे ते मी आहे. अंतर्बाह्य माझें तुझें, बरें वाईट अशा कोणत्याच भेदाशिवाय आहें. जें जग आहें तेंच मी आहें. मी जें आहें तेंच जग आहें" (पृष्ठ १०५)

**पू. बाबा :** हे साधेपण आपल्याला कसे आणता येईल? कोठून सुरुवात करावी लागेल?

**साधक ग :** संपत्ती वाटून टाकणाऱ्या धनिकाप्रमाणे मोकळे व्हावयाचे असेल तर माणसाने 'मी' आणि 'माझे' सोडले पाहिजे.

**साधक क :** मी सोडणे कठीण आहे. आज मीच माझी प्रतिमा निर्माण केलेली आहे. तिला मी धक्का लावू शकत नाही. म्हणून प्रथम 'माझे' जे आहे त्याची आसक्ती सोडली पाहिजे. असा प्रश्न विचारावा की हे माझे नाही तर मग दुसरे कोणाचे आहे? 'तुझे' आहे हे समजू लागले की त्यातूनच मी तुझा आहे हा भाव जागृत होईल. यासाठी आपणच निर्माण केलेली स्वत:च्या मोठेपणाची पुटे खरवडून काढावी लागतील.

**साधक ब :** मला जे माझे कर्तृत्व असे वाटते तसे कर्तृत्व कितीतरी जणांनी दाखविलेले आहे. मी त्याचा अभिमान बाळगावा असे काहीच नाही. उलट तेच ते जीवन जगण्याचा उबग आला पाहिजे.

**साधक प :** साधन नीट व्हावे म्हणून मी अमुक करीन या म्हणण्यातच अहम् पोसला जातो. त्यापेक्षा त्यांच्यावर सोपवून द्यावे.

**पू. बाबा :** श्री. भाऊसाहेबांजवळ हा साधेपणा होता. श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे एक गुरु, एक मंत्र, एक ग्रंथ असे केल्याशिवाय मनाची धाव थांबणार नाही.

**साधक क :** रामकृष्ण परमहंस, श्रीमहाराज इत्यादींचा साधेपणा किंवा बालवृत्ती अनेक जन्म चित्तशुद्धी झाल्यानंतरच आलेली असते. श्री. भाऊसाहेबही तसेच होते. श्रीमहाराज म्हणत की भगवंत उपाधिरहित आहे आणि नामही उपाधिरहित आहे; आपण उपाधिरहित झालो म्हणजे झाले!

**साधक ब :** हे फार कठीण आहे. नामाला काही अर्थ नाही. (पू. बाबांना) तुम्ही सांगता की नामाचा तू हवास असा अर्थ आहे. तुम्ही सांगता ते बरोबर असलेच पाहिजे असे वाटते. पण ते वाटणेही वरवरचे आहे. अद्यापि आतून नामाचा अर्थ जाणवत नाही. श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची खरी जाणीव नाही.

**पू. बाबा :** याचा अर्थ देहबुद्धी गेल्याखेरीज साधेपणा येणार नाही.

**साधक प :** साधेपणासाठी प्रयत्न करावा लागणे हा एक विरोधाभासच आहे. जाणारा प्रत्येक क्षण, होणारी प्रत्येक घटना त्यांच्या इच्छेनुसार होते आहे हे आत जाणवले की माणूस उगीच धडपड करणार नाही. संसारातले त्याचे नित्याचे काम चालेल पण त्याची ओढ राहणार नाही.

**पू. बाबा :** (साधक ब ना) सुरुवातीला तरी त्याला नाटकच करावे लागेल.

**साधक प :** घरातील गोष्टीत इंटरेस्ट नसतांना ते आहे असे दाखवावे लागेल.

**पू. बाबा :** ह्या सगळ्याचा अर्थ असा की जीवनात गुंतागुंत आहे. त्यात आता आपल्या वागण्याने भर तरी घालू नये. सर्व काही जर त्यांच्या सत्तेने घडते आहे तर माझे जीवनही त्यांच्याच हातात आहे हे ओळखून शरण जावे तरच गुंता सुटेल.

## |२७७| (१४ जुलै १९९२)

आज गुरुपौर्णिमा. काहीजणांनी 'चातुर्मासात कोणता नियम करावा' असे पू. बाबांना विचारले होते म्हणून सकाळच्या निरूपणात ते म्हणाले :

अ) नियम आणि कायदा यात फरक आहे. उदाहरणार्थ, निसर्गाचा कायदा मोडला तर शासन आहे. बर्गसॉ म्हणतो, एखादा दारुडा देवाला शरण गेला तर देव त्याला क्षमा करेल पण शरीर त्याला क्षमा करणार नाही.

आ) नियम शाश्वताचा असावा. तो कसा असावा?

१) रोज नियमित संख्या ठरवून नामस्मरण करावे. ते कंटाळवाणे होणार नाही अशी खबरदारी घ्यावी.

२) जिभेवर ताबा ठेवावा. खाणे पिणे सांभाळावे, कमी बोलावे आणि दुसऱ्याची निंदा करू नये.

३) झोप हे अज्ञानाचे लक्षण आहे. साधकाला जास्त झोपेची आवश्यकता नसते. म्हणून झोपेवर शक्य तितका ताबा ठेवावा.

४) मी भगवंतासाठी आहे, प्रपंचासाठी नाही हे मनाला शिकवत राहावे.

सकाळी पू. बाबा थकलेले दिसत होते. पण संध्याकाळी पाच वाजता आम्ही त्यांच्याकडे गेलो तेव्हां ते प्रसन्नचित्त होते.

**पू. बाबा** : पाण्याला तहान लागली वगैरे नाथांचे एक पद आहे. त्यात सगळे उलटे सांगितलेले आहे. नाथांची घरची खूण उलटी आहे असे म्हटले आहे. त्याचा अर्थ असा की आपले सगळे जीवन तर्काने बांधलेले आहे. स्थल, काल, निमित्ताच्या चौकटीत आपण जगतो. पण अध्यात्म याच्या उलट आहे. तेथे तुमचा तर्क चालू शकत नाही. गुरुपौर्णिमेला आपण गुरूंना काय देतो? व्यवहारातले आपले सगळे देणे द्वैतातले आहे. देणारा, तो जे देतो ते आणि ज्याला देतो ते, सगळे द्वैत आहे. याउलट अध्यात्मातील देणे हे द्वैतातील नाही. मीच मला द्यायचे आहे. आणि ज्या मला द्यायचे आहे तो आतच आहे. हे देणे कसे द्यायचे ते आपल्याला समजत नाही.

श्रीमहाराजांच्या चरित्रात दोन गोष्टी आहेत. परभणीच्या एका जमीनदाराने आपले घरदार, जमीनजुमला इत्यादी सर्व श्रीमहाराजांना अर्पण केले. त्या संदर्भात श्रीमहाराज त्याला म्हणाले, "तुम्ही भगवंताला 'सर्व' दिलें हें खरें, पण 'स्व' मात्र दिला नाही.' भगवंताला सर्वापेक्षा 'स्व' द्यायला पाहिजे. 'स्व' दिल्यावर सर्व न दिलें तरी चालतें, कारण तें आपलें - आपल्या मालकीचें - रहातच नाहीं.... भगवंताला 'स्व' देणें म्हणजे 'मी त्याचा आहें' ही जाणीव रात्रंदिवस मनामध्यें ठेवणें होय."

दुसऱ्या गोष्टीत खरा पंत कसा असतो ते श्रीमहाराजांनी सोदाहरण सांगितले आहे. एक दिवस आज माझ्या गुरूंची - तुकामाईंची - पुण्यतिथी आहे. आज गावात भिक्षा मागून आपण प्रसाद करणार असे श्रीमहाराजांनी सांगितले. गावात कोणी काही कोणी काही अशी भिक्षा दिली पण ओढ्यापलीकडे राहणाऱ्या रामदासी बुवाने श्रीमहाराजांची 'जय जय रघुवीर समर्थ' अशी गर्जना ऐकताच त्यादिवशी आणलेली सर्वच्या सर्व भिक्षा त्यांच्या झोळीत ओतली आणि त्यांना साष्टांग नमस्कार घातला. श्रीमहाराज म्हणाले, "हा खरा उदार माणूस! हा भिक्षेकरी असला तरी पंत आहे... प्रापंचिक माणसानें घरांत असलेलें सर्वच्या सर्व देऊन टाकू नये ही गोष्ट खरी, परंतु प्रसंग आला असतां सर्व देण्याची तयारी पाहिजे हेंहि खरें. थोर मनाच्या माणसालाच परमार्थ साधतो."

पू. बाबा पुढे म्हणाले, मीपणातून जे देणे होते ते 'देणे' नव्हेच. आपण देतो तेव्हां आपल्याजवळ किती आहे त्याचा विचार करून सांभाळूनच देतो. स्वभावत: आपण फार हिशोबी - calculating आहोत. आपण दृश्य खरे मानतो. त्यामुळे आपले देणेही दृश्यातले आहे. देहाने देतो तेवढेच खरे वाटते. गुरूला जे द्यायचे ते अदृश्यातले आहे. ते कसे द्यायचे ते माहीत नाही कारण ते खरे वाटतच नाही. काकडी खाल्ली की काकडीची ढेकर यायचीच; तसे सकाळी उठल्यापासून दृश्य आत भरत राहिलो की जे दृश्यापलीकडचे आहे त्याला जागाच राहात नाही. त्यांना आपला मीपणा पाहिजे आहे; पण तो कोण देतो ? आपली फार विचित्र स्थिती आहे. विजेचे काम करणारे, लाकडी फळीवर उभे राहून काम करतात, त्यामुळे त्यांना विजेचा धक्का लागत नाही. त्याप्रमाणे सद्गुरूंकडून शक्तीचा प्रवाह येतो आहे पण आपण तो आत शिरू देत नाही. आपण दृश्याच्या फळीचा आधार सोडत नाही त्यामुळे आपणही bad conductor झालो आहोत.

सद्गुरूंकडून शक्ती एकसारखी वाहते आहे. तुम्ही कितीही घ्या त्यात कमी होणार नाही. आई ज्ञानाच्या राशी आणून ओतत होती असे रामकृष्ण परमहंस म्हणाले. स्वामी विवेकानंद परदेशात जाऊन आल्यावर मी आता थकलो म्हणाले. वयाच्या एकोणचाळिसाव्या वर्षीच त्यांनी देह ठेवला. मृत्यूपूर्वी सहा महिने आधी त्यांनी मृत्यू केव्हां येणार आहे हे सांगितले होते. पण रामकृष्ण परमहंसांचे तसे नव्हते. तो शक्तीचा समुद्र होता. आपण त्या समुद्राशी जोडले गेलो की झाले! पण त्यासाठी हा मी जो agent म्हणून वावरतो आहे, म्हणजे कर्तेपण मिरवतो आहे ते गेले पाहिजे.

**साधक ब** : हा मी कसा द्यायचा ?

**पू. बाबा** : आपण नामस्मरण करतो. हे नाम स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे. नाम घेतांना मन चिंतनशील झाले पाहिजे. चिंतन म्हणजे deliberation. नाम घेतांनादेखील या नामाचा अर्थ काय, ते कोठून येते, त्याचा जीवनावर काय परिणाम होतो इत्यादी चिंतन चालले तरी हरकत नाही. कारण, नाहीतर नामाखेरीज़ इतर फालतू विचारच मनात येत असतात. त्याऐवजी सतत नामाबद्दल चिंतन किंवा नामस्मरण चालू राहिले पाहिजे. निर्विचार होणे ही सोपी गोष्ट नाही. बहुतेक धुळ्याची हकिगत असावी. लोकमान्य टिळक कॉंग्रेसच्या विषयनियामक समितीत बसले होते. सात-आठ जणच होते. त्यांपैकी दोघेजण आपआपसात काही बोलत होते. ते कशासंबंधी

बोलत आहेत म्हणून टिळकांनी विचारल्यावर ते म्हणाले की येथे एक साधू राहातात, त्यांच्या दर्शनाला जाण्यासंबंधी बोलत होतो. ते ऐकून लोकमान्य म्हणाले, एवंच माझ्या डोक्यावर शेंडी आहे तोपर्यंत मला कोणी साधू समजणार नाही! (संन्यास घेतला तरच तो लोकांना साधू वाटतो!) तथापि हे बोलतांना त्यांनी स्वत:ची अवस्थाच सांगितली. लोकमान्यांसारखे निर्विचार होणे आपल्याला शक्य नाही. म्हणून आपण आपला देह आणि मन नामाने भरून टाकायचा प्रयत्न केला पाहिजे, आणि त्यासाठी मन चिंतनशील झाले पाहिजे. आज आपले कर्तृत्व लटके आहे हे समजत असूनही आपण ते मानायला तयार होत नाही. मनाची धडपड चालूच राहाते. त्या मनाला चिंतनशील केले की त्याचा उच्छृंखलपणा नाहीसा होईल आणि मी कर्ता नाही, कर्ता तो आहे हे ठसेल आणि साधनाची पातळी वर जाईल. मनाच्या सर्व वृत्तींमधे नाम भरले तरच हे होईल. यासाठी अखंड सावधानता पाहिजे.

## |२७८| (१७ जुलै १९९२)

**पू. बाबा :** सत्पुरुषांच्या भोवती halo - तेजोवलय असते. श्रीमहाराजांभोवती तेजोवलय होते. डॉ. कुर्तकोटी सांगत की श्रींना काही विचारावे म्हणून गेलो की काय होई कोणास ठाऊक! काय विचारायचे ते विसरून जात असे. येथे येणाऱ्या काही साधकांचीही अशीच स्थिती होई. घरून निघतांना श्रीमहाराजांना काय विचारावयाचे याचे ते टिपण करून घेत, पण श्रीमहाराजांशी बोलणे सुरू झाले की एकतर त्यांनी विचारण्यापूर्वीच त्यांना त्यांच्या प्रश्नांची उत्तरे मिळत, नाहीतर काय विचारायचे ते ते विसरून जात. श्री. बाबा काशीकर आणि पुण्याचे एक साधक होते ते श्रीमहाराजांना प्रश्न विचारत पण त्यांची उत्तरे ऐकून तुम्ही आम्हांला सांगा असे मला सांगत! हे सगळे सांगायचे कारण-मदरचा अजेंडा वाचतांना एक हकिगत वाचली ती अशी : एका ब्रिटिश बाईचा प्रेमभंग झाल्यामुळे उद्विग्न होऊन समाधानाच्या शोधात ती हिंदुस्थानात आली. पॉंडिचरीला मदरजवळ ती वर्षभर राहिली होती. मदरबरोबर तिचे वेगवेगळ्या विषयांवर झालेले संवाद-चर्चा conversations या नांवाने प्रसिद्ध झालेले आहे. मदरनी त्या बाईला सांगितले की जगातल्या इतर माणसांशी आपले संबंध क्षणिक असतात. तुला जे प्रेम वाटत होते तो भ्रम होता इत्यादी. याचा परिणाम असा झाला की ती माणसांचा द्वेष करू लागली. मदरनी तिला सांगितले की तुला याच्या पलीकडे जाऊन चिंतन केले

पाहिजे. त्याशिवाय तुला प्राणिमात्रांविषयी खरे प्रेम वाटणार नाही. श्रीमहाराजही असेच म्हणाले होते. साधकाने जगावर नि:स्वार्थी प्रेम करावे आणि त्याची सुरुवात आपल्या घरापासून करावी. आपल्याला आपल्या घरातील माणसांबद्दल नि:स्वार्थी प्रेम वाटते का? कोण कोठून या जन्मापुरते एकत्र आलेले आहेत असे आपण वरवर म्हणत असलो तरी आत खोलवर आपण त्यांच्यात गुंतलेले असतो.

**साधक प** : खरे प्रेम नि:स्वार्थीच असले पाहिजे. प्रेमात अपेक्षा नसते. अपेक्षा असेल तर ते खरे प्रेमच नाही.

**साधक ख** : लहान मुलावर आपण प्रेम करतो त्यात त्या मुलापासून काय अपेक्षा करतो? तथापि त्याच्याबद्दल प्रेम वाटतेच.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता ते बरोबर आहे.

**साधक ज** : लहान मुलावर प्रेम करत असलो तर ते कोणत्याही लहान मुलाबद्दल वाटले पाहिजे. माझ्याच मुलावर किंवा नातवंडावर का? म्हणजे स्पष्ट अशी अपेक्षा नसली तरी तेथे ममत्व असते.

**पू. बाबा** : समर्थांनी म्हटले आहे "तुवां भोगिल्या पुनरावृत्ती। ऐसीं मायबापें किती:" प्रत्येक जन्मात आईबाप आहेतच. तेच जीव काही प्रत्येक जन्मात या संबंधांनी बांधलेले नसतात. पुढच्या जन्मात आपण कोठे जाणार आहोत कोणास ठाऊक! असे असतांना आसक्ती का वाटते? या आसक्तीचे नि:स्वार्थी प्रेमात कसे रूपांतर होईल?

**साधक ग** : समर्थांनीच पुढच्या ओवीत म्हटले आहे "तें तुवां आपुलीं मानिलीं। कैसीं रे पढतमूर्खा॥" आसक्ती न सुटणाऱ्याला त्यांनी पढतमूर्ख म्हटले आहे.

**साधक ब** : नि:स्वार्थी प्रेम करायला प्रथम आपण नि:स्वार्थी झाले पाहिजे. बाकीची माणसे स्वार्थी असणार आणि ती तशीच राहाणार. त्यांच्या तुमच्याकडून काही अपेक्षा असतात. त्या पुरत्या झाल्या नाहीत की ते तुम्हांला नांवे ठेवणार. पण आपल्या बाजूने विचार करायचा तर चित्तशुद्धी झाल्याखेरीज नि:स्वार्थी प्रेम होणार नाही.

**पू. बाबा** : मला वाटते, मुळात आपण एक गोष्ट विसरतो आहोत. स्वार्थ, आसक्ती, ममत्व हे सगळे देहबुद्धीतून येते. म्हणून देहबुद्धी गेल्याखेरीज नि:स्वार्थी प्रेम करता येणार नाही. श्रीमहाराजांनी ते करून दाखवले. आपण होऊन आंधळीशी लग्न केले. त्यांना ते साहेब म्हणत. त्यांची प्रकृती ठीक नव्हती

तेव्हां त्यांच्या सुश्रूषेसाठी श्रीमहाराजांनी दोन कुळंबिणी ठेवल्या होत्या. पुण्यात होते तेव्हां आईसाहेबांसाठी एक मेणा आणि दोन भोई ठेवले होते. भटजीबापूंची दोन-तीन मुले गेली होती. त्यानंतर त्यांचा मोठा कर्ता सवरता मुलगा गेला तेव्हां ते म्हणाले, सोबत चांगली होती. असो, पांडुरंगाची इच्छा. मला पुत्रवियोगाची सवय आहे. लोकमान्य मंडालेच्या तुरुंगात असतांना त्यांची पत्नी गेल्याचे त्यांना समजले तेव्हां जीवनातला एक भाग संपला; माणसाने अशी दु:खे शांतपणेच सहन करायची असतात असे उद्‌गार त्यांनी काढले. स्वत:च्या संसाराकडे, मुलाबाळांकडे इतके तटस्थपणे पाहणे देहबुद्धी गेल्याखेरीज शक्य नाही. याला दोन मार्ग आहेत. (१) विवेक. पण हा सतत जागृत पाहिजे. (२) हे सगळे भगवंताने दिलेले आहे. मीही त्याचाच आहे. त्याला पाहिजे तसे आणि पाहिजे तोपर्यंत तो ठेवील अशी श्रद्धा निर्माण झाली पाहिजे.

**साधक प :** तसे दोन्ही कठीणच आहे. तथापि भगवंतावर किंवा सद्गुरूंवर अवलंबून राहण्याची कला जमली तर सगळे सोपे आहे.

**पू. बाबा :** गीतेत म्हटले आहे की 'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते।' पुष्कळ जन्म लागतील हे खरे, पण ह्या जन्मी काहीतरी सुरुवात नको का व्हायला?

**साधक प :** नामस्मरणात जीव जोपर्यंत रमू लागला नाही तोपर्यंत ही खेचाखेच चालणारच. जीव एकदा रमला की इकडची ओढ आपोआप लटकी पडेल.

**पू. बाबा :** मग साधनाचा असा वेगळा वेळ राहात नाही. ब्रदर लॉरेन्सने म्हटले आहे की प्रत्येक काम करतांना तो येशूच्या चिंतनात असे. सर्व काळ सर्व अवस्थांमधे नामस्मरण टिकणे हे साधनात रंगून गेल्याचे लक्षण आहे. ते जमले पाहिजे.

## |२७९| (२४ जुलै १९९२)

**पू. बाबा :** मदरचा हा अजेंडा वाचत होतो तेव्हां एक विलक्षण गोष्ट आढळून आली. मदर म्हणतात की तुम्ही जे साधन करता ते अज्ञानातच करता. त्यामुळे साधन केले की अमुक व्हावे, तमुक मिळावे इत्यादी तुम्हांला वाटू लागते. हा सगळा भ्रमच आहे. श्रीमहाराजही असेच म्हणत असत. मागणे सुटणे म्हणजेच वासना क्षीण होणे हे साधनातील प्रगतीचे लक्षण आहे. अर्बन नांवाच्या लेखकाचे Language and Reality या नांवाचे एक पुस्तक आहे.

त्याचाच Symbolism नांवाचा दुसरा भाग आहे. तो म्हणतो की Reality म्हणजे सद्वस्तु जी आहे ती भाषेत आणण्याचा कितीही प्रयत्न केला तरी ती पूर्णपणे शब्दात पकडता येत नाही; कारण शब्द हा अपूर्णच आहे. तथापि पूर्णाला शब्दच जोडतो आणि तो शब्द म्हणजे नाम. या दृष्टीने आपण विचार केला तर लक्षात येईल की भाषेतील इतर शब्द आणि गुरूंनी दिलेले नाम यात फरक आहे. नाम पूर्ण आहे. नाम आणि नामी यात भेद नाही. श्रीमहाराज म्हणाले की स्मरण याचा अर्थ 'तो' आहे, 'तो' आहे हा भाव एकसारखा जागृत राहाणे. आपण नामस्मरण करतो तेव्हां महाराज आहेत असा भाव आपल्या मनात असतो का? वास्तविक, जेथें नाम तेथें मी आहे, ॐकार ॐकार तो मीच आहे, जेथें नाम तेथें माझे प्राण इत्यादी त्यांनी सांगितलेली कितीतरी वचने आपल्याला पाठ आहेत. पण नाम घेतांना आपल्याला त्यांची एकसारखी आठवण राहाते का?

**साधक ब :** एकसारखी नाही, पण क्वचित त्यांचे अस्तित्व जाणवते. विशेषत: काही गोष्ट व्हावीशी वाटली आणि ती तशी झाली की हे श्रीमहाराजांनी केले आहे, हे माझे करणे नव्हे हे लक्षात येते.

**साधक प :** काही विशेष प्रसंगात किंवा संकटात ते आहेत असे वाटते. पण सर्व काळ तसे अस्तित्व जाणवत नाही. वास्तविक त्यांचे असणे देहापलीकडचेच आहे.

**साधक ग :** श्रीमहाराज 'होते' हे मनातून जात नाही. त्यांचे अस्तित्व दृश्यापलीकडेच आहे असे बुद्धी सांगते पण आत तसे जाणवत नाही.

**पू. बाबा :** वास्तविक नाम आहे तेथे ते आहेतच. आपली संकल्पना तेवढी प्रबळ असेल तर भक्त देवाला साक्षात करू शकतो. कॅसिअर नांवाचा एक लेखक आहे. त्याने Psychological memory आणि Metaphysical memory असे स्मृतीचे दोन प्रकार सांगितले आहेत. भगवंताची किंवा आपल्या गुरूंची स्मृती ही Metaphysical memory (आध्यात्मिक स्मृती) आहे. माझे जे वास्तविक स्वरूप आहे तेथून घसरून मी खाली आलो तरी त्या मूळ स्वरूपाची अस्पष्ट स्मृती माझ्या हृदयात आहे आणि त्या स्वरूपाकडे परत जाण्याची ओढ आहे. त्यामुळे जीवनात अपूर्णता वाटते. या माझ्या Metaphysical memory चा अंमल दृश्यापेक्षा सूक्ष्मातील अस्तित्वाशी जडलेला आहे. तीव्र संकल्पामुळे भगवंत किंवा गुरु भक्तासाठी दृश्यात म्हणजे स्थूलात येतात.

"जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हाती धरूनिया॥... बोलों जातां बरळ करीसी तें नीट। नेली लाज, धीट केलो देवा॥" हे काही तुकाराम महाराजांचे केवळ काव्यात्मक उद्गार नाहीत. तो त्यांचा अनुभव होता. बडबडू लागलो तर तू माझे बोलणे योग्य करतोस. त्यांना कीर्तन करायची सवय नव्हती; पण कीर्तनाला उभे राहिल्यावर त्यांची लाज, भीती नाहीशी करून पांडुरंगाने त्यांना धीट बनवले.

श्रीमहाराजही आज देहात नसले तरी आपला प्रबळ संकल्प असेल तर ते आपल्याला देहात दिसतात. तसे ते दिसल्याची कितीतरी उदाहरणे लोक सांगतात. पण तो ध्यास लागला पाहिजे. मात्र येणाऱ्या अनुभवातच न रमता त्याचा उपयोग साधन वाढण्यासाठी केला पाहिजे. श्री. भाऊसाहेब म्हणायचे ना, की त्यांना (श्रीमहाराजांना) काय अशक्य आहे? त्यांना वाटले तर ते भिंतीतूनदेखील बोलतील! जनाबाईला पाणी भरायला, धुणी धुवायला, दळायला परमात्मा मदत करीत असे. हा अनुभव ही संकल्पाचीच शक्ती आहे. हे सगळे विश्वच जर भगवंताच्या संकल्पातून आले, तर त्या संकल्पाची शक्ती किती मोठी असली पाहिजे?

हे मला सुचायचे कारण, दर रविवारी एक गृहस्थ ज्ञानेश्वरी ऐकायला येतात. अक्कलकोटच्या स्वामींचे अनुग्रहीत आहेत. एका रविवारी निरूपण झाल्यावर त्यांनी मला विचारले की 'माझे साधन ठीक चालू आहे ना?' मी त्यांना विचारले, 'तुम्ही काय साधन करता?' ते म्हणाले, सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत सर्व गोष्टी स्वामींना सांगून, विचारून करतो. आता माझी अशी स्थिती आहे की सर्व काळ स्वामी माझ्याबरोबर असतात; इतके की स्वप्नातून जागा झालो तर लगेच ते स्वप्न त्यांच्या कानावर घालतो. त्यामुळे आता माझ्या मनावर कसलाही ताण नाही. खरोखर, आपले असे झाले पाहिजे. भाऊसाहेबही असेच करत. महाराजांच्या कानावर घातले, आपली जबाबदारी संपली म्हणत. स्मृती, भावना, कल्पना, विचार सगळे श्रीमहाराजांनी भरून गेले पाहिजे. ब्रदर लॉरेन्स सर्व काळ येशूच्या सान्निध्यात असे. यालाच त्याने Practice of the Presence of God असे म्हटले आहे.

**साधक प :** आपण Presence of God म्हणतो तेव्हां त्याचा स्मृतीशी संबंध नाही. Present मध्ये Presence आहे. आता इथे बसलो असतांना, तुमच्याशी बोलतांना त्याचे अस्तित्व जाणवणे महत्त्वाचे आहे. अमुक करू म्हणजे ते जाणवेल इत्यादी कल्पना करण्यात काही अर्थ नाही.

**पू. बाबा :** हा तुमचा मुद्दा फार महत्त्वाचा आहे. presence हे आत्ताच पाहिजे. क्षणोक्षणी त्याचे अस्तित्व जाणवू लागले तरच आपले साधन काळाच्या उपाधीतून सुटेल.

**साधक प :** जेवतांना प्रत्येक घासाबरोबर तृप्ती होत जाते तशी प्रत्येक नाम घेताना तृप्ती वाटली पाहिजे; इतकी नामाची सत्यता पटली पाहिजे.

**पू. बाबा :** नामाच्या स्वरूपाचा आपल्याला कधी अनुभव येतो का?

**साधक ज :** सत्, चित् आणि आनंद यांपैकी सत् चा क्वचित अनुभव येतो.

**साधक ड :** काही वेळा श्रीमहाराज आहेत असे वाटते. ते नेहमी माझ्याबरोबर असावेत असे वाटत असेल तर त्यांना जे आवडते ते करायचा मी एकसारखा प्रयत्न केला पाहिजे. त्यांना नाम आवडते ते एकसारखे घेतले पाहिजे. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करायची सवय केली तर हे प्रेम वाढेल आणि त्यांचा सहवास सतत राहील असे वाटते.

**साधक ग :** त्यांना आवडते ते करायचे याचीच दुसरी बाजू म्हणजे त्यांना जे आवडत नाही ते टाळले पाहिजे. नाम घेतले नाही तर ते माझ्याजवळ राहाणार नाहीत हे भान ठेवले पाहिजे.

**साधक प :** पण या नकारात्मक बाजूपेक्षा होकारात्मक बाजूवर भर दिला पाहिजे. मी देह नाही. हा देह जाणारच आहे हे खरे आत जाणवले म्हणजे देहाची ओढ कमी होऊन मन साधनात रमू लागेल.

**पू. बाबा :** याखेरीज आणखी एक मुद्दा असा : संत सांगतात की त्यांनी हृदयात भगवंत साठवला. हे साठवणे शक्य आहे का? आणि साठवायचे म्हणजे काय करायचे? श्रीकृष्ण मथुरेला आणि पुढे द्वारकेला गेला. गोपी उद्धवाला म्हणाल्या की तो जाईना का? आम्ही त्याला आमच्या हृदयात साठवला आहे. तुकाराम महाराजही ''सांठविला हरि जीहीं हृदयमंदिरीं'' म्हणतात तेव्हां हे साठवणे काय आहे. (पहा अध्यात्म संवाद भाग १, संवाद क्र. ४४)

**साधक ड :** एकसारखे चिंतन तर आहेच; शिवाय साठवण्यामध्ये सांभाळणे आहे. श्रीमहाराजांना हृदयात साठवायचे असेल तर आपले चित्त इतके शुद्ध पाहिजे की त्यांना हृदयात राहावेसे वाटेल.

**साधक प :** हृदयात साठवायचा आहे, मेंदूत नाही. म्हणजे त्या साठवण्यात भावनेचा ओलावा पाहिजे.

**साधक ब :** म्हणजे साधक ड म्हणतात त्याप्रमाणे चित्तशुद्धी पाहिजे. साधनानेच ती होईल. पण आपले मन किंवा खोटा मी मोठा लबाड आहे. तो साधनाच्या आड येतो. आत्ता जप पुरे असे तोच सांगतो. कारण त्याला दिसते की जप वाढेल तसतसा त्याचा नाश आहे. ती खुदकुशी तो कशी करेल? तिथे, मला वाटते, कृपा पाहिजे.

**पू. बाबा :** आपण नाम घेतो ते त्यांच्या कृपेनेच येते आहे हे कुठे आपल्या लक्षात येते? कृपा आहेच हे लक्षात ठेवून आपण खोटा मी क्षीण, नव्हे नाहीसा होईपर्यंत साधन केले पाहिजे. अशी तळमळ वाटली पाहिजे की नामस्मरण थांबले तर ते माझ्या हातून निसटतील. आणि जीवनातून ते नाहीसे झाले तर जगायचे कशाला?

**साधक ग :** स्वजनांशी लढलो तर मला पाप लागेल आणि माझ्या जीवनातून श्रीकृष्ण नाहीसा होईल असे अर्जुन म्हणाला. हातून घडणाऱ्या पापापेक्षाही जीवनातून कृष्ण जाईल ही भीती त्याला मोठी वाटली.

**साधक ड :** मला वाटते, ह्या खोट्या मी मध्ये बदल व्हावयाचा नाही. त्याचा नाशच झाला पाहिजे.

**पू. बाबा :** नामाच्या शक्तीची आपल्याला पुरेशी जाणीव नाही. नाम सूक्ष्म आहे, शक्तिमय आहे. त्याच्या शक्तीची जाणीव होण्यासाठी आपल्याला सतत सावध राहावे लागेल. त्यासाठी मनाची सूक्ष्मता आवश्यक आहे. त्यासाठी अखंड साधन, अखंड अनुसंधान पाहिजे. साधन करतांना त्यांच्या अस्तित्वाचा थोडा तरी अनुभव यावा. असा अनुभव आला की नामाची चटक लागेल. त्यासाठी सत्संग पाहिजे.

## |२८०| (३१ जुलै १९९२)

पू. बाबांकडे आम्ही गेलो तेव्हां श्री. दत्ताण्णा इनामदार आणि श्री. गुरुराज आधीच तेथे येऊन बसलेले होते.

**पू. बाबा :** दोन दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांचे शरीर ताठ झालेले आहे. त्यामुळे एकतर ते उभे राहातात नाहीतर आडवे होतात; वाकता येत नाही म्हणाले. पन्नास-पंचावन वय असावे. वारकरी आहेत. शरीराची अशी स्थिती असूनही शांत आहेत.

**श्री. दत्ताण्णा :** एकदा समर्थांच्या पादुकांबरोबर मी अकोल्याला गेलो होतो. आम्ही ज्या घरी पादुका घेऊन उतरलो होतो त्या घरी एक बाई आल्या

आणि म्हणाल्या की त्यांचा मुलगा फार आजारी आहे आणि त्याची पादुकांचे दर्शन घेण्याची फार इच्छा आहे. इतरांनी पादुका तिकडे नेणे शक्य नाही, वेळ नाही इत्यादी कारणे सांगितली म्हणून मी पादुका घेऊन त्या बाईंच्या घरी गेलो. एका स्टुलावर पादुका ठेवल्या आणि अंथरुणातूनच किंचित ओणवे होऊन त्या मुलाने पादुकांवर कपाळ टेकले. विशीतला असावा तो. त्याच्या आईने नंतर त्याच्या अंगावरची चादर काढली तेव्हां दिसले की केवळ अस्थिपंजर राहिलेला होता. आठ-दहा वर्षे तो त्या स्थितीत होता. तथापि त्याची मुद्रा शांत होती. त्रासिकपणाचे, शरीरदु:खाचे कोणतेही चिन्ह त्याच्या मुद्रेवर नव्हते. त्याची ती स्थिती पाहिली आणि पादुका नेल्याचे सार्थक झाले असे वाटले.

**पू. बाबा :** दत्ताण्णा, आज तुम्ही आलात ते फार चांगले झाले. गेल्या शुक्रवारी आमची एका मुद्द्यावर चर्चा चालली होती, त्याबद्दल तुम्हांला काय वाटते ते सांगा. मुद्दा असा होता की साधकाने हृदयामधे भगवंत साठबावा असे संत सांगतात. वास्तविक भगवंत अंतर्यामी म्हणजे प्रत्येकाच्या हृदयात आहेच. तो आणखी साठवायचा म्हणजे काय करायचे? "सांठविला हरी। जीहीं हृदयमंदिरीं।। त्यांची सरली येरझार। झाला सफळ व्यापार।।" असे तुकाराम महाराज म्हणतात. म्हणजे हे साठवणे काहीतरी वेगळे असले पाहिजे. ते काय ते सांगा. (पहा : अध्यात्म संवाद भाग १, संवाद क्र. ४४)

श्री. दत्ताण्णा काहीच बोलले नाहीत म्हणून पू. बाबा पुढे म्हणाले, हे मी तुम्हांला विद्वान म्हणून विचारतो आहे असे नाही, पण अनुभव म्हणून काही आहे ना? शिवाय तसे शास्त्राध्ययनही तुम्ही केलेले आहे.

**श्री. दत्ताण्णा :** साठवणे म्हणजे, उदाहरण देऊन सांगायचे तर ह्या तारांमधून वीज वाहते आहे पण बल्बमधून ती प्रकाशित होते, तिचे 'असणे' लक्षात येते. त्या तारेतील विजेप्रमाणे प्रत्येकाच्या हृदयात चैतन्य आहेच. पण संतांच्या हृदयातून भगवंताचा प्रकाश बाहेर फाकतो. चैतन्य तेच पण त्याचा वेगळा आविष्कार होतो. अवतारी संत म्हणजे हजार वॉटचे बल्ब, इतर संत पाचशे वॉटचे असे आपल्याला म्हणता येईल. म्हणजे ज्या प्रमाणात हृदयात हरी साठवला गेला आहे त्या प्रमाणात त्याचा प्रकाश बाहेर फाकेल. एखाद्या पारदर्शक काचेच्या नळीत ज्या रंगाचे पाणी अथवा अन्य वस्तू भरावी त्या रंगाची ती नळी दिसते. वास्तविक तिचा स्वत:चा असा कोणताच रंग नसतो. ह्या देहाच्या नळीत विषय, दृश्याची वासना भरली तर ती दिसेल; भगवंताचे

प्रेम भरले तर ते दिसेल. किडा-मुंगीपासून सर्व प्राणिमात्रात भगवंताचे चैतन्य आहे पण त्याचा प्रत्यय संतांच्या हृदयातून येतो.

**पू. बाबा :** म्हणजे असे म्हणता येईल का - नव्हे, माझ्यापुरती माझी खात्री आहे की प्रत्येकाच्या हृदयामधे भगवंत आहेच पण देहबुद्धीच्या आवरणाने तो झाकला गेलेला आहे. ही देहबुद्धी जशी कमी होत जाईल तसा त्याचा प्रकाश पसरेल. माणसाच्या वासना त्याच्या सूक्ष्म देहात असतात. त्या जसजशा विरळ होत नाहीशा होतील तसतसे भगवंताचे हृदयातील अस्तित्व म्हणजेच त्याचे साठवणे जाणवू लागेल.

**साधक प :** तो अंतर्यामी आहेच. कोठून बाहेरून आणायचा नाही. तुम्ही म्हणता तसे विषयाचे आवरण दूर झाले पाहिजे.

**पू. बाबा :** विषय म्हणजे दृश्य म्हणा. विषयाची श्रीमहाराजांनी केलेली व्याख्या फार सोपी आहे. भगवंताखेरीज जे इतर सर्व त्याला ते विषय म्हणतात! तथापि भगवंत साठवावयाची process- प्रक्रिया काय आहे? आणि तो साठवला जातो आहे हे कसे ओळखायचे?

**श्री. दत्ताण्णा :** प्रोसेस म्हटले म्हणजे, नामस्मरणात वाढ होणे आणि मन समाधान पावणे ही खूण म्हणता येईल. बारीक सारीक गोष्टींनी मन अस्वस्थ होते ते जास्ती जास्ती वरच्या पातळीवरच्या गोष्टींनी अस्वस्थ होऊ लागले, अर्थात सामान्य गोष्टींनी अस्वस्थ होईनासे झाले की समाधान वाढू लागेल. भगवंत हृदयात साठवला जात असल्याची ती खूण म्हणता येईल. तो साठवला जायला आधी मनातले विकार बाहेर काढले पाहिजेत.

भगवान बुद्धांची एक गोष्ट आहे. एकदा ते त्यांच्या पूर्वाश्रमीच्या श्रीमंत मित्राच्या घरी भिक्षेला गेले. मित्राला फार आनंद झाला. त्याने तथागतांना उपदेश करण्याची विनंती केली. ते म्हणाले आधी भिक्षा वाढ. मित्राने त्यांना आवडणारी खीर तयार करवून घेतली आणि तो ती खीर त्यांच्या कमंडलूत घालण्यासाठी घेऊन आला आणि पाहतो तो कमंडलू चिखलाने भरलेला होता. त्या चिखलात खीर कशी घालायची असा त्याला प्रश्न पडला. भगवान बुद्धांना विचारल्यावर ते म्हणाले, तू माझ्याकडे येतोस तेव्हां तुझे मनही विषयरूपी चिखलाने भरलेले असते. तो चिखल काढल्याशिवाय त्या मनात आत्मज्ञान कसे प्रकाशेल? म्हणून हृदयातील चैतन्याचा प्रकाश पडायला पाहिजे असेल तर अंत:करण शुद्ध झाले पाहिजे.

**पू. बाबा :** ते कसे व्हायचे?

**साधक ब** : नामच अंत:करण शुद्ध करील. तीच त्यांची कृपा आहे.

**पू. बाबा** : आपल्याला नामाच्या शक्तीची कल्पनाच येत नाही. जगात जे काही घडते ते त्या शक्तीने घडते हे पटले तर माणूस नामाकडे लवकर लागेल. यंदा अजून पाऊस पडत नाहीये हे त्या शक्तीचेच काम आहे हे विसरून आपण त्याची कारणे शोधत बसतो त्यामुळे चैतन्यावरचे आवरण दूर होत नाही. त्याची इच्छा असेल तर पाऊस पडेल.

**साधक ब** : होय, म्हणूनच त्याची प्रार्थना करायची.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांना एकदा म्हटले, काही चमत्कार सांगा. तेव्हां ते म्हणाले की आपण जिवंत आहोत हाच मोठा चमत्कार नाही का? आपण आपल्या कर्तृत्वाने का जिवंत राहातो? पण असे असूनही मी कर्ता नाही हे माणसाला पटत नाही.

**साधक ग** : हाही चमत्कारच नव्हे का?

**श्री. दत्ताण्णा** : त्याच्या इच्छेने सर्व काही घडते; त्यात माझे काही कर्तृत्व नाही हे पटले की माणूस शांत होईल. १९७४ साली गोंदवल्याला अनुग्रह घेतल्यानंतर मी फार अस्वस्थ होतो. पाच-दहा मिनिटेही एका जागी स्वस्थ बसवत नसे. प्रयत्नपूर्वक पाच मिनिटे, दहा मिनिटे असा जपासाठी बसायचा वेळ वाढवू लागलो आणि शेवटी बहात्तर तास एका खोलीत जप करीत बसलो. त्यानंतर मन स्वस्थ झाले. आता काहीही घटना घडल्या तरी काळजी वाटत नाही.

**पू. बाबा** : सूक्ष्म शरीर नामाने भरून टाकायचे. म्हणजे विचार, स्मृती, कल्पना, भावना इत्यादी वृत्तीची सर्व अंगे भगवंताने भरून टाकली पाहिजेत. हे साठवणे आहे. काय हो! दृश्यात माणूस असा कशाने झपाटला जातो का? मोठमोठे शास्त्रज्ञ असे झपाटून गेलेले असतात का?

**साधक प** : निश्चितच. एकसारखे प्रॉब्लेमवर त्यांचे चिंतन चाललेले असते. त्यामधे ते बाकीचे सगळे विसरून जातात.

**पू. बाबा** : सगळे विसरतात म्हणजे किती? थॉमसन नांवाचा एक शास्त्रज्ञ होता. एकदा तो त्याच्या एका विद्यार्थ्याबरोबर रस्त्यातून जात असतांना त्यांना एक स्त्री भेटली. तिने त्याच्याकडे पाहून स्मित केले. थॉमसनही आपली हॅट काढून किंचित लवून पुढे गेला. पुढे गेल्यावर तो त्या विद्यार्थ्याला म्हणाला की मी ह्या बाईला कोठेतरी पाहिल्यासारखे वाटते. यावर तो विद्यार्थी म्हणाला Of course ! she is Mrs. Thomson !

**श्री. दत्ताण्णा** : वाचस्पती मिश्रांची अशीच हकिगत सांगतात. नवव्या शतकातले एक प्रकांड पंडित आणि टीकाकार म्हणून ते सर्वांना माहीत आहेत. ते केवळ विद्वान नव्हते तर उच्च कोटीचे साधकही होते. त्यांनी वैशेषिक दर्शन वगळता बाकीच्या सर्व दर्शनांवर टीका लिहिल्या असून आपला प्रत्येक ग्रंथ भगवंताला अर्पण केलेला आहे. ग्रंथलेखनात ते किती तन्मय होत आणि त्या वेळी बाह्य जगाचा त्यांना किती विसर पडत असे यासंबंधी एक आख्यायिका सांगतात. एकदा शारीरक भाष्यावर टीका लिहीत असतांना त्यांच्या खोलीतील दिवा विझला. त्यांच्या पत्नीने येऊन तो दिवा पुन्हा लावला तेव्हां वाचस्पती मिश्रांनी विचारले की तू कोण आहेस? ती म्हणाली, मी आपली दासी आहे. वाचस्पतींनी विचारले, तुला काही मागायचे आहे का? तिने उत्तर दिले, पतिसेवा हा हिंदू स्त्रीचा परम धर्म आहे. आपल्या चरणांची सेवा करायला मिळाली त्यामुळे माझे जीवन कृतार्थ झाले आहे. आपल्या चरणांशी मृत्यू यावा एवढीच माझी इच्छा आहे. ही आपली पत्नी आहे हे लक्षात येऊन वाचस्पती म्हणाले, हिंदू स्त्रियांमध्ये तू आदर्श आहेस. हा देह क्षणभंगुर आहे. त्याचा नाश होणारच. पण मी तुला अमर करीन. माझी ही टीका तुझ्या भामती या नांवानेच प्रसिद्ध होईल. त्यांची शांकरभाष्यावरील टीका भामती म्हणून ओळखली जाते. लोकही त्यांना भामतीकार म्हणून ओळखतात. पहा, इतकी वर्षे पत्नीबरोबर राहूनही ते ग्रंथलेखनात इतके तल्लीन झाले की त्यांना तिचा विसर पडला.

**साधक प** : ते जाऊ द्या; नाम घेतांना अर्धा तास तरी बाकीचे सगळे जग विसरून जावे.

**साधक ग** : मला वाटते, काही साठवायचे झाले, उदाहरणार्थ पैसा साठवायचा झाला तर खर्चाची बाजू नियंत्रित केल्याखेरीज जमा कितीही वाढविली तरी पैसा साठणार नाही. तसे नामस्मरण करीत असलो तरी जोपर्यंत ती शक्ती अनेक मार्गांनी वाया जात आहे तोपर्यंत हरी हृदयात साठणार नाही.

**श्री. दत्ताण्णा** : पैसे साठवायचे ठीक आहे. पुण्याला एका गृहस्थांच्या घरी बसलो होतो. तेथे नेहमी गोंदवल्याला येणारे एक गृहस्थ आले होते. त्यांना नेमावरचा पत्ता लिहून घ्यायचा होता म्हणून ते खिशातून डायरी काढू लागले. डायरीबरोबर एक पंचवीस पैशाचे नाणे त्यांच्या खिशातून बाहेर पडले आणि घरंगळत तेथील दिवाणाखाली गेले. ते नाणे खालून काढण्यासाठी त्यांनी कोण खटपट केली. शेवटी त्या घरातल्या एका मुलाने दिवाण बाजूला सरकवून ते

काढून दिल्यावर प्रथम ते खिशात टाकले आणि मला म्हणाले, आता पत्ता सांगा. नाणे मिळेपर्यंत त्यांना स्वस्थता नव्हती.

**साधक ग** : बरोबर आहे. मला तेच म्हणायचे आहे. चार आणे गेल्याची चुटपुट लागून ते जसे अस्वस्थ झाले तसे नामस्मरण करता आले नाही तर आपले मोठे नुकसान झाले अशी आपल्याला चुटपुट लागली पाहिजे.

**पू. बाबा** : हे खरे आहे. अशी चुटपुट लागल्याखेरीज स्वत:ला विसरता येणार नाही.

**साधक प** : ते विसरणे होवो किंवा न होवो, पण त्यांनी आपली काहीतरी प्रेमखूण दाखवावी.

**पू. बाबा** : बरोबर आहे तुम्ही म्हणता ते. मला वाटते, काहीही होवो 'तुझी इच्छा' अशी सर्व काळ वृत्ती झाल्याखेरीज चित्तशुद्धी होणार नाही आणि तोपर्यंत ही प्रेमखूण जाणवणार नाही. राम इच्छा आणि राम कर्ता हा श्रीमहाराजांचा मंत्र असे. जीवनात हे उतरल्याखेरीज वृत्ती भगवंताने भरून जाणार नाही. परवा एक साधक आले - तुम्हांला सर्वांना ते माहीत आहेतच - आणि म्हणाले की तुमचा आशीर्वाद द्या. मी विचारले हे काय नवीन! ते म्हणाले, नामदेवांनी म्हटले आहे 'नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी। एक तरी ओवी अनुभवावी।।' म्हणून मी ठरविले आहे की ''माळिये जेउते नेलें। तेउतें निवांतची गेलें। तया पाणियाऐसें केलें। होआवे गा।।'' ह्या बाराव्या अध्यायातील ओवीचा अनुभव घ्यायचा प्रयत्न करायचा. बापरे! सर्व काही त्याच्यावर सोपवून द्यायचे! निवांतमधे खरी गोम आहे. निवांत - स्वस्थ. खळबळ नाही.

**साधक ग** : निवांतमधे हार्मनी आहे.

**पू. बाबा** : बरोबर, अविरोध. काहीही घडू दे, विरोध नाही. कारण जे घडते आहे ते त्याच्या इच्छेने घडते आहे. श्रीमहाराज म्हणत, दमा म्हणतो की दमाने विषय भोगा. जीवनात सुखदु:खाच्या घटना घडणारच. सुखाने एकदम हुरळून जाऊ नये आणि दु:खाने खचून जाऊ नये. धीर असावा.

**साधक ड** : नामाचे संरक्षण वाटणे ही प्रेमखूणच आहे.

**साधक प** : मला वाटते, प्रत्येकाच्या स्वभावाप्रमाणे त्याला ती खूण जाणवेल. भक्तिमार्गी माणसाला संरक्षण वाटेल तर ज्ञानमार्गी माणसाला तो सगळीकडे भरलेला जाणवेल.

**साधक ड** : (पू. बाबांना) तुम्ही मागे म्हणाला होतात तसे; तक्रार करायची नाही.

**पू. बाबा** : ते मन शुद्ध झाल्याचेच लक्षण आहे.

**श्री. दत्ताण्णा** : ज्या प्रमाणात चित्तशुद्धी होईल त्या प्रमाणात जग निर्दोष दिसू लागेल; कारण आपल्यामधले दोषच आपल्याला बाहेर दिसतात. जे घडते आहे ते त्याच्या इच्छेने घडते आहे असे आतून वाटू लागले की विरोध नाहीसा होतो. हेबळ्ळीला गेलो तेव्हां सुरुवातीला तेथील लोकांनी खूप त्रास दिला, पण 'श्रीमहाराजांची इच्छा' म्हणून आम्ही स्वस्थ राहिलो. हळूहळू विरोध कमी झाला. आजदेखील जे होते आहे ते त्यांच्याच इच्छेने होते आहे. खरोखर जास्त जास्त अवघड प्रसंगातही मनाची स्वस्थता त्यांच्यावर सोपवता आले तरच टिकू शकते. एकदा प्रवासात चारशे रुपये चोरीला गेले. मन स्वस्थ राहिले. मनात म्हणालो, यापेक्षा मोठे नुकसान होऊ दे. दुसऱ्यांदा आठशे रुपये गेले. पुढे दोन हजार रुपये गेले. अलीकडे दहा हजार रुपयांचे नुकसान झाले; म्हणजे एकांना दिलेले परत येणार नाहीत. पण मन खालीवर झाले नाही. त्यांचीच इच्छा आहे असे आतून वाटू लागले की मन स्वस्थ होते.

**पू. बाबा** : शरीराचे जसे निरोगीपण असते तसे मनाचे किंवा आध्यात्मिक म्हणा, निरोगीपण असते. ज्या प्रमाणात हे निरोगीपण वाढेल त्या प्रमाणात माणसाची भीती, काळजी, चिंता इत्यादी कमी होत जातील आणि त्याच्या मनाला निरोगी स्वस्थता (तामसी आळस नव्हे) येईल. 'असू दे' असे वाटू लागेल. जे घडते आहे ते त्याच्या इच्छेने घडते आहे आणि ते माझ्या हिताचेच आहे अशी मनाची खात्री होईल. चिंता, भय इत्यादी कमी होणे हे अध्यात्मिक उंची वाढल्याचे लक्षण आहे.

**साधक ग** : "होणार तैसें होत जात। प्रपंचीं जाला आघात। डळमळिना ज्याचें चित्त। तो सत्त्वगुण॥" असे समर्थांनी सत्त्वगुणाचे वर्णन केले आहे.

**पू. बाबा** : भगवंताच्या आधाराखेरीज सत्त्वगुणाची वाढ होणार नाही. त्यासाठी त्याचे एकसारखे स्मरण पाहिजे. (श्री. दत्ताण्णांना) साध्या वाटणाऱ्या पण न समजणाऱ्या गोष्टी स्पष्ट झाल्या. हेच सत्संगाचे महत्त्व आहे.

**श्री. दत्ताण्णा** : होय. त्यासाठीच आम्ही आपल्याकडे येतो.

## |२८१| (७ ऑगस्ट १९९२)

**पू. बाबा** : माणूस पैशाच्या, सुखसोयींच्या मागे लागतो. पण हे सारे कशाकरता करायचे, जीवनाचे उद्दिष्ट काय ते विसरून जातो. कोठेही गेलात तरी तुमचे प्रारब्ध काही बदलत नाही. आजकाल जीवनात पुष्कळ सुखसोयी

झाल्या आहेत. त्यांची साधनाला मदत होत असेल तर त्यांचा अवश्य लाभ घ्यावा पण त्या नसल्या तर अडू नये. साधनात खंड येऊ देऊ नये. जो उठतो तो सुखाच्या आशेने परदेशात जातो.

**साधक ग** : प्रारब्धाचा सिद्धान्त मान्य केला तर ज्याचे अन्नोदक जेथे असेल तेथे तो खेचून नेला जातो.

**साधक क** : माझे एक मित्र नुकतेच ऑस्ट्रेलियातून येऊन परत गेले. त्यांना मी तेथील जीवनाबद्दल विचारले असतां ते म्हणाले, **Same earth, same sky**. म्हणजे कोठेही जा, जीवनाचा घाट तोच.

**पू. बाबा** : ते असू द्या. पॉंडिचरीच्या मदर आणि योगी अरविंद यांच्या लिखाणाचे आणि अनुभवांचे वेचे (selection) आहेत. त्यामधील मदरचा अनुभव वाचतांना आश्चर्य वाटले. तो अनुभव सांगण्याआधी श्रीमहाराज काय म्हणत ते सांगतो. ते म्हणत की जो परमार्थ प्रपंचात आणता येत नाही तो परमार्थ नव्हेच. प्रपंचही भगवंतानेच दिलेला आहे ना? तेव्हां प्रपंचातच परमार्थ साधला पाहिजे. त्यांनी परमार्थाची प्रपंचाशी सांगड घातली. कॉंटिनेंटल टायर कंपनीत घांगुर्डे नांवाचे मॅनेजर होते. ते म्हणत - Maharaj is not Maharaj if he is not practical! त्यामुळे महाराजांच्या जीवनातून, वचनांतून आणि आचरणातून आपल्याला पुष्कळ शिकायला मिळते. जगाची रचना mathematical आहे का? हायझेनबर्गचे म्हणणे आहे की जगाला नियमांच्या चौकटीत बांधता येत नाही. काही कामचलाऊ नियम दिसतात पण ते rigid म्हणजे कडक - न बदलण्यासारखे नाहीत. याचे कारण विश्वात एकसारखी नवनिर्मिती आहे. तर्कशास्त्र देखील एका मर्यादेपर्यंत उपयोगी पडते. काही गोष्टी अतर्क्यच म्हणाव्या लागतात. आइनस्टाइनचे एक पुस्तक आहे, त्यात त्याने म्हटले आहे की विश्वाला तुम्ही नियमांच्या चौकटीत बांधू शकत नाही कारण त्यात एकसारखी नवनवीन निर्मिती होत आहे. मदरनी त्यांचा एक अनुभव सांगितला आहे. त्या मनाच्या अशा एका अवस्थेत गेल्या की तेथे नियमांना काही अर्थच राहिला नाही. सगळे कसे मोकळे मोकळे होते. पण काही वेळाने देहभानावर आल्यावर सर्व नियम आणि रचना यथायोग्य आहे असे वाटू लागले.

**साधक क** : मायेचे हेच स्वरूप आहे. जी मोजता येत नाही ती माया. आहे म्हणावे तर तिचे स्वरूप लक्षात येत नाही आणि नाही म्हणावे तर आपले सगळे जीवन तिने व्यापले आहे.

**पू. बाबा :** मायेत राहून केलेला विचार एका परीने अविचारच म्हटला पाहिजे. आपण जे नियम म्हणतो ते मायेच्या क्षेत्रातले आहेत आणि ती तर क्षणोक्षणी बदलते! मदरनी किती बरोबर सांगितले आहे.

**साधक क :** श्रीरामकृष्णांनी या नियमांबद्दल फार छान सांगितले आहे. एकदा मथुरबाबू त्यांना म्हणाले की ईश्वराने केलेले नियम त्यालाही मोडता येत नाहीत. त्यावर श्रीरामकृष्ण म्हणाले, हे काय तुम्ही विचित्र बोलता? ज्याने नियम केले तो ते मोडूही शकतो. त्याला पाहिजे तसे तो करू शकतो. आईच्या राज्यात काय अशक्य आहे? तेव्हां मथुरबाबू पुन्हा म्हणाले, त्याला त्याने केलेले नियम मोडता येणे शक्य नाही. त्याने निर्मिलेल्या झाडाला पांढरी फुले म्हणजे पांढरी फुलेच यायची; लाल फूल येणार नाही. दुसरे दिवशी झाऊतलाकडून परत येतांना रामकृष्णांनी एका झाडावर सर्व पांढऱ्या फुलांत आलेले एकच लाल फूल पाहिले. लगेच त्यांनी ते तोडून घेतले आणि मथुरबाबूंकडे जाऊन त्यांना म्हणाले, काल तू म्हणत होतास ना, पहा, हे पांढऱ्या फुलांत आलेले लाल फूल! तेव्हां मथुरबाबू उद्गारले, बाबा! तुम्हांला कोण जाणणार?

**पू. बाबा :** मायेचे हे स्वरूप लक्षात घेऊन त्याचा नामस्मरणासाठी उपयोग करून घेता आला पाहिजे. आपले सगळे विचार, भावना, कल्पना, स्मृती इत्यादी देहबुद्धीतून येतात, त्या भगवंताकडे वळविता आल्या पाहिजेत. सुरुवातीला त्यासाठी थोडी शिस्त लागेलच; पण मग त्यातून बाहेर पडले पाहिजे; नाहीतर ते कर्मकांड होते. नाम घेतांना महाराजांचे अस्तित्व जाणवले पाहिजे.

**साधक प :** नाम घेतांना महाराजांचे अस्तित्व जाणवले पाहिजे याची आठवण असते पण अस्तित्वाची जाणीव नसते. म्हणजे त्यांचे स्मरण दुसऱ्या स्थानावर (removed to second degree) असते. उदाहरणार्थ, घरच्या एखाद्या माणसाची मला आठवण होते तेव्हां त्याच्या असण्याबद्दल मला काही शंका नसते. पण श्रीमहाराजांच्या अस्तित्वाबद्दल तसे होत नाही. ते देहात असतांना तशी भावना ठेवणे सोपे होते, पण आता ते अवघड जाते कारण देहापलीकडच्या अस्तित्वाची आम्हांला जाणीव नाही. विचाराने त्यांचे अस्तित्व मान्य केले तरी भावनेच्या बाजूने आपण कमी पडतो.

**पू. बाबा :** आज बुद्धीची प्रमाणाबाहेर वाढ झालेली आहे. नाम घेतांना भावनेचा ओलावा पाहिजे. मन त्यात रमून गेले पाहिजे.

बुद्धीच्या वाढीच्या संदर्भात जे. कृष्णमूर्तींसंबंधी बोलणे निघाले.

**पू. बाबा** : कृष्णमूर्तींनी सांगितले आहे ते बरोबर आहे पण ते कसे करायचे ते त्यांनी सांगितले नाही. नुकतेच श्री. अच्युतराव पटवर्धन वारले. ते कृष्णमूर्तींकडे जात असत. त्यांचा धाकटा भाऊ पावसच्या स्वामी स्वरूपानंदांचा अनुग्रहीत. मला गोंदवल्यास भेटला होता. त्याला एकदा अच्युतराव म्हणाले, तुझे हे चांगले आहे. स्वामींनी सांगितलेला जप केला म्हणजे झाले, पण कृष्णमूर्ती गेल्यानंतर आता आम्ही गटांगळ्या खातो आहोत! खरोखर रजनीशांनी म्हटले ते बरोबर आहे. कृष्णमूर्तींचा मोठा दोष म्हणजे त्यांनी एकही शिष्य तयार केला नाही. गुरु मानू नका म्हटले की शिष्य कोठून येणार? याच्या उलट श्रीमहाराजांनी सामान्य माणसेच हाताशी धरली आणि त्यांना परमार्थाच्या मार्गावर पुढे नेले. केवढी दया होती त्यांच्या हृदयात!

**साधक क** : श्रीमहाराजांचे सगळेच विलक्षण होते. वरवर सगळे सोपे वाटावे, संसारी वाटावे, पण त्यात मोठी शिकवण होती. महाराज तेथे आनंद होता.

**पू. बाबा** : नामस्मरणानेच तो आनंद भोगता येतो. शृंगेरीच्या शंकराचार्यांचे चंद्रशेखर भारती नांवाचे शिष्य होते. त्यांनी आद्य शंकराचार्यांच्या विवेकचूडामणीवर भाष्य लिहिले आहे. विवेकचूडामणीत सुमारे ५८० श्लोक आहेत. त्यापैकी पहिल्या ३५० श्लोकांनंतर आनंदाचे म्हणजे समाधीचे वर्णन आहे. पहिल्या ३४० श्लोकांवर भाष्य लिहिल्यानंतर पुढचे भाष्य ते लिहू शकले नाहीत. कारण आनंदाचे वर्णन करू लागले की त्यांची समाधी लागत असे. ज्ञानेश्वरी सांगतांना असे झाले पाहिजे.

**साधक क** : श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे की नामात जो रंगला तो एकतर नामाशिवाय दुसरे काही बोलणार नाही नाहीतर मौन धारण करील. ज्ञानेश्वर महाराजांनीही गुरूंची स्तुती करतांना तुमचे खरे स्वरूप मौन हेच आहे पण मला राहावत नाही म्हणून मी शब्दांनी तुमची स्तुती करतो असे म्हटले आहे.

**पू. बाबा** : नामाबद्दल बोलतांना एकदा श्रीमहाराज म्हणाले की नामस्मरणाने भगवंत जोडतो. नाम उपाधिरहित आहे आणि भगवंतही उपाधिरहित आहे. आपण उपाधिरहित झालो म्हणजे झाले! हे उपाधिरहित होणे कर्मशून्यता नव्हे, तर कर्तेपणाचा अभिमान नसणे. राम कर्ता याची सतत जाणीव राहाणे. देहबुद्धीच्या बरोबर उलट आत्मबुद्धी आहे.

**साधक क** : निसर्गदत्त महाराजांना एकदा कोणीतरी विचारले की तुम्ही देहभानावर राहून व्यवहार करता तेव्हां तुमची वृत्ती कशी असते? ते म्हणाले की मी देहभानावर येतो म्हणजे एखाद्या खोलीत प्रवेश करावा तसा असतो. मला पाहिजे तेव्हां मी तेथून बाहेर पडू शकतो. तुम्ही मात्र या खोलीत - देहात कैदी झालेले आहात.

**पू. बाबा** : आपल्याला नामाचे खरे महत्त्व, खरी किंमत समजलेलीच नाही. नामाचे महत्त्व कळणे फार कठीण आहे. कर्तेपणाचा भाव गेल्याखेरीज गुरूंवरील श्रद्धा बळकट होणार नाही आणि त्यांनी दिलेले नाम हेच सर्वस्व वाटणार नाही.

**साधक ग** : श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे की नाम सिद्ध करून दिले हे संतांचे जगावर मोठे उपकार आहेत.

**पू. बाबा** : होय. संतांनी भगवंताला सगुणात आणला आणि नाम सिद्ध करून दिले.

**साधक ग** : सध्या ज्ञानेश्वरीचा अठरावा अध्याय वाचतो आहे. त्यात कर्तेपणाचा अभिमान कसा नसावा हे सांगतांना दोन मार्मिक दृष्टांत दिले आहेत. एका माणसाला पोहोता येत नाही आणि नदीपलीकडे जायचे होते. तेव्हां पोहोता येणारा दुसरा माणूस त्याला म्हणाला की पाण्यात माझा कासोटा धर आणि त्याने त्याला पलीकडे नेले तर पोहोता न येणारा माणूस मी नदी पोहून गेलो असा अभिमान बाळगेल का? किंवा यजमानाच्या वतीने दक्षिणा देणाऱ्या उपाध्यायाला मी दाता आहे असा अहंकार होईल का? (१८.१६९, १७०) हा भवसागर पार करणे आपल्याला शक्य नाही म्हणून भगवंताचा अथवा सद्गुरूंचा आधार घ्यावा. तसेच आज आपल्याला जे मिळाले आहे ते त्यानेच दिलेले आहे म्हणून आपण उपाध्यायाच्या वृत्तीने अहंकार न बाळगता देत जावे.

**पू. बाबा** : खरोखर फार समर्पक दृष्टांत आहेत. फलाची इच्छा सोडून आणि अहंकाराचा त्याग करून कर्मे कशी करावी ते येथे सांगितले आहे. ज्ञानेश्वर महाराज, श्रीमहाराज यांचे जगावर केवढे उपकार आहेत. तुम्ही पहा, महाराष्ट्रीय संतांचे हे वैशिष्ट्य आहे की त्यांनी प्रपंचात, रोजच्या व्यवहारात परमार्थ आणला. श्रीमहाराजांचे रोजचे जीवन पहाणाऱ्याला त्यांच्या पारमार्थिक अधिकाराची कशी कल्पना येणार?

**साधक क** : आणि आपण श्रीमहाराजांच्या चरित्रात म्हटले आहे की रोजच्या लोकांच्या कटकटी कमी म्हणूनच की काय, काही वेळा ते काहीतरी नवी कटकट निर्माण करीत आणि मग तिची सोडवणूक करीत असत.

**पू. बाबा :** तथापि ते सारे लोकांना शिकविण्यासाठी असे. सामान्य माणसाला तयार करणे सोपे नाही.

**साधक क :** समर्थांनी मातीतून अत्तर काढले असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. श्रीमहाराजांनाही हेच वर्णन लागू आहे.

**साधक ड :** आईवडिलांच्या कर्तृत्वाची लहान मुलाला जाणीव नसते, तरीदेखील त्याची त्यांच्यावर श्रद्धा असते; तशी श्रीमहाराजांच्या बाबतीत आपली बालवृत्ती असावी. कारण खरे महाराज कळणे आपल्या शक्तीपलीकडे आहे.

**पू. बाबा :** हे सगळे ठीक आहे. पण आता नामात स्वत:ला विसरून जाता आले पाहिजे. त्यांची प्रार्थना करावी; त्यांच्याकडे मागावे, आता उशीर झाला, ते नामाचे प्रेम द्या म्हणावे. नाहीतर दुसरा मार्ग म्हणजे स्वामी रामदासांप्रमाणे अखंड नामस्मरण. पण ते आपल्या हातून होत नाही. मग मागायला काय हरकत आहे?

**साधक ब :** प्रार्थना आणि मागणे पाहिजेच.

### |२८२| (१४ ऑगस्ट १९९२)

**पू. बाबा :** सध्या आपली भगवद्गीतेच्या 'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत:।२.१६।' या श्लोकावरील टीका चालू आहे. विश्वात चैतन्य कसे गुप्तपणे भरून राहिलेले आहे ते सांगण्यासाठी ज्ञानेश्वर महाराजांनी चार दृष्टांत दिले आहेत. ज्ञानी - तत्त्वदर्शी सार म्हणजे शाश्वत आणि असार म्हणजे अशाश्वत वेगळे कसे करतात ते सांगितले आहे. (१) राजहंस पाणी आणि दूध वेगळे करतो. हा गुण त्याला जन्मत:च असतो. समर्थांसारखे संत या राजहंसाप्रमाणे असतात. (२) सोने भट्टीत घालून त्यातील हिणकस जाळून ते चोख करतात; अशाश्वत जाळून टाकतात. तुकाराम महाराजांसारखे संत परिस्थितीच्या आगीत तावून सुलाखून निघतात. (३) भूस आणि बीज एकत्र असेल तर ते पाखडून भूस उडवून लावतात. (४) दही घुसळले असतां ज्याप्रमाणे लोणी मिळते त्याप्रमाणे जाणिवेच्या चातुर्याने दृश्य जग घुसळून त्यातून परमात्मस्वरूप वेगळे करतात. ओवी अशी :

"नातरी जाणिवेचिया आयणी। करिता दधिकडसणी।
मग नवनीत निर्वाणीं। दिसे जैसे॥२.१६.१२९॥"

निरूपण झाल्यानंतर एका श्रोत्याने प्रश्न केला की ह्या ओवीचे मर्म काय आहे? जाणीव की नवनीत? ह्या ओवीवर नंतर मी बराच विचार केला आणि

मला काय वाटते ते प्रथम सांगतो. दधिकडसणी म्हणण्यात मोठा अर्थ आहे. दुधाला विरजण लावल्यावर दही बनते आणि त्या दह्यातच लोणी असले तरी दही घुसळल्याशिवाय ते मिळत नाही. परमात्मस्वरूप हे दुधासारखे आहे - निर्गुण निराकार आहे. त्याला मायेचे विरजण लागले की दही म्हणजे दृश्य विश्व आकाराला येते. दृश्य जग हे शाश्वत आणि अशाश्वत यांचे मिश्रण आहे. जाणिवेच्या युक्तीने ते घुसळल्याखेरीज म्हणजेच सारासारविचार केल्याखेरीज अशाश्वत जगाचे ताक बाजूला होऊन शाश्वताच्या लोण्याचे दर्शन होत नाही. म्हणूनच अध्यात्मात सारासार किंवा नित्यानित्यविवेक सांगितलेला आहे. जाणीव बुद्धीपेक्षा जास्त व्यापक आहे. आयणी म्हणजे चातुर्याने बुद्धीचा उपयोग करून आत्मानात्मविवेक करायचा आहे. यात अडचण काय आहे?

**साधक प** : साधक क म्हणतात त्याप्रमाणे आपल्या आतमध्ये दृश्याची इतकी भरवण आहे की शुद्ध स्वरुपाची जाणीव आम्हांला ठाऊकच नाही. ती भरवण काढून टाकण्यासाठी लागणारी शक्ती कमी पडते. जाणीव बुद्धीपेक्षा जास्त व्यापक आहे म्हणजे काय?

**पू. बाबा** : जी अस्तित्त्व जाणते ती जाणीव. मी आहे, मी जिवंत आहे हे ती जाणीव जाणते. जीवाच्या पातळीवर ती त्याला देहाला व्यापून आहे. किंवा असे म्हणता येईल की त्या विश्वव्यापक जाणिवेचा अंश प्राणिमात्राला व्यापून आहे. आणि त्या अर्थाने सर्व वस्तुमात्र एकच आहे. ही जाणीव जेव्हा सारासार विवेक करते तेव्हा दृश्य जग विलयाला जाऊन शुद्ध जाणीव उरते आणि खरा साक्षीभाव येतो. साक्ष शब्दाचा अर्थ स + अक्ष, नुसते पाहणारा. अर्थात द्वैताखेरीज हे शक्य नाही. देहतादात्म्यामुळे आपल्याला स्वत:कडे म्हणजे खऱ्या मीकडे पाहता येत नाही. ते पाहता येणे ही जाणिवेची आयणी म्हणजे चातुर्य आहे.

**साधक क** : दही घुसळतांना त्यातून लोणी निघणार आहे म्हणजे सारासार विचार करतांना (दृश्य हे दही) परमात्मस्वरूपाचे ज्ञान (हे लोणी) होणार आहे हे दही घुसळणाराला (सारासार विचार करणाऱ्याला) माहीत आहे का? माहीत नसेल तर तो दही कशाला घुसळेल? (सारासार विचार कशाला करील?) आणि माहीत असेल तर त्याला सत्स्वरूपाची जाणीव आहे असे म्हणावे लागेल?

**पू. बाबा** : त्याला अशी काही जाणीव नाही, पण गुरूच्या सांगण्यावर विश्वास ठेवून तो हे करतो.

**साधक ग** : वास्तविक गीतेच्या श्लोकात स्पष्ट सांगितले आहे की 'उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ।२.१६।' जे तत्त्व जाणतात - जाणू इच्छितात तेच आत्मानात्मविचार करतात.

**पू. बाबा** : बरोबर आहे. त्यांना तत्त्व जाणण्याची इच्छा असते.

**साधक ज** : जाणिवेचा मला थोडा वेगळा अर्थ आहे असे वाटते. दृश्यात आपण एखादी वस्तू, उदाहरणार्थ, झाड पाहिले तर हे झाड असे जाणणे ही जाणीव म्हणता येईल.

**साधक प** : हे झाड आहे असे तुम्ही ओळखले की मला वाटते, ती शुद्ध जाणीव राहणार नाही.

**साधक ब** : झाड ओळखणे ठीक आहे. पण त्यापुढे जाऊन हे कसले झाड आहे ते जाणण्याचा प्रयत्न केला की जाणीव शुद्ध स्वरूपात राहाणार नाही.

**पू. बाबा** : असे म्हणता येईल की लहान, अगदी तान्ह्या मुलाला उजेड कळतो पण तो उजेड कशाचा आहे याची त्याला जाणीव नसते. शुद्ध जाणीव ही केवळ उजेड जाणण्याप्रमाणे आहे.

**साधक ग** : जाणीव केवळ सत् रूप आहे. ती केवळ आहे. तिला नांवे देऊन वेगळे करू लागलो की तिचे स्वरूप शुद्ध राहात नाही. सर्व प्राणिमात्रांचे अंत:करण एक कसे आहे ते सांगतांना समर्थांनी दासबोधात म्हटले आहे की जी जाणीव वाघाच्या भयाने हरिणाला पळायला लावते तीच जाणीव वाघाला हरिणाच्या मागे धावायला लावते. दृश्यात वेगळे प्रकार दिसले तरी सर्व प्राणिमात्रात जाणीव एकच आहे.

**साधक ड** : आज आपले नाम जाणिवेपर्यंत खोल जाऊ शकत नाही. पण मला वाटते, भगवंतापर्यंत खोल पोचणारी जाणीव नामानेच निर्माण होईल. म्हणून आपण नाम घ्यावे. तेवढेच आपल्या हातात आहे.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणत, भगवंत निरुपाधिक आहे आणि नामही निरुपाधिक आहे. तुम्ही निरुपाधिक व्हा म्हणजे झाले. हे निरुपाधिक होणे म्हणजे नाम जाणिवेपर्यंत खोल जाणे आहे. श्रीमहाराजांप्रमाणे सात अष्टमांश लक्ष नामात आणि उरलेले एक अष्टमांश लक्ष व्यवहारात अशी स्थिती झाल्यानंतरच नाम जाणिवेपर्यंत खोल जाईल. तसे झाले की 'आत्मवत् सर्वभूतेषु' अशी स्थिती होते. 'अपने दिलसे जानिये मेरे दिल की बात' असे कबीराने म्हटले आहे. नाम जाणिवेपर्यंत खोल गेले की ही स्थिती प्राप्त होते.

|२८३| (२१ ऑगस्ट १९९२)

**पू. बाबा** : खरोखर घरच्या माणसांवर निस्वार्थी प्रेम करणे फार कठीण आहे. आपण नकळत त्यात गुंतून जातो. मुलगा-मुलगी आजारी असेल तर त्यासाठी योग्य आणि शक्य ती औषधपाण्याची व्यवस्था केली की आपले काम झाले. कारण काय व्हावयाचे ते प्रारब्धानुसार ठरलेले असते. श्रीमहाराज सर्व करतात हे आपण विसरतो आणि अस्वस्थ होतो. प्रत्येक गोष्ट ते करताहेत आणि माझ्या हितासाठी करताहेत असे वाटले पाहिजे. प्रपंचात प्रत्येकाचे कोठे ना कोठे गुंतलेले असते. ज्याचा त्याने विचार करून निर्धारपूर्वक ते दूर केले पाहिजे. पण ते असो. मागच्या शुक्रवारी आपली साक्षित्वाबद्दल चर्चा चाललेली होती. साक्षित्व म्हणजे काय हा सिद्धान्त समजला तरी ते व्यवहारात कसे आणायचे हा प्रश्न शिल्लक उरतोच. त्याबद्दल श्रीमहाराज काय म्हणत ते सांगतोच पण त्यापूर्वी पॉंडिचरीच्या मदरनी काय म्हटले आहे ते वाचून दाखवतो. त्या म्हणतात :

You see, to be free from all attachments doesn't mean to run away from opportunities for attachment. All those people who assert their asceticism not only run away, but warn others that they shouldn't try !"

"It seems to me so obvious when you need to run away from a thing in order not to experience it, it means you aren't above it, you are still on that level."

"All that diminishes or lessens, doesn't free. Freedom must be experienced in the totality of life and sensations."

"In this connection, there has been a whole period of study of this subject on the purely physical level..."

"For fear of acting wrongly, we stop doing anything; for fear of speaking wrongly, we stop saying anything; for fear of eating for the pleasure of eating, we stop eating anything - that's not freedom, it's simply reducing the manifestation to its minimum."

(आसक्ती निर्माण करू शकणाऱ्या वस्तू आणि प्रसंगांपासून दूर पळणे म्हणजे आसक्तीपासून मुक्त होणे नव्हे. पण अशा प्रकारे पळून जाऊन तप करणारे दुसऱ्यांनी मात्र असे करू नये असे बजावतात.

जेव्हां तुम्ही एखाद्या अनुभवापासून दूर पळण्याची गरज वाटते तेव्हां हे उघडच आहे की तुम्ही त्याच्या वर गेलेले नसता तर तुम्ही अद्यापि अनुभवाच्या जुन्या पातळीवरच असता.

जी गोष्ट संकुचित करते ती मुक्त करत नाही. समग्र जीवनात आणि भोगातही मुक्तीचा अनुभव आला पाहिजे. ह्या बाबतीत बराच काळ केवळ शरीराच्या पातळीवर अभ्यास केला गेला आहे.

चुकीची गोष्ट करू या भीतीने काहीच न करणे, चुकीचे बोलू या भीतीने काहीच न बोलणे, खाण्यात गोडी येईल या भीतीने उपवास करणे हे काही खरे स्वातंत्र्य अथवा मुक्ती नव्हे. हे केवळ या क्रियांच्या व्यक्त रूपावर बंधन घालणे आहे.

श्रीमहाराज म्हणत, मिळाली तर आज श्रीखंडपुरी खावी; पण उद्या शिळी भाकरी खावी लागली तर त्याची आठवण होऊ नये.

**साधक ब** : तसे होत असेल तर आज श्रीखंडपुरी खाऊ नये.

**पू. बाबा** : तसे नव्हे. भोग घ्यावे पण त्यात गुंतू नये. उपास-तापास कशासाठी करायचे याचा विचारच राहात नाही. उपास करून भगवंताचे स्मरण हे मुख्य आहे. श्रीमहाराज म्हणत की एकादशीला दूधभात खाऊन भगवंताचे स्मरण ठेवता आले तर तसे करावे.

**साधक ग** : श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे 'उपासापुढील ठाण। उपासना मुख्य जाण।'

**पू. बाबा** : होय, चैतन्यगीतेत आहे. पुढे मदर काय म्हणतात ते ऐका.

"He obviously conceives the coexistence of all opposites and that, to Him, must be the beginning of totality....No, the solution is to act from the divine impulse alone, to speak from the divine impulse alone, to eat from the divine impulse alone. That's what is difficult, because, naturally, you immediately confuse the divine impulse with your personal impulses !"

"That was the idea, I think of all the apostles of renunciation : eliminate all that comes from outside or from

below, so that if something from above manifests, you will be in a fit state to receive it... the aspiration to receive the true impulse should be kept intact - not the aspiration to total "liberation," but the aspiration to the ACTIVE identification with the Supreme, in other words to want only what He wants, to do only what He wants, to exist only through Him, in Him." (Mother's Agenda Vol. V pp 190, 192)

(सर्व द्वंद्वांचे साहचर्य राखणे हा त्याचा संकल्प आहे आणि ती त्याच्या समग्रतेची सुरुवात असावी. म्हणून दिव्य आवेशानुसार कृती करणे हाच मार्ग आहे. आपली कोणतीही कृती दिव्य आवेशातून झाली पाहिजे, बोलणे दिव्य आवेशातून झाले पाहिजे, खाणे दिव्य आवेशानुसार झाले पाहिजे. हे अवघड आहे कारण साहजिकच दिव्य आवेश आणि व्यक्तिगत आवेश यात गफलत होते.

जे जे बाहेरून अथवा खालून (भोगेच्छेतून) येते त्याचा त्याग केला तर जे वरून (भगवंताकडून) येईल ते स्वीकारण्यास आपण पात्र होऊ अशी संन्यास घेणाऱ्या साधकांची धारणा असते असे मला वाटते. खरा आवेश (दिव्य आवेश) याची सतत तळमळ वाटणे महत्त्वाचे आहे. मुक्तीच्या आकांक्षेपेक्षा ब्रह्मैक्यभाव होणे; वेगळ्या शब्दांत सांगायचे तर त्याला पाहिजे असेल ते आपल्याला पाहिजे असे वाटणे, त्याला पाहिजे असेल ते आपण करणे, केवळ त्याच्यासाठी नव्हे, त्याच्यातच जगावेसे वाटणे हीच खरी मुक्ती होय.)

श्रीमहाराज म्हणत, प्रपंचात राहून परमार्थ करता आला पाहिजे. प्रपंच तरी भगवंतानेच दिला आहे ना? अग्निब्राह्मणाच्या साक्षीने तुम्ही प्रपंच सुरू करता, तो वाईट कसा असेल? परमार्थ कसा करावा ते शिकावयाची संधी प्रपंचात मिळते; मात्र तो साक्षित्वाने केला पाहिजे. हे साक्षित्व कसे आणायचे हा खरा प्रश्न आहे.

**साधक प** : मला वाटते की आपल्या रोजच्या व्यवहारात विचारपूर्वक आपण वेगळे होऊन तिकडे पाहू शकतो. पण तेही काही वेळच टिकते. आपल्या नकळत ते साक्षित्व नाहीसे होते. साधनाच्या बाबतीत तर ते सूक्ष्म असल्याने जास्त कठीण आहे. आपल्या शक्तीच्या पलीकडे काही झाले की त्यांचे अस्तित्व पटते.

**पू. बाबा** : म्हणजे सारखी संकटेच यावयाला पाहिजेत का?

**साधक क** : अडचणीच्या वेळी त्यांच्या अस्तित्वाचा अनुभव येण्यापेक्षा त्यांच्या अस्तित्वाची सतत जाण पाहिजे. हा एक प्रकारे सौम्य पण आवश्यक अनुभव आहे.

**साधक प** : दृश्यातल्या घटनांच्या बाबतीत साक्षित्वाचा अभ्यास करून साधनात साक्षित्वाचा अभ्यास करावा लागेल. पण तेही कठीण आहे. आपल्याला केवळ दृश्यच खरे वाटते; इतकेच नव्हे तर त्यात सुसंवाद (हार्मनी) आहे. समजा, श्रीमहाराज माझ्यासमोर येऊन नुसते उभे राहिले तर माझे समाधान होणार नाही. त्यांनी काहीतरी बोलावे, निदान डोक्यावर हात ठेवावा असे वाटेल. खरोखर साक्षित्वाचा अभ्यास कठीण आहे.

**पू. बाबा** : म्हणूनच तो कसा करायचा ते सांगा

**साधक ब** : आपल्या वेगळेपणाचा क्वचित अनुभव येतो आणि अशा वेळी मन एकदम नामात रंगून जाते.

**साधक प** : पण तेही फार थोडा वेळ टिकते. असा अनुभव रोज आला पाहिजे. निदान पाहिजे तेव्हां हा अनुभव घेता आला पाहिजे.

**पू. बाबा** : म्हणजेच हा अनुभव हुकमी झाला पाहिजे म्हणा. त्यासाठी आपण नामस्मरण का करतो, त्याचा अर्थ काय याविषयी सावधानता हवी.

**साधक प** : सावधानता हवीच. मला वाटते की बुद्धीच्या पातळीवर तरी आता आपल्याला सगळ्यांना नामाचे महत्त्व पटलेले आहे. त्याबद्दल कोणाच्या मनात शंका नाही.

**पू. बाबा** : तथापि साक्षित्वाचा अभ्यास करायचा म्हणजे आपल्या रोजच्या व्यवहारातली प्रत्येक कृती नामाला किंवा श्रीमहाराजांना सांगून झाली पाहिजे.

**साधक ज** : मला वाटते की प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करायला पाहिजे असे नाही, कारण ते अंतर्यामी आहेत. माझ्या मनात जेव्हां एखादा विचार येतो तेव्हां माझ्याआधीच तो त्यांना माहीत असतो.

**साधक प** : ते ठीक आहे. पण त्यांची आठवण राहाण्यासाठी मी सांगणे आवश्यकच आहे. ते अंतर्यामी आहेत असे एकसारखे भान राहील तेव्हांची गोष्ट वेगळी.

**पू. बाबा** : श्री. भाऊसाहेब म्हणत असत की त्यांच्या कानावर घाला, म्हणजे आपली जबाबदारी संपली!

**साधक ग** : ते मनच वेगळे होते.

**साधक ड** : लहान मूल प्रत्येक गोष्ट आईला सांगून करते. पण तेच जरा मोठे झाले की आपली अक्कल चालवू लागते, तसे झाले आहे.

**पू. बाबा** : आणखी एक पर्याय आहे. माझी प्रत्येक कृती ते पहात आहेत असे सतत वाटले पाहिजे. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करण्यात किंवा सर्व काळ ते पहाताहेत हा भाव येण्यात एक तऱ्हेचे संरक्षण आहे. याच ग्रंथात मदरनी अरविंद काय म्हणत ते सांगितले आहे. **"shri Auribindo, too, wrote it : 'Aspire intensly but without impatience."**

**साधक ब** : Without impatience ! फार मोठी गोष्ट आहे.

**साधक प** : म्हणजे काळाचे भान गेले पाहिजे. नामस्मरण करतांना काळाचे भान जाणे कठीण आहे. इतर गोष्टीत, वाचनात वगैरे आपण गढून जातो कारण त्यात मनाचा-बुद्धीचा एक क्रम - sequence असतो, आणि sequence म्हटले की काळ आलाच. जे. कृष्णमूर्तींनी फार छान सांगितले आहे. ते म्हणतात, **It you want it, demand it intensly.**

**साधक ग** : ही दोन टोके आहेत. intensity तरी पाहिजे नाहीतर impatience तरी पाहिजे. एक तर केव्हांही मिळो पण फक्त तेच पाहिजे, दुसरे काहीही नको असे तीव्रतेने वाटले पाहिजे किंवा त्याच्याशिवाय मी आता जगू शकत नाही इतकी तळमळ पाहिजे.

**पू. बाबा** : त्यांच्या अस्तित्वाची सतत जाणीव असणे महत्त्वाचे आहे.

**साधक** : कृष्णमूर्ती demand it intensly म्हणतात, अर्थशास्त्रात demand या संज्ञेला विशिष्ट अर्थ आहे. **Demand is a want backed by purchasing power.** मला जी वस्तू पाहिजे तिच्यासाठी आवश्यक ती किंमत मोजायची माझी शक्ती आणि तयारी पाहिजे. श्रीमहाराज पाहिजेत तर त्यासाठी आवश्यक ती किंमत मोजायची तयारी पाहिजे.

**पू. बाबा** : वा! हा फार छान अर्थ सांगितलात. श्रीमहाराजांच्या चरित्रातील काही प्रसंगाचे स्मरण करून जपाला बसले तर मन चटदिशी एकाग्र होते. पण त्याच आठवणीने किंवा दुसऱ्या कोणत्या आठवणीने प्रत्येक वेळी हे जमतेच असेही नाही. काय करावे!

**साधक** : श्रीमहाराज साधनात आणि प्रपंचात मदत करतात याचा प्रत्येकाला अनुभव आहे.

**पू. बाबा :** पण अनुभवांची अशी गंमत आहे की त्यात मायेचे थोडे तरी मिश्रण असते आणि त्यामुळे त्या अनुभवाच्या खरेपणाबद्दल आपली आपल्यालाच शंका येते. म्हणून अनुभवांच्या मागे जाऊ नये. साधन करत राहावे.

## |२८४| (२८ ऑगस्ट १९९२)

**पू. बाबा :** मध्ययुगात विशेषत: हिंदी साहित्यातील भक्तिकाल पाहिला तर सर्व साधुसंतांनी नामाला महत्त्व दिलेले दिसते. कबीर आणि त्यांचा शिष्य धर्मदास हे तर नामाचे महत्त्व सांगतातच; पण चरणदास देखील नामाला किती महत्त्व देतात. वास्तविक ते मूळ योगी पण पुढे भक्तिमार्गाकडे वळले. दयाबाई आणि सहजोबाई या त्यांच्या दोन शिष्याही प्रसिद्ध होत्या. शब्द म्हणजे नामाचे महत्त्व सांगतांना चरणदास म्हणतात :

मैं मिरगा गुरु पारधी, शब्द लगायो बान।
चरणदास घायला गिरे, तन मन बींधे प्रान।।
सतगुरु मेरा सूरमा, करै शब्द की चोट।
मारै गोला प्रेमका, ढहै भरम का कोट।।

महाराष्ट्रातल्या संतांचे तर विचारायलाच नको. तुकाराम महाराज 'नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि। व्यभिचारबुद्धि न पवतां।।' असे सांगतात आणि ज्ञानियांचे मुकुटमणि ज्ञानराजही ज्ञानयोग सांगून पुन्हा 'नामाविण तत्त्व नाही रे अन्यथा। वायां आणिका पंथा जाशी झणीं।।' असे म्हणतात. ज्ञानेश्वर महाराजांप्रमाणे नाथांनी देखील भागवतासारखा एकोणीस हजारांपेक्षा थोड्या जास्तच ओव्यांचा ग्रंथ लिहिला. श्रीमहाराजांना एकदा त्याबद्दल सांगत होतो तेव्हां ते विनोदाने म्हणाले, तुम्ही आहात म्हणून आम्हांला हे (भागवत) ऐकायला मिळते! पुढे म्हणाले, येवढा मोठा ग्रंथ आहे पण त्यात मुख्य अशा दोनच गोष्टी सांगितलेल्या आहेत. गुरुआज्ञापालन आणि नामस्मरण ह्या दोनच गोष्टी खऱ्या. श्रीमहाराजांची बुद्धी अशी सारग्राही होती.

ह्या सगळ्या संतांना नाम हेच सर्वस्व वाटते. त्यांना नामाची जी Reality (सत्यता) वाटते ती आपल्याला कां वाटत नाही? नामापेक्षा काही प्रमाणात श्रीमहाराज खरे वाटतात. श्रीमहाराज म्हणत की टेलिफोनमधून बोललेले दूर अंतरावर ऐकू जाते. पण त्यासाठी टेलिफोनच्या नळीतून बोलावे लागते. तसे श्रद्धेच्या नळीतून नाम घेतले तर ते भगवंताजवळ पोचते. ती भावना, ती श्रद्धा आपल्याजवळ कां नाही? बरे नाही म्हणावे तर आहे; कारण त्याखेरीज आज

इतके दिवस आपण नाम घेतले नसते. नाम घेतांना भावना पाहिजे. ती कशी निर्माण करायची किंवा वाढवायची ते सांगा.

**साधक प :** आपल्याला दृश्य खरे वाटते, नाम खरे वाटत नाही. साधक ब म्हणाले की झाले ते जीवन पुरे झाले; मी तृप्त आहे. वास्तविक असे वाटू लागले तर माणूस मोकळा झाला पाहिजे. तो नामातच राहिला पाहिजे. पण तसे होत नाही. म्हणजे ही तृप्ती वरवरची आहे. आज आहे ते ठीक आहे, ते टिकू दे असे वाटते.

**साधक ब :** ते आहेच. काहीही होवो तुला सोडणार नाही असे वाटण्याइतके अजून मोकळे झालो नाही. नाम घेतांना काही वेळा भावना येते पण ती टिकत नाही.

**साधक ग :** श्रीरामकृष्णांचे शिष्य स्वामी सारदानंद यांनी 'श्रीरामकृष्ण लीलाप्रसंग (भाग एक) मधे, आपली इच्छा असूनही साधना का होत नाही असा प्रश्न उपस्थित करून त्याची तीन कारणे सांगितली आहेत. ते म्हणतात, संयमाचा अभाव, धारणाशक्ती नाही आणि पूर्वजन्मींचे प्रबळ असे विरोधी संस्कार या तीन गोष्टी साधनेच्या आड येतात.

**साधक प :** धारणाशक्ती कमी पडते हे खरे आहे. नाम सत्य आहे हे विचाराने पटले की जीवनातील इतर गोष्टींमधील रस कमी झाला पाहिजे. पण तसे होत नाही; कारण विचाराची तीव्रता आपल्याला टिकवता येत नाही.

**पू. बाबा :** असे कां होते ?

**साधक क :** विवेक पाहिजे हे खरे. तथापि माणूस आनंदाशिवाय राहू शकत नाही. वस्तूंमधून आनंद मिळतो असे त्याला वाटते. तो आनंद तात्पुरता असतो हेही त्याला माहीत असते. तथापि वस्तुरहित शाश्वत आनंदाचा आजतरी आपल्याला अनुभव नाही. त्या आनंदाची थोडी जरी चुणूक मिळाली तरी मग त्याच्याच मागे जायला सांगावे लागणार नाही.

**पू. बाबा :** हे सगळे मला का आठवले ते सांगतो. (साधक प ना) मागच्या शुक्रवारी तुम्ही म्हणाला की अगदी महाराज जरी समोर उभे राहिले तरी तेवढ्याने समाधान होणार नाही. त्यांनी काहीतरी केले पाहिजे. ते बोलले पाहिजेत. म्हणजेच कम्युनिकेशन पाहिजे. म्हणून तुकाराम महाराज काही तरी प्रेमखूण दे म्हणतात.

**साधक प :** समजा, अशी काही खूण मिळाली तरी ती दृश्यातली असते. त्यामुळे आपण तो अनुभव विसरून जातो.

**साधक ग :** अनुभव प्रकृतीच्या क्षेत्रातला असतो तोपर्यंत ती मायाच असते. हे खरे की खोटे अशी संशयाला जागा राहाते.

**साधक ज :** मला वाटते की भावनेला इतके महत्त्व द्यायची जरुरी नाही. बुद्धीला पटले, हेच सुखाचे असे वाटू लागले की माणूस नाम घेईलच.

**साधक प :** बुद्धीला पटून सुरुवात केली तरी भावना नसली की ती तीव्रता - intensity राहात नाही. आपण एक दिवस मरणार हे प्रत्येकाला माहीत आहे. पण एक दिवस म्हणजे आज नव्हे असे सोयीस्करपणे समजून आपण गाफील राहातो. वास्तविक मृत्यू कोणत्याही क्षणी येऊ शकतो हे बुद्धीला खरे पटून त्याची तीव्रता टिकली तर आपण एक क्षणदेखील फुकट दवडणार नाही.

**साधक ज :** साधक ग नी सांगितले तसे पूर्वजन्मींचे प्रबळ विरोधी संस्कार आड येतात.

**पू. बाबा :** पूर्वजन्मांचे जाऊ द्या. ह्या जन्मीदेखील आपण किती विरोधी गोष्टी आत घेतल्या आहेत! भावना पाहिजेच. मला आठवते - जवळजवळ पन्नास वर्षे तरी वाचून झाली असतील - श्रीरामकृष्ण म्हणाले की देवाचे नांव घेतांना ज्याच्या डोळ्यात पाणी येते त्याला देव दूर नाही. जो नामात रंगला त्याला बाकीच्या जगाचा आपोआप विसर पडेल. संसारात काही कमी जास्ती घडले तरी 'असू दे' अशी वृत्ती होईल. धर्मदासांनी नामरस म्हटले आहे. "आगे आगे दाहि चलै, पाछे हरियर होई।" वैराग्य आले की दृश्य संसार जळतो आणि मग नामाच्या प्रेमाने सगळीकडे हिरवेगार होते. खरोखर नाम हा किती अमूल्य ठेवा आहे!

**साधक ग :** "वस्तु अमोलिक दी मेरे सद्गुरु" असे मीराबाईने म्हटलेच आहे.

**पू. बाबा :** अमूल्य वस्तु. बरोबर आहे. आत्मदर्शनालाही वस्तूच म्हणतात.

**साधक ज :** प्रेमखूण म्हणतांना आनंद होण्यापूर्वी negation ने म्हणजे संसारात काही झाले तरी त्याने विचलित न होणे ही देखील प्रेमखूणच म्हणता येईल.

**पू. बाबा :** होय, हे जास्त बरोबर आहे. सुरुवात येथून होईल; पण पुढे तो नामात रंगला की 'नामाविण तत्त्व नाहीं रे अन्यथा' हे त्यालाही खऱ्या अर्थाने कळेल. यासाठीच भावना पाहिजे.

।२८५। (४ सप्टेंबर १९९२)

**पू. बाबा :** मी तुम्हांला एक प्रश्न विचारतो. अगदी प्रेमाने आणि अनौपचारिकपणे विचारतो. दर शुक्रवारी आपण येथे बसून चर्चा करतो. रविवारी ज्ञानेश्वरीच्या निरूपणानंतरही बोलतो. त्यानंतर तुमचे अनुसंधान कितपत टिकते ? एकसारखे नाम चालू नसले तरी त्याची आठवण एकसारखी राहाते का ? श्रीमहाराजांच्या लिहिण्यात आणि बोलण्यात दोन शब्द एकसारखे येत असत. नाम किंवा नामस्मरण आणि राम कर्ता. राम कर्ता असे आपल्याला खरे खरे वाटत नाही. ते वाटण्यासाठी काय करावे ?

आमच्या उत्तरासाठी न थांबता पू. बाबा पुढे बोलू लागले. श्री. भागवतांनी पॉंडिचरीच्या सत्प्रेम यांचे हे एक पुस्तक वाचायला दिले आहे. योगी श्रीअरविंद, मदर आणि सत्प्रेम यांच्या लेखन आणि संभाषणातील काही निवडक वेचे यात दिले आहेत. सत्प्रेम यांचे त्यांचा मित्र LVC VENET यांच्याबरोबर झालेले संवाद आहेत. त्यातला मदरचा काही भाग वाचतांना मी फार प्रभावित झालो. काय अनुभव आहेत त्या बाईचे! त्यातला काही भाग वाचून दाखवतो. (पृष्ठे ६६ व ६७). आधी काही भाग Introductory (प्रास्ताविक) आहे तो ऐका. शीर्षक आहे

**"The Divine"**

"Mother was really the focal point of an impossible contradiction. Through a body constituted and formed in the ordinary way, she was in touch with a world totally contrary to the ordinary way, a world where good and evil no longer had the same meaning, where the fixity of our laws, the sense of finiteness, distance and even time, became something different... which mother liked to call "The Lord", that is, a "something" one still cannot name without using circumlocutions" (म्हणजे ज्याला beating about the bush म्हणतो ते. जे अनुभव शब्दात पकडता येत नाहीत ते शब्दांनी कसे सांगायचे ? तेव्हां दृष्टान्तच द्यावे लागतात आणि ते अपुरे पडतात) "Yet which seemed endowed with a very concrete reality since "He" directed everything in the body at every second of life." (every second

of life हे महत्त्वाचे आहे. केव्हां तरी अनुभव आला असे नाही. तो अनुभव सतत टिकतो हेच अनुसंधान.)

(ईश्वरी

खरोखर अशक्य विरोधांचे मदर केन्द्रस्थान होत्या. सामान्य माणसासारख्याच घडलेल्या त्या शरीरातून ज्या जगात शुभ आणि अशुभ किंवा पाप आणि पुण्य यांना नेहमीचे अर्थ राहात नाहीत, नियमांचा निश्चितपणा, सीमितपणाची जाणीव आणि काळ देखील काहीतरी वेगळा होतो अशा सामान्य जगाहून वेगळ्या जगाशी त्यांचा संबंध होता... त्याला मदर "स्वामी" म्हणत. पण ते जे "काहीतरी" आहे त्याला कोणत्या तरी प्रकारांनी आडवळणाने शब्द योजावे लागतात; आणि तरी ज्याच्या ठिकाणी सत्यत्त्व असते "तो" प्रतिक्षणी शरीरात घडणाऱ्या क्रियांना मार्गदर्शन करीत होता).

ही Introduction झाली. आता मदर काय म्हणतात ते ऐका.

**Mother** : I say "the divine" - what is the "Divine ?" well, I don't know - and I can't say that I don't know either. And even saying that is wrong. That's not it. Everything is NOT IT (10/13/71).

But the body has learned that, even without ego, it is what it is; for it is that by the divine Will and not at all by the ego - we exist by the divine Will and not by the ego.

(मदर : मी "दिव्य" किंवा "ईश्वरी" म्हणते. पण "दिव्य" म्हणजे काय? खरे म्हणजे मला माहीत नाही. पण मला माहीत नाही असेही मी म्हणू शकत नाही. आणि हे म्हणणेही चूकच आहे. ते हे नव्हे. प्रत्येक वस्तू म्हणजे हे नव्हे. नेति नेति. (10/13/71)

अहंकार किंवा स्वार्थ नसतांनाही शरीर ते शिकले आहे. जे आहे ते आहे; कारण ते अहंकारामुळे नसून ईश्वरी इच्छेमुळे आहे. आपण अहंकारामुळे नसून ईश्वरी इच्छेमुळे आहोत.)

**पू. बाबा :** म्हणजे वासनांमुळे देह घडत असला तरी त्या देहाच्या धारणेसाठी अहंकार पाहिजेच असे नाही. सत्पुरुषांच्या वासना नाहीशा झाल्या तरी त्यांचा देह असतोच. आणि त्यांच्या ठिकाणी वासनाही नसतात आणि अहंकारही नसतो. सध्या आपला ज्ञानेश्वरीचा दुसरा अध्याय चालू आहे. त्यात भगवंतांनी "वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोपराणि। तथा

शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥२.२२॥'' असे सांगितले आहे. जीर्ण झालेले वस्त्र टाकून नवे वस्त्र धारण करावे तसा आत्मा एक जीर्ण देह टाकून दुसऱ्या देहात प्रवेश करतो. तथापि वासनाक्षय झाला की अहंकार राहात नाही आणि मग देह असला काय किंवा नसला काय त्याला महत्त्व राहात नाही. त्या श्लोकावर फक्त एका ओवीची टीका ज्ञानेश्वर महाराजांनी दिली आहे.

''जैसे जीर्ण वस्त्र सांडिजे। मग नूतन वेढिजे।
तैसें देहांतरातें स्वीकारिजे। चैतन्यनाथें॥२.२२.१४४॥''

तेव्हां अहंकाराखेरीज देह कसा चालेल असे जे वाटते तो भ्रम आहे. पुढे ऐका :

"The ego has been a means - a centuries - old means. Now it is worthless; it's time is over. It has had it's time, it's usefulness - it's over, its the past, far back in the past. Now (Mother lowers her fist) it's the consciousness, it's the Divine - individuality is the Divine."

(अहंकार हे साधन - शतकानुशतकांचे जुने साधन आहे. आता ते कवडीमोलाचे झाले आहे. ते कालबाह्य झालेले आहे - एका काळी ते उपयुक्त होते. पण आता ते संपले आहे, भूतकाळात जमा झाले आहे. आता (मदर आपली मूठ खाली आणतात) आता जाणीव दिव्य आहे. व्यक्तित्त्व दिव्य झालेले आहे.

**पू. बाबा** : ego आता कालबाह्य झालेला आहे. त्याची जागा आता दिव्य जाणिवेने घेतली आहे.

**साधक प** : The ego is now worthless हे मदरनी संपूर्ण मानवजातीबद्दल म्हटले आहे असे वाटते.

**साधक ग** : होय. supramental बद्दल सांगतांना श्रीअरविंदही सबंध मानवजातीबद्दलच सांगतात.

**पू. बाबा** : होय, हे बरोबर वाटते. पुढे ऐका :

"And this body has clearly understood, felt, "realized", as they say in English, that the sense of being a separate personality is totally unnecessary, TOTALLY unnecessary, not in the least indispensable to its existence. It exists by

another power and another will, which is not individual or personal - the divine will."

(आता या शरीराला समजले आहे, नव्हे, इंग्रजीत म्हणतात त्याप्रमाणे "जाणवले" आहे की वेगळ्या, स्वतंत्र व्यक्तित्त्वाची आता आवश्यकता राहिलेली नाही. अस्तित्वासाठी आता त्याची गरज नाही. आता जे अस्तित्व आहे ते दुसऱ्या शक्तीमुळे आणि इच्छेमुळे आहे. आता ती व्यक्तिगत स्वत:पुरती इच्छा नाही. आता ती दैवी इच्छा आहे.

**पू. बाबा :** आता नि:स्वार्थी जीवन शक्य आहे, इतकेच नव्हे तर स्वार्थाची गरज राहिलेली नाही.

जे घडते त्याचे कारण राम इच्छा. आमच्या घरात तसे कोणी दीर्घायुषी नाही पण मी ८३ वर्षे जगलो. का जगलो? त्याची इच्छा! श्रीमहाराज म्हणत, एखाद्या दीर्घायुषी माणसाला त्याच्या दीर्घायुष्याचे रहस्य विचारले तर निर्व्यसनीपणा, नियमितपणा इत्यादी कारणे तो सांगतो. पण तसे वागणारी किती तरी माणसे लवकर मरतात. तेव्हां कां जगलो याचे उत्तर मेलो नाही म्हणून येवढेच उरते. पण ते असो. मदर काय म्हणतात ते ऐका :

"And it will become what it is supposed to be only when it feels there's no difference between it and the Divine. That's all. Everything else is falsehood - false, false, false - and a falsehood that must go. There's only ONE Reality, only ONE life, only ONE consciousness (Mother lowers her fist) the Divine" (6/9/71)

(आणि जेव्हां त्याच्या आणि दैवी इच्छेत भेद नाही असे त्याला वाटेल तेव्हां त्याची जी परिणती व्हावयाची आहे ती होईल. बस्, इतकेच. बाकी सगळे मिथ्या आहे - मिथ्या, मिथ्या, मिथ्या. जे मिथ्या आहे ते नाहीसे झालेच पाहिजे. जगात फक्त एक सत्य, एक जीवन, एक जाणीव आहे. (मदर आपली मूठ खाली आणतात) दिव्य. 6/9/71)

"There was such a sense of warmth, of intimacy, of sweetness, and such a power at the same time, oh, so concrete ! The whole atmosphere, the whole atmosphere had become concrete, everything, but everything tasted like the Lord. I don't know how to explain that. It was completely

material, as if I had a mouthful of it ! It was everywhere, in everything. And So PHYSICAL ! So PHYSICAL ! Everywhere. Like - you could compare it to the most delicious taste you can experience (it had a very very material feel and taste of it). It's as if you could feel something solid in your hand when you closed it - such a warm and sweet and POWERFUL vibration, so powerful, so concrate !" (5/19/61)

(त्यामध्ये अतिशय उत्कटता, आपलेपणा... माधुर्य आणि त्याच वेळी - त्याबरोबरच शक्ती - प्रत्यक्ष शक्ती होती. सगळे वातावरण, सगळे आसमंत त्याने प्रत्यक्ष भरलेले होते आणि त्यात परमेश्वराचे अस्तित्व जाणवत होते. ते कसे सांगायचे ते मला समजत नाही. ते पूर्णपणे प्रत्यक्ष होते. जणू मी त्याची चव घेत होते. ते सर्वत्र आणि सर्वांमध्ये होते. ते मूर्त होते, प्रत्यक्ष होते. ते सर्वत्र इतके मूर्त होते की अतिशय मधुर चवीच्या अनुभवाशीच त्याची तुलना करता येईल. ते प्रत्यक्ष आहे, मूर्त आहे असे जाणवत होते आणि त्याला स्वत:ची अशी चव होती. एखादी घन वस्तू हातात घेतलेली जाणवते तसे ते प्रेमळ, मधुर शक्तिमय स्पंदनयुक्त होते. इतके शक्तिपूर्ण, इतके मूर्तिमंत! 5/19/61)

**पू. बाबा** : (उतारा वाचून झाल्यावर) मला आठवते, बहुधा केशवचंद्र सेन यांनी श्रीरामकृष्णांना विचारले होते की तुम्ही ईश्वर पाहिला आहे का? ते हो म्हणाले तेव्हां केशवचंद्रांनी तो कसा आहे म्हणून विचारले. श्रीरामकृष्ण म्हणाले, हवा जशी दिसत नाही पण सर्व बाजूंनी आणि आपल्यामधे ती भरलेली जाणवते तसा ईश्वर मला जाणवतो. So physical !

बाईचे काय अनुभव आहेत बघा! सतत त्याचे चिंतन करून तिला ही अवस्था प्राप्त झाली. राम कर्ता हा भाव टिकविण्याचा आपण प्रयत्न करतो. काही वेळ तो राहतोही; पण मग काय आड येते?

**साधक ग** : अज्ञानाच्या लक्षणांसारखेच हे आहे. अज्ञान आहे म्हणावे तर मला थोडेसे ज्ञान आहे असे वाटते. तसे राम कर्ता म्हणतांना मीही कर्ता आहे असे वाटते. काही मर्यादेपर्यंत मी कर्ता आहे. मी ठरवतो आणि तसे होते असा प्रत्यक्ष अनुभवही आहे.

**साधक ड** : बरोबर आहे. तो कर्ता आहे पण मीही कर्ता आहे. तथापि तो सुप्रीम कर्ता आहे असे मात्र वाटते.

**साधक प** : राम कर्ता हा सिद्धान्त बरोबर आहे पण माझा रोजचा अनुभव वेगळा आहे. मी हात हलवावयाचे ठरवतो आणि हात हलवतो. मेंदूमध्ये सर्व क्रियांसाठी लागणाऱ्या संवेदनांचा साठा तयार झालेला आहे आणि त्याप्रमाणे मी रोजच्या व्यवहारात वागत असतो. ते सगळे जाऊन शरीराच्या प्रत्येक पेशीमध्ये राम कर्ता हा भाव भरायला पाहिजे; मगच तो दृढ होईल. मला वाटते, नामस्मरणानेच ते होईल.

**पू. बाबा** : सर्व शरीर एखादी गोष्ट मागते आहे असा आपल्याला कधी अनुभव आहे का?

**साधक प** : एखादी गोष्ट पाहिजे असे उत्कटतेने वाटते तेव्हां सगळे शरीर ती गोष्ट मागत असते. लहान मुलाच्या हातातले त्याला अतिशय आवडणारे खेळणे काढून घ्या. ते जो आक्रोश करते त्यामध्ये सर्व शरीराचा आक्रोश असतो.

**पू. बाबा** : श्रीमहाराज नेहमी राम इच्छा आणि राम कर्ता असे म्हणत. त्यांच्या निकटच्या एका गृहस्थांनी मी करतो म्हणा असा हट्ट धरला तेव्हां ते म्हणाले, जे शब्द उच्चारून आजपर्यंत मी माझी जीभ विटाळली नाही ते शब्द उच्चारायला तू मला सांगतोस! मी कर्ता म्हटले तर जिभेला विटाळ व्हावा इतकी ती भावना त्यांच्या रोमरोमात भरलेली होती.

**साधक प** : व्यवहारात मी करतो, मी देतो असे ते म्हणत असणारच. पण त्यामागे राम आहे हे त्यांचे अनुसंधान होते.

**पू. बाबा** : होय; मी सांगतो असे म्हणत असतच ना!

**साधक ग** : पण त्या मी मागे लगेच तो असे. ज्याने माझ्या हातात आपला हात दिला त्याचा हात मी रामाच्या हातात दिला असे ते म्हणाले.

**पू. बाबा** : त्यांना जशी रामाच्या सत्तेची जाणीव होती तशी आपल्याला का राहात नाही?

**साधक ज** : मला वाटते, राम कर्ताला पर्याय म्हणजे जे जे घडते ते ते प्रारब्धाने घडते असा दृढ विश्वास असला तरी काम होईल. राम कर्ता म्हणतांना माझ्या जीवनात सर्व काही तो करतो आहे तसा इतरांच्या जीवनातही तो कर्ता आहे. दुसरा कोणी मला बोलला किंवा माझा अपमान केला तर तेही रामाने त्याच्याकडून करविले आहे असे वाटून त्याचा राग येता कामा नये. हे अवघड आहे. त्यापेक्षा माझ्या जीवनात जे काही घडते आहे ते प्रारब्धाने घडते आहे म्हणणे सोपे वाटते.

**पू. बाबा :** श्रीमहाराज राम इच्छा, राम कर्ता म्हणतात त्याचा अर्थ जास्त कळावा म्हणून स्वामी रामदासांचे लिखाण पाहिले. त्यात पदोपदी Rama's will, Rama's will असे ते म्हणतात. प्रारब्ध म्हटले काय आणि Rama's will म्हटले काय अर्थ एकच आहे. प्रारब्धावरून बरी आठवण झाली. परवा दुपारीच पुण्याहून एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांना दोन मुलगे. धाकटा ५-६ वर्षांचा आणि मोठा ८-९ वर्षांचा. ह्या मुलांना घेऊन ते गोंदवल्याला गेले आणि दोघांनाही समाधीवर अनुग्रह देवविला. धाकटा मुलगा तेव्हांपासून नामस्मरणात रंगून गेला. रंगून गेला हे त्यांचेच शब्द. नेहमी श्रीमहाराजांबद्दल बोलायचा. त्यांच्या तसबिरीला घालण्यासाठी फुले गोळा करायचा. आईला म्हणायचा, मी तृप्त आहे. म्हणजे काय म्हणून आईवडिलांनी विचारल्यावर म्हणाला, महाराज भेटले, माझे काम झाले. पुढे तो टायफॉइडने आजारी पडला आणि त्या आजारातच आईच्या मांडीवर डोके ठेवून शांतपणे गेला! त्या गृहस्थांनी असे का घडले आणि हे माझ्या वाट्याला का आले म्हणून विचारले. मी म्हणालो, याचे उत्तर कसे देता येईल? नामाची वासना राहिलेला कोणीतरी सत्पुरुष जन्माला आला आणि त्याची ती वासना पूर्ण झाल्यावर गेला. हे प्रारब्ध!

**साधक प :** प्रारब्ध हे तसे dead आहे. त्यापेक्षा राम कर्ता किंवा महाराज कर्ते म्हणण्यात जिवंतपणा आहे. त्यामधे माझ्यासारखेच प्रत्यक्ष करणारे दुसरे कोणीतरी आहे असे वाटते. त्यांच्याजवळ रडता येईल, हट्ट करता येईल असे वाटते. प्रारब्धाचा सिद्धान्त घोटाळ्यात टाकणारा आहे. प्रारब्ध म्हटले की संचित, क्रियमाण इत्यादी आलेच. आपण नुसते प्रारब्ध कुठे भोगतो? त्यात भर घालत राहातो. फक्त आत्मज्ञान झालेले सत्पुरुषच केवळ प्रारब्ध भोगतात.

**साधक ड :** मला वाटते, प्रारब्धाचा विचार करतांना तो फक्त आपल्या बाजूने करावा. माझ्या प्रारब्धात अपमान सोसणे आहे येथेच थांबावे. त्याच्यापुढे माझा अपमान करणाऱ्याच्या प्रारब्धात माझा अपमान करणे आहे वगैरेत शिरू नये. तथापि प्रारब्ध शुष्क वाटते. राम कर्ता म्हणण्यात प्रेम आहे. तो भाव वाढवावा.

**साधक प :** मला वाटते, राम कर्ता हा भाव वाढवावा म्हणण्यातच contradiction आहे. माझ्या कर्तेपणाने त्यांचे कर्तेपण कसे वाढवता येईल? तो कर्ता आहे; तो माझे काय करायचे ते करील. मी फक्त नामस्मरण करीत राहावे.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. योगी श्रीअरविंदांनी म्हटल्याप्रमाणे intense aspiration with infinite patience पाहिजे. सतत अनुसंधान ठेवणे महत्त्वाचे आहे.

## |२८६| (११ सप्टेंबर १९९२)

**पू. बाबा** : आपण आज इतके दिवस नाम घेतो आहोत, त्याचा काही परिणाम नको का दिसायला? संतांनी नामाचे इतके महत्त्व गाइलेले आहे. तुकाराम महाराज नामाच्या बळाने अवघ्यांचे तोंड काळे केले म्हणून सांगतात. समर्थ म्हणतात, 'नाम स्मरे निरंतर। ते जाणावे पुण्यशरीर। महादोषांचे गिरिवर। रामनामें नासती॥' नामाने आपले पाप नाहीसे होते आहे का? नामापुढे टिकेल असे पापच नाही असे श्रीमहाराज म्हणत. नाम हे पाप नाहीसे करायचे म्हणजे चित्तशुद्धीचे साधन आहे. आज इतके दिवस आपण नामस्मरण करीत आहोत. त्याचा परिणाम म्हणून आपले दोष कमी झाले आहेत का? इतक्या साधुसंतांनी नामाचा महिमा सांगितलेला असतांना आपल्यावर त्याचा परिणाम होत नसेल तर साधन वापरतांना म्हणजे नाम घेतांना आपले काहीतरी चुकते आहे.

किंवा ते एक वेळ राहू दे. नामस्मरण हेच माझे ध्येय आहे. मी नाम अखंड घेत राहाणार. त्याने काय होते इकडे पाहणार नाही, असेही आपले होत नाही. श्रीमहाराजांनी नाम घ्यायला सांगितले आहे. नाम हेच सर्वस्व आहे. बाकी काही न करता नामस्मरणच करीन असे श्री ब्रह्मानंद महाराजांनी केले आणि भाऊसाहेबांनीही केले. तेव्हां आपले कुठे चुकते ते सांगा. श्रीमहाराजांनी तर सांगितले आहे की उद्या मी जरी नाम घेऊ नका म्हणून सांगितले तरी माझ्यावर विश्वास ठेवू नका; नामावर ठेवा.

**साधक प** : नुकतेच कृष्णमूर्तींचे जर्नल वाचले. त्यात त्यांनी विचारले आहे Can't you hear (the sound of) the earth? I am hearing the tree. त्यांनी हेही स्पष्ट केले आहे की hear the tree म्हणजे पानांची सळसळ नव्हे, तर त्याचा sap जीवनरस वर चढतांना होणारा आवाज.

**साधक ग** : योगानंदांनीही Autobiography of a yogi मधे अशा प्रकारचे वर्णन केले आहे. त्यांनी जगदीशचंद्र बोसांना विचारले की झाडांना भावना असतात हे त्यांनी कसे शोधले? तेव्हां जगदीशचंद्र म्हणाले की त्यांना तो अनुभव तादात्म्याने आला. कृष्णमूर्तींनाही खोडातून वर चढणाऱ्या जीवनरसाचा आवाज तसाच ऐकू आला असावा.

**साधक प :** मला वाटते की आपल्यावर दृश्याचा इतका पगडा आहे की नामासाठी आवश्यक असलेल्या सूक्ष्म पातळीवर आपण पोचू शकत नाही. वास्तविक दृश्य तात्पुरते आहे पण तरी त्याची ओढ आहे.

**साधक ड :** एकनाथ महाराजांचा नामासंबंधी एक अभंग आहे. ते म्हणतात :

नाशिवंत सर्व एक नाम साचे। म्हणोनी वदा वाचे श्रीराम॥ १ ॥
शरीर नासे संपत्ती नासे। नाम न नासे श्रीरामाचे॥ २ ॥
आकार नासे निराकार नासे। नाम न नासे श्रीरामाचे॥ ३ ॥
स्थूळ नासे सूक्ष्म नासे। नाम न नासे श्रीरामाचे॥ ४ ॥
जें न नासे तें नाम वाचे। एका जनार्दनीं साचें जप करी॥ ५ ॥

**साधक ग :** बाकी सगळे नासणारे म्हणजे अशाश्वत आहे. केवळ नामच शाश्वत आहे. आम्ही नाम घेतो ते देहबुद्धीतून घेतो. चित्त शुद्ध होऊन नामासाठी आवश्यक ती सूक्ष्मता आल्याखेरीज नामाचे खरेपण समजणार नाही.

**पू. बाबा :** ती सूक्ष्मता कशी येईल? नामाची संगत कशी घडेल?

**साधक प :** दृश्याची ओढ गेल्याखेरीज मनाला सूक्ष्मता येणार नाही.

**साधक ड :** नामस्मरण करतांना आपल्याजवळ शरणागतीचा भाव नाही. राम कर्ता हेही पूर्णपणे खरे वाटत नाही. नामाच्या किंवा श्रीमहाराजांच्या शक्तीची नीट कल्पना नसली तरी लहान मूल जसे आपल्या आईवर विसंबून राहाते, तिच्याजवळ निर्धास्त असते तसा लहान मुलाचा भाव नामस्मरण करतांना ठेवावा असे मला वाटते. त्याचबरोबर सत्संगही अतिशय महत्त्वाचा आहे. संगत मिळाली की भाव निर्माण होतो. लो. टिळकांचे आम्हांला माहीत नाही पण सावरकरांची भाषणे ऐकून सामान्य माणसांच्या ठिकाणी देखील स्वातंत्र्याचे प्रेम निर्माण झाले आणि देशासाठी बलिदान करायला लोक तयार झाले.

**पू. बाबा :** आईचे तान्ह्या मुलावर प्रेम असतेच पण एखाद्या वेळी एकाएकी तिची प्रेमभावना उचंबळून येते; तसे काही वेळा तरी नाम घेतांना व्हावे.

**साधक प :** काही वेळा तसे होते. श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवते. पण तो भाव हुकमी झाला पाहिजे.

**साधक ज :** मला वाटते भावापेक्षा विचाराने हे करता येईल.

**पू. बाबा :** विचार हे दुधारी शस्त्र आहे. विचार नीट चालला तर ठीक.

**साधक ग :** समर्थांनी सांगितले आहे की 'विवेकें क्रिया आपुली पालटावी।' सार असार वेगळे करून असाराचा त्याग केला पाहिजे. यासाठीच दुसऱ्या एका

श्लोकात ते मनाला सत्संगती धरायला सांगतात. स्वामी रामदासांचा सारासार विचार इतका तीव्र झाला की नाम घेत बसले की त्यांचे मन शांत होत असे. आज आम्हांला व्यवहारात अस्वस्थता वाटत नाही, उलट स्वस्थता वाटते; ती नाहीशी झाल्याखेरीज नामात मन रंगणार नाही.

**पू. बाबा** : म्हणजे पुन्हा valuation चाच प्रश्न आला. व्यवहार रुक्ष वाटला पाहिजे. केव्हां एकदा नामाला बसतो असे झाले पाहिजे. यासाठी शरणागती पाहिजे. ती यावी म्हणून प्रार्थना करायला काय हरकत आहे? अगदी रोज प्रार्थना करावी. पन्नासदा केली की एकदा तरी आतून येईल.

**साधक प** : यासाठी आपल्या मेंदूतील आजपर्यंतचा प्रोग्रॅमच बदलला पाहिजे.

**साधक ग** : प्रोग्रॅम बदलला पाहिजे म्हणणे काय आणि विवेकाने क्रियापालट केला पाहिजे म्हणणे काय दोन्ही एकच आहे. आपण बदलू म्हणून काही तो बदलत नाही म्हणून प्रार्थना करणेच आपल्या हाती पाहिजे.

**साधक क** : मुख्यत: भाव पाहिजे.

**पू. बाबा** : तो कसा आणायचा सांगा.

**साधक ज** : भाव यावा म्हणून खटपट करण्यापेक्षा मी तेच आहे अशा श्रद्धेने नाम घेतले तर सोपे जाईल.

**साधक** : मी तेच आहे म्हणण्यापेक्षा मी त्यांचा आहे म्हणावे.

**पू. बाबा** : हा नुसता सिद्धान्त झाला. अमृताहुनी गोड नाम तुझे देवा असे संत म्हणतात त्याचा थोडा जरी अनुभव आला तरी काम होईल. तुकाराम महाराजही प्रेम अमृताची धार म्हणतात ते उगीच नाही. ते त्यांचा स्वत:चा अनुभव सांगतात. सिद्धान्त आचरणात उतरले पाहिजेत.

**साधक क** : यासाठी मुख्य म्हणजे तळमळ पाहिजे.

## |२८७| (१८ सप्टेंबर १९९२)

**पू. बाबा** : श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतलेल्या एक बाई आहेत. रोज त्या श्रीमहाराजांची मानसपूजा करतात. त्यांनी कळविले आहे की मानसपूजा करतांना त्यांना तुकामाईंचे (श्रीमहाराजांचे गुरु) दर्शन झाले. खरोखर हे शास्त्र मोठे गूढ आहे. पूर्वजन्मी त्यांचा तुकामाईंशी संबंध आलेला असणार म्हणून त्यांना ते दिसले. त्या बाईंनी पाठविलेल्या निरोपामुळे मला दोन जुन्या हकिगती आठवल्या त्या आधी सांगतो.

१) आपल्या इथल्या एका प्रख्यात कम्युनिस्ट पुढाऱ्यांच्या पत्नीला मानसिक उद्विग्नता (mental depression) आली होती. त्यावर येथे आणि मॉस्कोमधील मानसोपचार तज्ञांकडून उपचार केले पण गुण आला नाही. डॉ. मराठे त्यांना होमिओपॅथीचे औषध देत होते. त्यांनी या बाईंना श्रीमहाराजांना (पेटीवर) भेटावयास सुचविले. त्या पुढाऱ्यांनीही तेथे काही बुवाबाजी नाही ना, मग जायला हरकत नाही म्हणून सांगितले. येथे येण्यापूर्वी त्या सज्जनगडावर जाऊन आल्या होत्या आणि तेथील वातावरणाने त्यांना बरे वाटले होते. श्रीमहाराजांना त्यांनी हे सांगितल्यावर श्रीमहाराज म्हणाले की म्हणूनच आपली भेट झाली. पहिल्या भेटीत श्रीमहाराजांनी त्यांची मोठ्या आस्थेने चौकशी केली आणि सज्जनगडावर जाऊन मंत्रानुग्रह घ्यावा असे सुचवले. दररोज समर्थांची मानसपूजा करीत जा, म्हणाले. त्याप्रमाणे त्यांनी केले. नियमित मानसपूजा व जप करू लागल्या आणि त्यांची उद्विग्नता नाहीशी झाली. पुढे एकदा त्या श्रीमहाराजांना म्हणाल्या की त्या मानसपूजा करू लागल्या की समर्थांची आणि श्रीमहाराजांची अशा दोन्ही मूर्ती डोळ्यासमोर येतात. असे का होते म्हणून विचारल्यावर श्रीमहाराज म्हणाले, ते बरोबर आहे; तेच ते!

२) अनुग्रह देण्याच्या आधी मला (पू. बाबांना) श्रीमहाराजांनी देहू आळंदी वगैरे तीन-चार ठिकाणी जाऊन यायला सांगितले होते. यांपैकी कोणत्याच ठिकाणी मला विशेष काही वाटले नव्हते; मात्र सज्जनगडावर वाटले होते की गुरु असावा तर असा. अनुग्रह घेतल्यानंतर पुढे अनेकदा मला समर्थ आणि श्रीमहाराज दिसत असत. श्रीमहाराजांना मी हे सांगितले त्या वेळीही त्यांनी ते बरोबर आहे; तेच ते! असे उद्गार काढले होते.

पण ते असू दे; आजचा विषय महत्त्वाचा आहे. जपाच्या शरीरावर होणाऱ्या परिणामांबद्दल आज सांगणार आहे. जप करतांना काही दिवस तो छान होतो, तर काही दिवस aridity - रुक्षपणा किंवा lassitude म्हणजे म्लानता येते. एखादे फूल कोमेजावे तसे असते. गुरुदेव रानड्यांना aridity चा अनुभव येत असे असे ते म्हणाले. असे होण्याचे कारण आपले शरीर आणि नर्व्हज् - नसा पुरेशा बळकट झालेल्या नसतात. त्यांची ताकत वाढली की काही दिवसांनी साधन पुन्हा चांगले चालू होते. या मर्यादेपर्यंत आपण पोचले पाहिजे. त्याशिवाय आपल्या शरीरातील मर्मस्थाने आपल्याला कशी समजतील?

हठयोगामधे जसे योगक्रियांचे शरीरावर परिणाम होतात तसे नामस्मरणही बरेच होऊ लागले की त्याचे शरीरावर परिणाम होतात. मुख्यत: हे परिणाम

आधी नसांवर (nerves) होतात. त्या पुरेशा बळकट नसल्यामुळे त्यांचे शरीरावर विपरीत परिणाम दिसू लागतात. मात्र विशिष्ट हद्द ओलांडून साधक ध्यानावस्थेपर्यंत पोचला की साधन आणि शरीर यांचा संबंध सुटतो आणि साधक वरच्या अवस्थेत जातो. कोणत्या साधकावर काय परिणाम होईल हे तसे सांगता येणे शक्य नसले तरी spiritual health (आध्यात्मिक आरोग्य) सुधारत असल्याचे ते लक्षण असते.

माझी स्वत:ची पाठ व कंबर दुखू लागे. मात्र जास्त वेळ बसल्यामुळे जशी रग लागते तसे ते दुखणे नव्हते. किडनीचा त्रास होऊ लागला की होणारे ते दु:ख होते. श्रीमहाराजांना पहिल्यांदा त्याबद्दल सांगितले तेव्हां ते म्हणाले, असं का! हा जास्त जपाचा परिणाम आहे. जप थोडा कमी करा आणि साधन करतांना ते तुमचं किडनी का काय म्हणता ते सांभाळा.

जपाचा आणखी एक परिणाम मला दिसून आला आहे. (यातला मी काढून टाका; आपण याकडे शास्त्रीय दृष्टीने पहात आहोत.) काही वेळा बराच वेळ जप झाल्यानंतर मीठ खावे, लोणचे खावे असे वाटू लागते, तर जपामधे प्रेम आले असेल तर जपानंतर गोड पदार्थ देखील नकोसा होतो. याचा अर्थ असा की नामस्मरणामुळे मनातच पालट होतो असे नाही तर शरीरातही बदल होऊ लागतात. ते हळूहळू साधनास अनुकूल होऊ लागते. Spiritual health सुधारू लागते. आधी होणारा त्रास ही शरीर अनुकूल बनण्याची पूर्वतयारी असते. अर्थात जो तळमळीने या साधनाकडे वळलेला असेल त्याला साधन करतांना देहाचे बरेवाईट झाले तरी त्याची पर्वा नसते. त्याची तशी तयारीच झालेली असते.

ब्रह्मानंद महाराजांना खूप वेळ जप केल्यामुळे अतिसार होत असे. अण्णासाहेब घाणेकरांना पचनाचा त्रास व पुढे मूळव्याध झाली. त्यांनाही श्रीमहाराजांनी जप कमी करायला सांगितले. पहाऱ्याला जप करायलाही ते दोन तास न बसता सहा तास बसत असत. मंगळवेढ्याला सीतारामबुवा म्हणून एक सत्पुरुष होते. पंढरपूरला त्यांची पायरी आहे. या सीतारामबुवांना शिमग्यादिवशी काही टारगट लोकांनी फसवून दारू पाजली तर ती जशीच्या तशी शौचावाटे बाहेर पडली! हे शरीरशास्त्राच्या विरुद्ध आहे. पण साधनाच्या योगाने साधकाच्या शरीराच्या पेशींमधे बदल होऊ लागतो. 'ध्यानीं ध्याता पंढरीराया। मनेंसहित पालटे काया।' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. बरी आठवण झाली; नुकतेच बदलापूरहून एका गृहस्थांचे पत्र आले आहे. ते

म्हणतात की १९७४ साली सज्जनगडावर समर्थांचा अनुग्रह घेतला आणि तेव्हांपासून नियमित जप करतो आहे. त्यांनी त्यांची अडचण सांगितली आहे की जप करतांना त्यांचे भान नाहीसे होते. पाच मिनिटेच झालेली असतात पण बराच वेळ झालासे वाटते. भीती वाटते की मन शून्यात जाते काय? कारण त्यानंतर शरीराला जडपणा येतो.

**साधक क** : ते ध्यानात जात असतील तर असा जडपणा येता कामा नये. हा तमोगुणाचाच प्रभाव आहे.

**साधक ड** : शून्यात जाणे म्हणजे काय? ती विचारशून्य अवस्था असते काय? आणि ती वाईट का समजायची?

**पू. बाबा** : शून्यावस्था तशी वाईट नाही. पण जोपर्यंत आपले मन दृश्यात गुंतलेले असते तोपर्यंत या अवस्थेचा साधनाला उपयोग होत नाही. नामस्मरण करीत असतांना तुमचे भान गेले आणि नामस्मरण थांबले तर पुढे काय? प्रगती नाही. ध्यानामधे फक्त नाम राहाते. साधक क म्हणतात ते बरोबर आहे. हा वाढणारा तमोगुणच आहे. हा घालवण्यासाठी दोन मार्ग आहेत. एक म्हणजे ही शून्यस्थिती येते असे वाटले की गुरूंची मानसपूजा करावी किंवा दुसरे म्हणजे आपला मंत्र तेजोमय आहे आणि आपण तो पहात आहोत अशी कल्पना करून नामस्मरण करीत राहावे. यांपैकी जमेल ते कोणतेही एक आलंबन धरले तर शून्यात जायची भीती नाही.

नामसाधनाचा अभ्यास करतांना ह्या सर्व गोष्टींकडे आपण शास्त्रीय दृष्टिकोनातून संशोधकाच्या दृष्टीने पाहिले पाहिजे. आणि याला आत्मप्रचीतीसारखा दुसरा उत्तम मार्ग नाही. Underhill बाईने तिच्या Mysticism या पुस्तकात Physical effects of Mysticism सांगतांना साधनाच्या या परिणामांबद्दल सविस्तर लिहिले आहे. ती म्हणते की fatigue and lassitude यांमधूनच प्रत्येक साधकाला जावे लागते. या बाईचा गळ्यात माळ घातलेला एक फोटो श्रीमहाराजांना दाखवला तेव्हां ते म्हणाले, मोठी साधनी बाई दिसते! या गोष्टी आपल्या अनुभवाला आल्या पाहिजेत. नुसत्या शुक्रवारच्या चर्चांचा काय उपयोग? पाऊल पुढे पडले पाहिजे ना? स्वामी रामतीर्थांची त्यांच्यासारख्याच काही संन्याशांची एक सभा होती. तिचे नांव अद्वैतामृतवर्षिणी सभा. सर्व संन्यासी आठवडाभर ध्यान धारणा करीत आणि मग एक दिवस एकमेकांना आलेल्या अनुभवाबद्दल चर्चा करीत; तसे झाले पाहिजे.

साधन करू लागल्यानंतर होणाऱ्या शारीरिक बदलांना शास्त्रीय कारण आहे. साधनामुळे ॲड्रिनिलीन ग्लॅंडस्‌मधे स्राव सुरू होतो. तसेच एंडोक्रीन ग्लॅंडस्‌वरही परिणाम होतो. तेव्हां साधन इतके करावे की त्याचे काहीतरी शारीरिक परिणाम जाणवले पाहिजेत. काय अडचण आहे आता हे धाडस करायला? कोणाला कोणते परिणाम होतील हे तसे सांगता येणार नाही. पण ते ज्याचे त्यालाच पाहावे लागेल. उदाहरणार्थ, वै. सोनोपंत दांडेकरांच्या लिव्हरवर परिणाम झाला.

**साधक प :** होमिओपॅथीमधे पूर्वी दुसरी काही औषधे घेतलेली असली तर त्यांचे झालेले परिणाम नाहीसे करण्यासाठी 'थूजा' सारखी काही औषधे देतात. त्यामुळे प्रथम आजार वाढल्यासारखा वाटतो पण तो निचरा झाल्यानंतर दुसरे औषध लागू पडते. तसे, मला वाटते, साधनाच्या सुरुवातीला विकार प्रबळ होतात पण साधन चालू ठेवले की ते क्षीण होतात.

**साधक ग :** नामस्मरण सुरू झाले की विकारांना नोटीस मिळते असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे.

**साधक प :** विकार दबून राहण्यापेक्षा हे चांगले. कृष्णमूर्ती म्हणत की तुम्ही काही करू नका. ते सगळे सहज होऊ दे.

**साधक ग :** एरवी कठीण वाटणाऱ्या गोष्टी अभ्यासानेच सहज होतात म्हणून मुख्य म्हणजे अभ्यास पाहिजे.

**साधक प :** कृष्णमूर्ती म्हणतात की तुम्ही काही करू नका, नुसते पहात राहा. खरे म्हणजे त्यांनी शरणागतीच सांगितली आहे.

**साधक क :** श्रीमहाराजांनी ओल्या पंचासारखे पडून राहायला सांगितले आहे. ते किती जणांना शक्य आहे?

**पू. बाबा :** मन दृश्यापलीकडे जाऊ लागले की शरीर त्याला विरोध करते.

**साधक ग :** सूक्ष्मातून देह आला. साधनाने त्याला पुन्हा सूक्ष्माकडे नेण्याचा प्रयत्न होतो. हा संघर्ष त्यातून निर्माण होत असावा.

**पू. बाबा :** बरोबरच आहे. अव्यक्तातून जे व्यक्तात आले ते साधनाने व्यक्त शिल्लक राखून पुन्हा अव्यक्ताकडे नेण्याचा हा प्रयत्न आहे.

## |२८८| (२५ सप्टेंबर १९९२)

**पू. बाबा :** श्री. भागवत म्हणतात ते मला खरे वाटू लागले आहे. सध्या श्री. सत्प्रेम यांनी संकलित केलेल्या **Mother's Agenda** चा सातवा खण्ड वाचतो

आहे. भागवत म्हणतात तसा मदरचा आणि माझा काहीतरी संबंध असावा म्हणून ही पुस्तके माझ्याकडे आली आहेत. या लेखनाचे मला महत्त्व वाटायचे कारण म्हणजे श्रीमहाराजांनी जे सांगितले आहे त्याच्याशी त्यांचे सांगणे बरेच जुळते आणि काही अनुभवही मिळते जुळते आहेत. उदाहरणार्थ, काही लहान सहान काम करतांना देखील मदरच्या तोंडी 'ॐ नमो भगवते' असायचे. श्रीमहाराजांचे देखील 'जय जय श्रीराम' चालू असायचे. बसलेले उठून दुसरीकडे जायला निघाले तरी 'जानकीजीवन स्मरण जयजय राम' म्हणून उठत असत. मदरनी श्रीअरविंदांभोवती दिसणाऱ्या निळसर सोनेरी प्रकाशाचे वर्णन केले आहे. तसेच त्यांनी म्हटले आहे की लालबहादूर शास्त्री ताश्कंद करार करायला गेले तेव्हां त्या तेथे होत्या! रात्री शास्त्रींना जेव्हां हार्ट अ‍ॅटॅक आला तेव्हां पाँडिचरीला त्या खडबडून जाग्या झाल्या. वास्तविक रात्री शास्त्री मोठ्या प्रफुल्लित मनाने झोपायला गेले होते. त्या म्हणतात की त्या जाग्या झाल्या पण उशीर झाला होता.

श्रीअरविंदांच्या तत्त्वज्ञानावर एका गृहस्थांनी एक पुस्तक लिहिले होते. ते त्यांनी मदरना दाखवले तेव्हां त्यांनी विचारले की हे लिहितांना तुम्हाला अरविंदांचे काही अस्तित्व जाणवले का? ते म्हणाले की त्यांना तसे काही जाणवले नाही पण ते त्यांच्या विचारांनी भारलेले होते. यावर त्या म्हणाल्या की तुमचे लेखन चालू असतांना सर्व काळ ते तेथे तुमच्याजवळच होते. अरविंदांच्या तत्त्वज्ञानाचा जर विचार करू लागलो तर ते जवळपास असू शकतात, मग श्रीमहाराजांनी स्वत:च जेथे नाम आहे तेथे मी आहे असे सांगितलेले असूनही आपल्याला तसे का वाटत नाही?

**साधक प** : विचार करायची आपल्याला सवय आहे. दासबोधात मी आहे असे समर्थांनी सांगितले आहे. विचारांपेक्षा नाम अधिक सूक्ष्म आहे. नाम म्हणजे महाराज हे जाणवत नाही आणि महाराज आता देहाने नाहीत हेही मनात पक्के आहे; अशी काहीतरी विचित्र स्थिती आहे.

**पू. बाबा** : पण जेथे नाम आहे तेथे मी आहे हे त्यांचे आश्वासन आहे. आणि लोकांना तसा अनुभव येतो ना! मागच्या वेळी साधक ग नी सांगितले ते बरोबर आहे. जागेपणी तुम्ही अखंड नाम घ्या मग झोपेत आणि बेशुद्धीत नाम चालू ठेवण्याची जबाबदारी माझी असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. आपण आपली जबाबदारी विसरतो आणि तरीही ते आपल्याला जवळ करतात.

आजचीच गोष्ट सांगतो. संध्याकाळी चार वाजता एक जोडपे भेटायला आले होते. आता पालघरला असतात. बाई शिक्षिका होत्या. नुकत्याच त्या

रिटायर झाल्या. पूर्वी माधवबागेत कथा, कीर्तने ऐकायला जात असत. त्यांची ज्ञानेश्वरी ऐकायची इच्छा होती. एकदा स्वप्नात त्यांनी श्रीमहाराजांची कद नेसलेली मूर्ती पाहिली. त्यावेळी त्यांना हे गोंदवलेकर महाराज म्हणून माहीत नव्हते. त्यांनी विचारले, तुला ज्ञानेश्वरी ऐकायची आहे ना? बैस, मी सांगतो. ते स्वप्न तेथेच संपले. पुढे त्यांना कळले की मालाडला दर रविवारी ज्ञानेश्वरी सांगतात. पण आठवड्यात एक रविवार सुट्टीचा मिळायचा, तेव्हां सकाळी लवकर उठून कुठे मालाडला जातेस असे नवऱ्याने म्हटल्याने ते तेवढेच राहिले. दिराच्या एकसष्टीच्या निमित्ताने त्यांनी कविता केली होती ती त्या प्रसंगी त्या वाचायला लागल्या आणि त्यांच्या डोक्यातून असह्य कळा यायला लागून त्या बेशुद्ध झाल्या. त्या बेशुद्धीत त्यांच्या आतून कोणीतरी नाम घेत होते असे शुद्धीवर आल्यानंतर त्यांना जाणवले. पुढे तीन-चार वेळा बेशुद्धीत त्यांना हा अनुभव आला आणि मग निश्चय करून त्या मालाडला ज्ञानेश्वरी ऐकायला येऊ लागल्या. सुरुवातीला, गोंदवलेकर महाराज ज्ञानेश्वरी सांगतात अशी त्यांची समजूत होती पण येथे आल्यावर ते आता देहात नाहीत हे समजले. पहा! तसे फारसे साधन नसतांनाही कसा अनुभव आला. अशा घटनांपासून आपण बोध घेतला पाहिजे. आपले अंतकाळी नाम टिकेल कां? श्रीमहाराजांचे अस्तित्व आणि नामाची सत्यता वाटते पण तो भाव टिकून कां राहात नाही? मला वाटते, अंत:करण शुद्ध झाल्याखेरीज ते होणार नाही.

**साधक प** : नामाची सत्यता मेंदूत कोठेतरी आहे. ती हृदयात उतरलेली नाही. आज नामापेक्षा विचार जास्त खरे वाटतात म्हणून तेथूनच सुरुवात करावी.

**साधक क** : विवेक आणि तळमळ या दोन गोष्टींची आवश्यकता आहे.

**साधक प** : पैसा खरा वाटतो कारण त्याच्याशिवाय माझे अडते. तसे नामाशिवाय माझे काही अडते असे वाटत नाही आणि तसा अनुभवही नाही. त्यामुळे नाम सर्वस्व वाटत नाही.

**साधक म** : जगात विचार केवढी उलाढाल घडवून आणतात. तेव्हां श्रीमहाराजांची वचने आणि चरित्र यांचे चिंतन करून साधन करावे म्हणजे विचारांबरोबर नामही खरे वाटू लागेल.

**साधक क** : खरा प्रश्न तळमळीचा आहे. नामाची नड वाटली पाहिजे. ते विवेकानेच होईल. आज जे सुखाचे वाटते ते खरे नाही हे विवेकाने पटले की माणूस ज्यात खरे सुख आहे तिकडे वळेल. त्यासाठी विवेकाबरोबरच वैराग्यही

पाहिजे. गीतेमध्ये जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शन यासाठीच सांगितले आहे. म्हणून साधन समजून केले पाहिजे.

**|२८९|** (२ ऑक्टोबर १९९२)

पू. बाबांनी मदरच्या आणखी काही गोष्टी सांगितल्या आणि ते म्हणाले, श्रीमहाराजांच्या सांगण्याशी या गोष्टी जुळतात म्हणून मी सांगतो. पूर्वी ज्ञानेश्वरी, नाथभागवत, तुकारामांची गाथा वगैरे मी वाचत असे. श्रीमहाराजांना म्हणालो की या संतांचे अनुभव जर आपल्या (म्हणजे श्रीमहाराजांच्या) सांगण्याशी जुळत असले तरच ते मी मानीन. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, असं कां म्हणता? ही मोठी माणसं. माझ्या अगोदर झालेली. त्यांचं सांगणं मानलं पाहिजे. मदरचे सांगणे श्रीमहाराजांच्या आणि इतर संतांच्या सांगण्याशी जुळते म्हणून मला ते पटते.

श्रीअरविंद जेव्हां लेख, कविता वगैरे लिखाण करीत तेव्हां ते पूर्णपणे silent mind अशा अवस्थेत होत असे. आर्य नांवाच्या मासिकात लिहायला लागल्यापासून जवळ जवळ पाच वर्षे तरी त्यांनी असे लेखन केले.

एकदा मदर चिंतनातून जाग्या झाल्यावर कोणीतरी त्यांना विचारले की आपण झोपला होतात का? नाही, मी Japa walk घ्यायला गेले होते असे त्यांनी सांगितले.

सर्व विश्व स्पंदनांनी (vibration) बनलेले आहे. अगदी दूर असलेले तारे म्हटले तरी तेथेही स्पंदनेच असणार. प्रत्यक्षात त्यांचे प्रकट स्वरूप वेगवेगळे असू शकते. त्याचप्रमाणे सर्व माणसे मिळून मानवी स्पंदने human vibrations आहेत. कोणत्याही अवस्थेत आपण त्यांच्या बाहेर पडू शकत नाही.

मदर म्हणतात, माणसाने भाषा का बरे शोधून काढली? ह्या भाषेत अनुभव नीट सांगता येत नाहीत आणि विपरीत अर्थ मात्र निर्माण होतो.

आपल्याला हे अनुभव यायला आपण काय करायला पाहिजे?

**साधक प** : नाम घेतांना वेगवेगळ्या वृत्ती उठत असतात. नामानेच असे करता यावे की इतर वृत्ती जाऊन नाम घ्यावे ही एकच वृत्ती राहील.

**साधक ब** : काही वेळा आळस येतो. त्यामुळे नाम मंदावते किंवा थांबते. फक्त नामाचीच वृत्ती राहिली तर आपण त्यात रंगून जाऊ.

**साधक ज** : आपल्या वृत्तींचा उगम बेंबीपाशी असतो म्हणून मी नाम बेंबीपाशी किंवा हृदयात चालू ठेवण्याचा प्रयत्न करतो. त्यामुळे इतर वृत्ती

उठत नाहीत आणि नाम चालू राहाते. या प्रक्रियेला वेळ किंवा कंटाळा आड येत नाही पण नित्याच्या व्यवहारामुळे उठावे लागते.

**साधक प** : यावेळी देहाचा विसर पडतो कां? आणि डोक्यात काय काय विचार चालतात?

**साधक ज** : नाम बेंबीपाशी किंवा इतर कोणत्याही चक्रापाशी चालू ठेवता येते. मी ते डोक्यात घेत नाही. नामस्मरण करत असतांना देहाचा पूर्ण विसर पडत नाही. आपल्या देहाला व्यापून सूक्ष्म देह असतो म्हणून नाम आपल्या जड देहाला व्यापून पण त्याच्याबाहेर आहे असा प्रयत्न केला. त्याने देह हलका झाला आहे असे वाटू लागले.

**पू. बाबा** : किती वेगवेगळ्या तऱ्हेने साधन करता येते पहा! नाम इतके वाढवावे की सर्व मर्यादा ओलांडून अनंत व्हावे. श्रीमहाराज एकदा म्हणाले की व्यापक होऊन विश्व व्यापून टाकावे. नंतर लगेच म्हणाले की, 'पण जर भगवंताचे अधिष्ठान असले तरच ते होईल.' नामाची धार धरावी. अखंड नाम घ्यावे. पंधरा मिनिटे तरी हे जमवावे. त्याचा फायदा होईल.

## |२९०| (९ ऑक्टोबर १९९२)

पू. बाबांनी जे. कृष्णमूर्तींच्या Notebook मधील काही भाग वाचून दाखविला. कृष्णमूर्ती म्हणतात की कर्मातून आत्मज्ञान होणार नाही. तथापि कर्मामुळेच आत्मज्ञानाला योग्य अशी भूमिका तयार होईल. कर्माच्या बाबतीत त्यांनी immense activity असा शब्दप्रयोग केला आहे. पू. बाबा म्हणाले, शंकराचार्यांनी विवेकचूडामणीत हेच सांगितले आहे. ते म्हणतात :

चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये।
वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित् कर्मकोटिभि:॥ ११॥

कृष्णमूर्ती immense activity म्हणतात, शंकराचार्य कर्मकोटिभि: म्हणतात; अर्थ एकच, तथापि कृष्णमूर्ती फार मोठे यात संशयच नाही; कारण कोणालाही गुरु न करता खरोखरच केवळ विचाराने त्यांनी आत्मज्ञान करून घेतले.

मागच्या शुक्रवारी मी तुम्हांला पॉंडिचरीच्या मदरबद्दल सांगितलेच होते. श्रीमहाराजांच्या सांगण्यात आणि तिच्या सांगण्यात साम्य असल्यामुळेच बहुधा ही पुस्तके चाळण्याचा योग आला असावा. Agenda च्या बाराव्या खंडात ती काय म्हणते ते वाचून दाखवतो; ऐका :

"All circumstances have been furiously teaching the body to call all the time - to call the Divine. And so now it has got into the habit of repeating its mantra - and it repeats it all the time - it is a curious thing. If is repeats it, everything runs smoothly. When it thinks of nothing, but the Divine everything is fine."

- Mother's Agenda Vol. XII p.158.

(आपल्या सभोवारची परिस्थिती आग्रहाने शरीराला सर्वकाळ नामस्मरण करायला शिकवते आहे. त्यामुळे आता त्याला मंत्रजप करावयाची सवय लागली आहे. ते आता सर्वकाळ जप करते. हे मोठे आश्चर्यकारक आहे. ते जेव्हां नामस्मरण करते तेव्हां सर्व काही सुरळीत चालते. ते जेव्हां परमात्म्याखेरीज दुसऱ्या कशाचाही विचार - चिंतन करीत नाही तेव्हां सर्व काही उत्तम असते.)

केवढा श्रेष्ठ अनुभव आहे पहा! नामस्मरण नुसते मनालाच व्यापते असे नसून सगळ्या शरीराचीही ती गरज होते. नामस्मरणात मन आणि शरीर रंगून गेले की कसली दुःखे राहात नाहीत कारण तो देहभानावरच नसतो. मग ती म्हणते त्याप्रमाणे everything runs smoothly. यानंतर तिने पुढे चार पायऱ्या सांगितल्या आहेत त्या तर फारच छान आहेत. त्यातली एक जरी जमली तरी साधक कितीतरी पुढे जाईल. साधन कसे होत जावे हे सांगतांना ती म्हणते

1) To exist only for the Divine - केवळ परमात्मा भेटावा म्हणून जगणे.

2) To exist only by the Divine - केवळ परमात्म्यामुळे जगणे.

3) To exist only to serve the Divine - परमात्म्याची सेवा करावयासाठी जागणे.

4) To exist only by becoming Divine - परमात्मस्वरूप होऊन राहाणे.

- Mother's Agendas Vol. XII p.162

यापैकी आपल्याला काहीतरी साधले आहे कां?

**साधक क** : आपण म्हणालात तशी ह्या जन्मी एखादी पायरी चढता आली तरी खूप आहे.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता ते ठीक आहे; पण आपले का जमत नाही? कोणीच काही बोलेना म्हणून पू. बाबांनी प्रत्येकाला त्याचे नांव घेऊन अडचण काय येते ते विचारले.

**साधक प** : पुष्कळ नाम घ्यावे असे वाटते पण प्रत्यक्षात ते होत नाही.

**पू. बाबा** : होय, पण अडचण काय आहे?

**साधक प** : काही वेळा नाम चांगले होते. उदाहरणार्थ, गोंदवल्याला शिबिरात किंवा इतर वेळी ते चांगले होते. शक्तिसंचय होतो, पण परत इकडे आलो की ती सगळी शक्ती नकळत आपण व्यवहारात वापरतो.

**पू. बाबा** : आपण जे अन्न खातो ते पवित्र असणे आवश्यक आहे. कारण अन्नाप्रमाणे वासना बनतात. प्रत्येक वेळी पवित्र अन्न मिळेलच असे नाही पण श्रीमहाराज म्हणत की भगवंताच्या नामात जे अन्न खातो ते पवित्रच होते. पण इतके कुठे आपले नाम टिकते?

**साधक ग** : तुकाराम महाराजांनीही म्हटले आहे, 'पवित्र तें अन्न। हरिचिंतनीं भोजन॥'

**साधक ब** : नामस्मरण करावेसे वाटते. काही वेळ ते चांगले होतेही, पण दुपारी, विशेषत: जेवण झाल्यावर, नाम होत नाही. आळस येतो, dulness (सुस्ती) राहातो. अन्नाचा परिणाम नक्कीच होतो.

**पू. बाबा** : होय, पण आपण काही बाहेरचे खात नाही. आणि नामाला इतकी उपाधि लावून कसे चालेल? काय केले म्हणजे नामस्मरण चांगले होईल?

**साधक ड** : मला वाटते, प्रार्थना करणे येवढेच आपल्या हातात आहे.

**पू. बाबा** : पण ती तरी अंत:करणापासून कोठे होते?

**साधक ब** : नाही होत ना! तीही कवाईत होते. (साधक ड ना) मलाही तुमच्यासारखे प्रार्थनेने हे होईल असे वाटत होते. पण खरी प्रार्थना होतच नाही.

**साधक ग** : मी शरण आहे हे देखील शब्दच होतात.

**साधक प** : शरण जाणे हे काहीतरी वेगळेच आहे. मी शरण जातो ह्या म्हणण्यातला विरोधाभास जरी मनात ठसला तरी खरी शरणागती होईल. नामामुळे सर्व काही व्यवस्थित होते ही मदरची खात्री होती. ती म्हणते की its a curious thing!

**पू. बाबा** : बरोबर आहे तुम्ही म्हणता ते. शरीर साधनमय होऊन जाते. Mind of the cells मधे तिने म्हटलेच आहे.

**साधक ग :** लेले महाराजांच्या (श्रीअरविंदांचे गुरु) चरित्रात त्यांनी म्हटले आहे की आत्मज्ञान झाल्यावर शरीरातील प्रत्येक पेशी मुक्त होते. पेशींबद्दलचे ज्ञान त्या परंपरेतच दिसते.

**साधक प :** दृश्याबद्दलची ओढ कमी झाल्याखेरीज साधन चांगले होणार नाही आणि याच्या आड दुसरे कोणी येते आहे असेही नाही.

**पू. बाबा :** संतांनी नामरस म्हटले आहे पण आपल्याला कुठे त्याचा अनुभव आहे? खरोखर नाम कोणतीही उपाधी लावून घेत नाही ही अडचण आहे.

**साधक क :** त्याबद्दल खरी निकड वाटत नाही. करू, होईल, असे वाटते.

**पू. बाबा :** पण हे केव्हां तरी थांबे पाहिजे ना? It is high time! मला वाटते, आपण एका वेळी दोन किंवा जास्त गोष्टी करू शकतो. एखाद्या गोष्टीवर विचार चालू असतो आणि त्याच वेळी दुसरे काही काम करत असतो. तसे काहीही करत असतांना एकसारखे नाम टिकवण्याचा अभ्यास केला पाहिजे. अर्थात हे थोडे अवघड आहे कारण व्यवहारात एकाच वेळी अनेक गोष्टी करतांना आपण बहिर्मुख असतो आणि नाम घेतांना आत वळावे लागते. पण हे केले पाहिजे. नाहीतर कसे होणार?

**साधक ग :** दृश्यातल्या गोष्टींबरोबर सूक्ष्मातले नाम टिकवायचे आहे. त्याची आम्हांला सवय नाही.

**पू. बाबा :** होय, पण तसाही आपल्याला अनुभव आहे. काळजी किंवा भीती निर्माण झाली असली तर जेवतांना काही काळजी टिकवायचा प्रयत्न करावा लागत नाही.

**साधक क :** पण ती काळजी देखील दृश्याला धरून असते.

**पू. बाबा :** पण हा प्रयत्न नको का करायला? नाहीतर दुसरा काय मार्ग आहे सांगा. या चर्चेचा नाहीतर काय उपयोग? दारूवाला नांवाची गायनेकॉलॉजिस्ट डॉक्टर होती. डॉ. पाथरकरांची शिष्या. तिने लग्न केले नव्हते. हजारो बाळंतपणे केली तरी अनुभव शून्य. तसे या चर्चेचे नाही कां?

**साधक ब :** चर्चा करतांना आपण ताबडतोब conceptualise करतो (केवळ संकल्पना करतो). त्या अनुभवामागे जात नाही.

**पू. बाबा :** होय, पण हे थांबवले पाहिजे. श्री. भाऊसाहेबांसारखे श्रीमहाराजांनी सांगितले म्हणून नाम घेतो, बाकी मला काही माहीत नाही असे आपले होत नाही. नामापासून आपल्याला नेमके काय पाहिजे असे वाटते?

**साधक ग** : खरे समाधान म्हणजे काय हे आम्हांला माहीत नाही. तथापि ते समाधान मिळावेसे वाटते.

**साधक प** : साधनात सगुणोपासनेला महत्त्व आहे. त्यामुळे मन इतर गोष्टींमधून बाहेर निघते.

**साधक क** : बाकीचे सगळे अपूर्ण आहे. नामाने पूर्णता येईल असे वाटते.

**पू. बाबा** : तर आज ठरले की हे समाधान किंवा ही पूर्णता यावी म्हणून बाकीचे सर्व व्यवहार करतांना देखील मिळेल तितका वेळ नाम घ्यायचे. असे केले तरच या चर्चेचा काही उपयोग झाला असे म्हणता येईल.

**|२९१|** (१६ ऑक्टोबर १९९२)

आम्ही पू. बाबांकडे गेलो तेव्हां ते प्रसन्न दिसत होते. ते म्हणाले; आज मला खूप आनंद झाला आहे. मदरचे हे ग्रंथ Agenda वाचतांना मला एकसारखे तिला नामाबद्दल काय म्हणायचे आहे असे वाटत होते; ते पुष्कळच मिळाले. ह्या बाईबद्दल मला विशेष माहिती नव्हती. तिचे श्रेष्ठ अनुभव वाचून मला तिच्याविषयी आदर वाटू लागला आहे. परदेशात - पॅरिसमधे जन्मलेली बाई (Mirra Alfasse) पण भारतात येऊन किती निष्ठेने तिने साधना केली. १९१४ मधे (२९ मार्च) ती प्रथम श्रीअरविंदांना भेटली. त्यानंतर आणखी काही भेटी झाल्यावर तिने लिहिले आहे -

"It seems to me that I am being born into a new life and that all the methods and habits of the past can no longer be of any use. It seems to me that what was once a result is now only a preparation, --- An immense gratitude rises from my heart. I seem to have at last arrived at the threshold which I have so long sought. (Prayers and Meditations pp-90-91) (मला वाटते की माझा नव्या जीवनात पुनर्जन्म होतो आहे आणि त्यात पूर्वीच्या पद्धती आणि सवयी उपयोगाच्या नाहीत. मला वाटते की एके काळी जो निष्कर्ष वाटत होता ती केवळ पूर्वतयारी होती. माझ्या हृदयातून असीम कृतज्ञता ओसंडते आहे. दीर्घकाळ मी ज्याच्या शोधात होते त्याच्या अगदी उंबरठ्यावर पोचले आहे असे मला वाटते.)

मला एकदा श्रीमहाराजांनी माझ्यासाठी किती केले, त्यांचे माझ्यावर केवढे उपकार झाले असे वाटून आतून अगदी भरून आले होते. वास्तविक मी

दादरच्या हिंदू कॉलनीतून दादर पश्चिम भागात राहायला जाण्यासाठी एक जागा पाहिली होती. तीस रुपये भाडेही ठरले होते. पण श्रीमहाराजांनी हे मला पसंत नाही; तुम्ही येथे मालाडला राहायला या असे आमच्या मंडळींना (ती. सौ. आईंना) सांगून इकडे यायला लावले अणि केवढा सत्संग मिळाला! श्रीमहाराजांना म्हणालो, आपण माझ्यासाठी किती केलेत. आपल्यासाठी काहीतरी करावेसे वाटते. यावर श्रीमहाराज म्हणाले, माझ्यासाठी कशाला? स्वत:साठी करावे म्हणजे ते मला पोचते. मदरचे काही अनुभवही या प्रकारचेच आहेत.

सत्प्रेम मदरना एकदा म्हणाले की I was trying to force the Name into Physical Mind. यावेळी मदर सुमारे ९४-९५ वर्षांच्या होत्या. (जन्म २१ फेब्रुवारी १८७८ देहावसान १७ नोव्हेंबर १९७३). सत्प्रेम यांचे हे म्हणणे ऐकून त्यांनी 'ॐ नमो भगवते।' हा मंत्र तेरा वेळा म्हटला. (श्रीअरविंदांनी त्यांना येवढाच मंत्र दिला होता). मंत्र म्हणतांना त्यांचा आवाज आत जात जात त्या गाढ समाधीत गेल्या. भानावर आल्यावर त्यांनी किती वाजले म्हणून विचारले तेव्हां अर्धा तास झाला होता. या प्रसंगाची सत्प्रेम यांनी मांडणी कशी केली आहे पहा. (पू. बाबांनी पुस्तकातील तो भाग प्रथम पहावयास दिला व नंतर वाचून दाखवला.

May 5, 1973.

(मदरनी सत्प्रेमना विचारले, (Would you like to... (meditate). Or do you have something to say ?

Satprem - I am endeavouring to force the Mantra into the Physical Mind.

(Mother starts repeating the Mantra - thirteen times - her voice is nothing but a halting breath, like a childs whimper)

(then she sinks into a deep contemplation for half an hour) what is the time ?

Ten Past eleven, Mother.

(- Mother's Agenda Vol. XII p.411)

'जे जे कांहीं करिसी तें माझें स्वहित। हें तो सप्रचीत कळों आलें॥' असे तुकाराम महाराज म्हणतात. मदरही म्हणतात की तुमच्या जीवनात ज्या अडचणी येतात त्या तो (परमेश्वर) तुमच्या हितासाठीच धाडत असतो.

कामात येणाऱ्या अडथळ्यांच्या संदर्भात त्या म्हणतात की 'Difficulties are ALWAYS graces.'

**साधक क :** श्रीमहाराजांनी म्हटले आहे की तुमची तयारी व्हावी म्हणून मी अडचणी पाठवतो आणि मलाच तुम्ही त्या दूर करायला सांगता. अशाने तुम्ही तयार केव्हां होणार?

**पू. बाबा :** जे जे काही घडते त्या सर्वात तूच आहेस असे मदरनी ठासून त्रिवार म्हटले आहे. नाम घेता घेता त्यांची समाधी लागली. त्या काळाच्या पलीकडे गेल्या. ९४ वर्षांचे वय, जर्जर शरीर, आहार जवळ जवळ नाहीच असे असूनही एका प्रसंगात संपूर्ण रात्र त्यांनी नामस्मरण केले.

आता श्रीअरविंदांच्या एका पत्रातील हा भाग पहा :

'None of us is here to 'do as we like' or to create a world in which we shall at last be able to do as we like; we are here to do what the Divine wills and to create a world in which the Divine will can manifest its truth no Longer deformed by human ignorance or perverted and mistranslated by vital desire."

- Mother's Agenda Vol. XII P.15)

यालाच श्रीमहाराज रामाची इच्छा म्हणतात. साधकाचे जीवन हे त्याचे व्यक्तिगत राहातच नाही. तो भगवंताच्या हातातले खेळणे होतो. श्री. भाऊसाहेब असे जगले. त्या दृष्टीने सगुणाचे महत्त्व फार आहे.

वयाच्या ९४व्या वर्षी संपूर्ण रात्र नामस्मरण! मला थोडा अनुभव आहे म्हणून सांगतो, शरीर थकते. श्री. हणमंतराव लकुंडींचीही (कुलकर्णी) अशीच हकिगत आहे. अखंड नामस्मरण म्हणजे काय आणि ते शक्य आहे कां असा प्रश्न निघाला असतांना त्यांनी मच्छरदाणीत बसून पहाटे पाचपर्यंत नामस्मरण करून दाखवले. बाजूला बसलेले थकले पण ते ताजेतवाने होते.

**साधक ग :** मला वाटते, तुम्ही पूर्वी सांगितले होते त्याप्रमाणे आमचे नामस्मरण मेंदूतून चालते आणि तसे ते चालते तोपर्यंत थकवा आहे. नाम एकदा हृदयात उतरले की त्याचा शरीराशी तसा संबंध राहात नसावा.

**पू. बाबा :** होय, नंतर नामाचा देहाशी संबंध राहात नाही. पण तेथपर्यंत आधी जाता आले पाहिजे. (साधक ड ना) तुम्ही सांगा हे कसे करावे?

**साधक ड** : जिथे नाम आहे तिथे मी आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. तेव्हां आपण शक्य तितके नाम घेत राहावे. त्याची क्वालिटी वगैरे विचार करू नये.

**साधक ग** : शक्य तितके नाम घेत राहाणे हाच मार्ग आहे.

**साधक प** : नुसते नाम घेत राहाणे अवघड आहे. आपल्याला उपाधीशिवाय नाम घेता येत नाही.

**पू. बाबा** : उपाधीच घ्यायची तर ती सगुणाची घ्यावी. मदरच्या नामस्मरणाबद्दल आपण पाहिले. आता सगुणोपासनेबद्दल ती काय म्हणते पहा :

October 19, 1966.

"All those who do the Puja sincerely (Sincerely, of course, not mechanically but with devotion) always attract an emanation. or a representation, a representative form which is present at the Puja and responds; it responds to the Puja. Every family that worships Kali, for instance, has its own Kali."

- Mother's Agenda Vol. VII P.235.

सगुणाचे महत्त्व फार आहे. ज्या देवतेची तुम्ही पूजा करता त्या देवतेला पूजा घेण्याची सवय लागते. काही म्हणा! श्रीमहाराजांच्या सांगण्यात आणि मदरच्या सांगण्यात आढळणारे, विशेषत: तिचे नामाचे प्रेम पाहून आज मला फार आनंद झाला. आता आपण हे केले पाहिजे. मागच्या शुक्रवारी म्हटल्याप्रमाणे, मी हरलो, आता याच्यापेक्षा जास्त माझ्याने होत नाही, अशा मर्यादेपर्यंत आपण पोचले पाहिजे. ते उचलून घ्यायला तयारच आहेत.

## |२९२| (२३ ऑक्टोबर १९९२)

**पू. बाबा** : (हातातील पुस्तक दाखवून) शर्ली मॅक्लीन या अमेरिकन नटीने लिहिलेले Going within नांवाचे हे पुस्तक आहे. ही नटी ॐकाराचा जप करते आणि आहारादी नियमांचे पालन करते. ती म्हणते की ॐकाराचा मोठ्याने केलेला जप हा एखाद्या सिनेगॉग (ज्यू लोकांचे प्रार्थनास्थळ) किंवा चर्चमधे केल्या जाणाऱ्या chanting सारखा होतो. त्यामुळे तुम्ही आत जाता आणि त्या जपाचा resonance तुम्हांला आत्मस्वरूपापर्यंत घेऊन जातो आणि व्यवहारातल्या आणि अध्यात्मातल्या अडचणी सोडवण्यास योग्य ते

मार्गदर्शन होते. इतरांबद्दल तुम्हांला वाटणारे द्वेष, तिरस्कार, असूया इत्यादी विकार नाहीसे होतात.

**साधक ज :** Resonance (नाद किंवा अनुस्पंदन) म्हणतांना तिला विशेष काही म्हणायचे आहे असे वाटते. आपल्या Vocal cords ची (ध्वनितंतूंची) एक frequency (कंपन संख्या) असते. त्या frequency शी जपाची frequency जमली की प्रचंड शक्ती निर्माण होऊन तुम्हांला सहज आत जाता येत असावे. resonance चे उत्तम उदाहरण विशिष्ट formation (रचना) मध्ये संचलन करणारी सैनिकांची तुकडी पुलावरून जाऊ लागली तर त्यांच्या पदाघातांच्या frequency मुळे पुलावर जी आंदोलने निर्माण होतात त्यामुळे पूल कोसळू शकतो. म्हणून पुलावरून सैनिकांना formation मध्ये न नेता विस्कळीतपणे नेतात.

**पू. बाबा :** त्या बाईला (शर्ली मॅक्लीन) नामाचे खरेपण इतके जाणवले. आपल्याला ते का जाणवत नाही? श्रीमहाराज म्हणाले की मला नामात पहा. आपण त्यांच्या तसबिरीसमोर उभे राहातो तेव्हां महाराज थोडे तरी खरे वाटतात पण नामात त्यांना पाहणे ही त्याच्या पुढची पायरी आहे. ह्या बाईला जीवनातले प्रश्न सोडवतांना कोणता पर्याय स्वीकारावा ते ॐकार सांगतो. श्रीमहाराजही एकदा म्हणाले होते की तुमची अडचण तुम्ही नामाला सांगितली तर नाम योग्य वाट दाखवील. असे असतांना आपल्याला नाम खरे वाटत नाही.

**साधक प :** ही विचाराने ठरणारी गोष्ट नाही. तुमच्याशी बोलतांना तुम्ही खरे वाटता कारण मी काही म्हटले तर त्याला तुमच्याकडून रेस्पॉन्स (प्रतिसाद) येतो. नामाच्या बाबतीत तसे घडत नाही. तसेच देहातून गेलेले असले तरी महाराज आहेत; ते नामात आहेत; नामात त्यांचे अस्तित्व आहे इत्यादी सारे आपणच ठरवावयाचे. पण असे ठरवले तरी प्रतिसाद येत नाही ना!

**साधक ब :** हा रेस्पॉन्सचा मुद्दा बरोबर आहे. अंधारात माणूस दिसला नाही तरी त्याचा आवाज ऐकू आला की तो आहे याची खात्री पटते तसा निदान त्यांचा आवाज यावा. काही वेळा तो ऐकू येतो पण मग तो भाव टिकत नाही.

**साधक प :** खरेपण प्रेमात आहे. नामाचे प्रेम आले की नाम खरे आहेच आणि ते खरे आहे असे वाटल्याखेरीज त्याचे प्रेम येणार नाही असे काहीतरी विचित्र आहे.

**साधक क :** माणसाला आधार हवा असतो आणि जे खरे वाटते त्यातच तो आधार शोधतो. हातातून निसटत असतांनाही संसार खरा वाटतो.

**साधक प** : नाम खूप घ्यावे असे वाटते पण शक्ती कमी पडते आणि शक्तिपातही होतो. नामाचे प्रेम आले की हे होणार नाही.

**साधक ग** : एकूण आपण पुन्हा तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे प्रेमखुणेपाशी येतो. तिकडून प्रेमखूण हवी

**साधक प** : मी केवळ भगवंताकरता जगतो आहे. ते परमोच्च ध्येय आहे असे वाटल्याखेरीज ते होणार नाही. नाम थांबले की अस्वस्थ वाटले पाहिजे. नामात शांतीचा अनुभव टिकला पाहिजे.

**साधक ग** : त्यासाठी मी विरघळला पाहिजे.

**पू. बाबा** : श्रीमहाराज एकदा म्हणाले, अहंकार - देहबुद्धी त्रास देते ना? आपली बुद्धी आणि मन भगवंताच्या पायी वहावी. मग अहंकार आपोआप नाहीसा होईल.

**|२९३|** (३१-१०-९२ ते ८-११-९२ हेबळळी.)

दि. ३१ ला दुपारी एक वाजण्याच्या सुमारास धारवाड रेल्वे स्टेशनवर पोचलो. गाडीतून उतरतांना पू. बाबांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचा भाव अनावर होऊन (अर्थात हे कारण त्यांनी नंतर सांगितले) ते खाली पडू लागले. श्री. रत्नाभ व इतर काहीजणांनी त्यांना सावरले. पू. बाबा नंतर म्हणाले, प्लॅटफॉर्मवर पडू लागलो तेव्हां मनात विचार आला की हा असा पडला तर हेबळ्ळीत निरूपणे कशी होणार?

संध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो. ते म्हणाले की आपले valuation होत नाही. नामस्मरणाने सूक्ष्म देहाचे structure बदलले पाहिजे. यासाठी स्वत:शी कठोर होऊन तडजोडी थांबवल्या पाहिजेत. तडजोडी करू लागलो की कोठे थांबायचे ते कळेनासे होते.

रोज संध्याकाळी पू. बाबांशी चर्चा होई. या चर्चेत साधक ब यांनी एक महत्त्वाचा मुद्दा मांडला. ते म्हणाले की श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव राहायला पाहिजे असेल तर त्यासाठी आपली जाणीव त्या पातळीवर गेली पाहिजे. श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव सतत राहिली पाहिजे यावर सर्व चर्चेत पू. बाबांनी भर दिला.

शनिवार दि. ७ रोजी सकाळी साडेनऊच्या सुमारास पू. बाबांबरोबर गाभाऱ्यात श्रीमहाराजांच्या पादुकांच्या पूजेसाठी गेलो होतो. पूजेला बसून

आचमन केल्यावर पू. बाबांची तंद्री लागली. सुमारे तीन मिनिटांनी ते भानावर आले. तरीही नंतर काही वेळ त्यांना पूजेच्या उपचारांचे पूर्ण भान नव्हते.

शनिवारी दुपारी सर्वजण मुंबईला परतण्यासाठी धारवाड स्टेशनवर आलो. गाडीत चढल्यावर पू. बाबांनी आमच्यापैकी एका साधकास विचारले की गाडीत चढतांना नामस्मरण चालू होते का? ते म्हणाले की स्टेशनवर गाडी येण्यापूर्वी चालू होते आणि डब्यात बसल्यावर चालू झाले. गाडी स्टेशनात आल्यावर मागे पुढे धावपळ करावी लागली, सगळे सामान चढवावे लागले आणि त्या धांदलीत नाम राहिले नाही. पू. बाबा म्हणाले की अशा प्रकारचे excitement (खळबळ) किंवा panic (धसका) असेल तेव्हांही नाम राहील असा अभ्यास केला पाहिजे कारण मरण येईल तेव्हां काय स्थिती असेल कोणी सांगावे? देह सुटत असतांना एक प्रकारे panic च असते. अशा वेळी नाम टिकायला पाहिजे असेल तर आत्तापासून त्याचा अभ्यासच केला पाहिजे.

## |२९४| (१३ नोव्हेंबर १९९२)

आज सकाळपासूनच पू. बाबांच्या अंगात थोडा ताप आहे. त्यामुळे त्यांनी कान व डोक्यावरून रुमाल बांधला आहे. ताप असला तरी त्यांची मुद्रा आनंदी आहे. ती. सौ. आईंचे सायटिकाचे दुखणे गेला महिना-दीड महिना चालूच आहे. हेबळ्ळीच्या मुक्कामात एकसारखी जिन्यावरून करावी लागलेली चढउतार आणि प्रवास यांमुळे त्रास थोडा वाढला आहे त्यामुळे आज नेहमीसारख्या खाली न बसता त्या वर बसल्या आहेत.

**पू. बाबा** : आजारातही नाम टिकले पाहिजे. आजार ही अभ्यासाची संधी मानावी. तुम्हांला स्वामी रामदासांच्या The Pathless Path या पुस्तकातील नामासंबंधीचा काही भाग वाचून दाखवतो :

The Divine Name as the Ladder. "Take the Name as BRAHMAN Himself and using it as a ladder ascend the summit the supreme Godhead with whom you are eternally one."

"The Divine Name is a powerful boat that takes the man across the whirlpools of life to the haven of his eternal and spiritual nature. His Name transforms man from the human to the Divine - The Divine Name is the one sovereign Panacea for all physical, mental and intellectual ills that have create the

sense of diversity and misery in the world... To be in tune with the Name is to be in tune with the Infinite truth, and thus to transmute the lower, stumbling and ignorant human nature, into the glorious self - illuminated nature."

"The Divine Name purifies the mind of its ego and desires, and floods the whole being with light and joy."

"Repeat the Name so constantly that its enthralling music should thrill, illumine, elevate and sweeten your entire life... The Name arrests distracting thoughts subdues unregulated desires and enlightens the intellect. After enabling its devotee to achieve through concentration of mind, it helps to draw the mind inward and attain complete absorption in the Eternal Reality, which in its turn takes him to the supreme goal of self - surrender... It grants you the loftiest vision and experiecne."

"Fixing the mind on the sound of His Name is the easiest way for concentration. Take it that the sound of the Name is itself a symbol of God."

"Oh ! the charm of the Name ! It brings light where there is darkness, happiness where there is misery, contentnent where there is dissatisfaction, bliss where there is pain, order where there is chaos, life where there is death, heaven where there is hell, God where there is Maya. He who takes refuge in that glorious Name Knows no pain, no sorrow, no care, no misery. He lives in perfect peace."

"In all weathers cling to the Name of the Lord. It is the one plank which does not allow the man, who hangs on to it, to sink and be lost. The Name is the Lord, Guru and all in all."

- The Pathless Path PP 12, 13.

("दिव्य नामाची शिडी"

"नाम हे साक्षात ब्रह्म आहे. त्याची शिडी करा आणि ज्या ब्रह्माशी तुम्ही सदैव एक आहात अशा शिखरावर चढा."

"लौकिक जीवनाच्या भोवऱ्यातून पलीकडे नेऊन आध्यात्मिक जीवनाच्या शाश्वत बंदराला नेणारी नाम ही शक्तिशाली नौका आहे. भगवंताचे नाम माणसाला मानवतेमधून दिव्यत्वाकडे नेते. ज्या शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक दु:खांमुळे जगात भेदात्मकता आणि दैन्य निर्माण झाले आहे त्यावर नाम हे अमृतासारखा एकमेव उपाय आहे. नामाशी समरस होणे म्हणजे अनंताशी समरस होणे आहे आणि अशा प्रकारे क्षुद्र ठेचाळणाऱ्या अज्ञानी मानवी स्वभावाचे वैभवशाली प्रकाशमय स्वभावात परिवर्तन करणे आहे."

"भगवंताचे दिव्य नाम अहंकार आणि वासनांचा क्षय करून मन पवित्र करते आणि त्यामुळे जीवनात प्रकाश आणि आनंदाचा पूर येतो. नाम असे अखंडपणे घ्यावे की त्या मोहक संगीताने अंगावर रोमांच फुलावे. नामामुळे आपले सर्व जीवन प्रकाशमय, उन्नत, मधुर आणि सौहार्दपूर्ण व्हावे.... नाम चित्ताला विचलित करणारे विचार थांबवते, अनावर वासना शमवते. नामाने बुद्धीत प्रकाश होतो. आपल्या भक्ताला चित्त एकाग्र करण्यास मदत करून नाम त्याचे मन अंतर्मुख करते. त्याला शाश्वत सत्याकडे वळवून नाम त्याला शरणागतीच्या सर्वोच्च पायरीवर नेते. ते साधकाला भगवंताच्या दर्शनाचा भव्य व सर्वोच्च अनुभव देते."

"भगवंताच्या नामाच्या ध्वनीवर लक्ष केंद्रित करणे हा मन एकाग्र करण्याचा सर्वात सोपा मार्ग आहे. नामाचा ध्वनी हे भगवंताचे चिन्ह आहे याची खात्री असू द्या."

"अहाहा! या नामाची कशी जादू आहे! जेथे अंधकार असेल तेथे ते प्रकाश आणते, दु:ख असेल तेथे सुख, असमाधानाच्या जागी समाधान, वेदना असतील तेथे आनंद, अव्यवस्थेच्या जागी सुव्यवस्था, मृत्यूच्या जागी जीवन, नरक असेल तेथे स्वर्ग आणि मायेच्या ठिकाणी नाम भगवंत आणते. जो त्या सुकीर्त नामाचा आश्रय घेतो त्याला दैन्य, दु:ख, काळजी आणि वेदना राहात नाहीत. तो पूर्ण समाधानात शांत असतो."

"सर्व काळ भगवंताच्या नामाला चिकटून रहा. नाम ही अशी फळी आहे की तिचा जो आधार घेतो त्याला ती बुडू देत नाही; त्याचा नाश होत नाही. नाम म्हणजेच भगवंत, नाम हाच गुरु, नाम हेच सर्वस्व होय.")

पुस्तकातील उतारे वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, परा, पश्यंती हे वाणीचे प्रकार सोडून द्या. वाणीची, ध्वनी - जो आतून येतो तो, नाद आणि शब्द अशीही विभागणी करता येते. नादब्रह्म आणि त्याच्याही पलीकडे

शब्दब्रह्म आहे. नामाला त्यांनी ब्रह्मच म्हटले आहे. नामाचे हे खरेपण आपल्या अनुभवाला का येत नाही?

**साधक :** यावर आपण बरेचदा विचार केला आहे. आपल्यावर दृश्याचा पगडा इतका आहे की ते खरे वाटते. आणि जोपर्यंत ते खरे वाटते तोपर्यंत नाम खरे वाटणार नाही.

**साधक ज :** नाम खरे वाटत नाही असे नाही. काही वेळा जाणवते की आपण नाम घेत नाही, ते चाललेले आहे. पण ते तसे टिकण्यासाठी लागणारी धारणा कमी पडते.

**साधक प :** आपण करू म्हणून होणारी ती गोष्टच नाही. त्यामुळे विचाराने त्याचे खरेपण जाणवणार नाही. आत काहीतरी अडसर आहे. त्यामुळे नाम खोले गेले तरी तेथे टिकत नाही.

**पू. बाबा :** स्वामी रामदासांप्रमाणेच श्रीमहाराजांनी म्हटले आहे की आपण नाम घ्यावे; ते आपल्याच कानांनी ऐकावे.

**साधक ग :** नामात त्याची स्वत:ची अशी लय आहे.

**पू. बाबा :** होय; त्यात स्वत:ची हार्मनी आहे. तथापि ती टिकेलच असे नाही.

**साधक ड :** आमच्या तिकडे एका राम मंदिरात नाम सप्ताह होता. पुष्कळ लोक मोठ्यांदा श्रीराम जयराम जयजयराम हा जप करत. तो चांगल्या चालीवर व तालात चाले. त्यात मन रमून जाई. घरी त्याच चालीवर नाम चांगले होई.

**पू. बाबा :** ते चांगलेच आहे. पण ती देखील एक उपाधी आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

**साधक क :** आपण मागे म्हणाला होतात तसे नाम घेतांना आपण काहीतरी पवित्र, अनमोल, भव्य दिव्य घेतो आहोत असे वाटले, निदान तशी कल्पना करू लागलो तर नाम खोल जाईल.

**पू. बाबा :** 'नामाचा आठवो कैसा राहे' या विचाराने तुकाराम महाराजांची झोप उडाली होती. तसे झाले पाहिजे.

**साधक क :** नाम घेतांना आनंद वाटू लागला तर माणूस एकसारखे नाम घेईल. मग त्याला नाम घे म्हणून सांगावे लागणार नाही.

**साधक ड :** सत्संगतीनेच नामाचे प्रेम येईल.

**पू. बाबा :** एकसारखी सत्संगती कशी मिळणार? 'नामात मला पहा' असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. मी माझे प्राण (नाम) तुम्हांला दिले आहेत ना!'

असे श्रीमहाराज मला म्हणाले होते. इतके त्यांना नामाचे श्रेष्ठत्व वाटत होते. त्या नामाची आपल्याला संगत वाटली पाहिजे.

**साधक प :** हेबळ्ळी किंवा गोंदवल्याला नामस्मरण चांगले होते.

**पू. बाबा :** पण कायम तेथे कसे राहता येणार? आणि जास्त काळ तेथे राहिलो तर तो भाव कदाचित टिकणारही नाही. हेबळ्ळीला गाभाऱ्यातून नामाच्या लाटा येत असल्याचे मला जाणवले!

**साधक ग :** वास्तविक नाम सर्वत्र भरलेले आहे. तेथे गेल्यावर आपण जास्त sensitive (संवेदनशील) होतो असे मला वाटते.

**साधक क :** तेथे जातांना आपण नाम चांगले व्हावे अशी अपेक्षा ठेवून जातो आणि तेथे दुसरे काही व्यवधानही नसते. त्यामुळे तेथे गेल्यावर नाम चांगले होते. शिवाय स्थानमाहात्म्य आहेच. आजवर हजारो लोकांनी तेथे नामस्मरण केले आहे. त्याची मदत होते. श्रीरामकृष्णांनी विहीर आणि तळ्याचा दृष्टान्त सांगितला आहे. विहिरीतील पाणी काढायला थोडे कष्ट पडतात पण तळ्यातले पाणी सहज घेता येते. सत्पुरुषांची स्थाने तळ्यासारखी असतात. तेथे साधन करणे सोपे जाते.

**पू. बाबा :** पण त्यावर किती अवलंबून राहायचे? नाम जिवंत पाहिजे. आपण जिवंत आहोत म्हणजे नेमके काय आहे?

**साधक प :** मी जिवंत आहे असे इतर म्हणतात. झोपेत मी कोठे असतो हे मला कोठे माहीत आहे? त्या दृष्टीने आयुष्यातला बराच भाग मी जिवंत नसतो.

**साधक ग :** तसे म्हणता येणार नाही. मी आहे ही जाणीव असते ना?

**पू. बाबा :** बरोबर. त्या जाणिवेपर्यंत नाम खोल गेले पाहिजे. मग वृत्ती भगवदाकार होईल. वासना झाली तरी ती नामाचीच होईल. त्यासाठी येता-जाता, उठता-बसता, खाता-पिता अखंड नामस्मरण केले पाहिजे. आता काळ फार थोडा आहे. आमच्यासारख्यांचे तर झालेच आहे पण कोणाचे केव्हां काय होईल याचा नेम नाही.

## |२९५| (२० नोव्हेंबर १९९२)

**पू. बाबा :** आपण परमार्थाकडे वळलो की आपल्या मित्रांनी, नातेवाइकांनी तिकडे वळावे असे आपणांस वाटू लागते. आपला हेतू चांगला असतो पण आपले उद्दिष्ट विसरून आपण ह्या नसत्या व्यापात गुरफटून जाण्याची भीती असते. आपल्याला विशेष काही साधलेले नसते पण लोकांना सांगण्याची

उबळ येते. ह्या धोक्यापासून सावध राहिले पाहिजे. माझेच सांगतो, १९३५-३६ चा सुमार असावा. श्रीमहाराजांकडे नियमित येऊ लागलो होतो. एक दिवस के. इ. एम्. हॉस्पिटलमधल्या माझ्या जुन्या वर्गमित्राला - डॉ. फडके यांना - श्रीमहाराजांकडे घेऊन आलो. श्रीमहाराजांना ते आवडले नाही. फडके गेल्यावर महाराज मला म्हणाले, कोणत्या सत्पुरुषाकडे कोण जाणार, तो तेथे टिकणार की नाही हे ठरलेले असते. आपण त्या भानगडीत पडू नये. म्हणून मग मी यांनाही (सौ. आईना) सांगितले होते की मला हे महाराज आवडले आहेत पण तुमचे तुम्ही स्वतंत्रपणे ठरवा.

नंतर पू. बाबा साधक प ना म्हणाले, आत्मज्ञान झाल्यानंतर सत्पुरुष कसे बोलतात, वागतात, सांगतात असे परवा तुम्ही विचारले होते. तुम्हीच दिलेल्या जे. कृष्णमूर्तींच्या Beyond Time या पुस्तकात आणि त्यांच्याच Note Book मधे याचे उत्तर आहे. कृष्णमूर्ती म्हणतात की सत्पुरुषांचे वागणे, बोलणे, लिहिणे, उपदेश करणे याला विशेष महत्त्व नसते. त्यांच्या अनुभवाची अवस्था फार वेगळी आणि वरची असते. ती शब्दात पकडता येत नाही. तो शांतीचा समुद्र होतो असे स्थूलमानाने म्हणता येईल. मेथा म्हणून एक थिऑसफिस्ट होते. त्यांनी म्हटले आहे की गीतेचा उद्देश माणसाला त्याच्या खालच्या पातळीवरून Supermind च्या म्हणजे हिरण्यगर्भाच्या पातळीवर नेणे हा आहे. श्रीअरविंद म्हणतात की गीता त्याच्याही वर नेऊन आत्मज्ञान करविते. पण तो मुख्य विषय नाही. गुरु अज्ञान नाहीसे करतो ही तरी आपली दृढ श्रद्धा आहे का हे आपण तपासून पाहिले पाहिजे. आपण साधन करतो. गोंदवले किंवा हेबळ्ळी येथे आपली साधनाची पातळी वर जाते पण परत आलो की हळूहळू आपण मूळ पदावर येतो. असे का होते? आणि ते कसे टाळायचे? कारण एकसारखे काही अशा ठिकाणी राहता येणार नाही. आपल्या घरातच ते आपण निर्माण केले पाहिजे.

**साधक क** : साधन करावेसे वाटते, पण त्याची खरी तळमळ नाही. त्यामुळे नेहमीच्या व्यवहारात आलो की पुन्हा पहिल्या पातळीवर जायला होते.

**पू. बाबा** : पण हे थांबले पाहिजे ना? आत्ता तळमळ लागली नाही तर ती केव्हां लागणार?

**साधक प** : आपले दृश्याचे प्रेमच खरे आड येते.

**पू. बाबा** : आपल्या जीवनातल्या सगळ्या गोष्टी त्यांच्या सत्तेने घडतात असा अनुभव येऊनसुद्धा आपल्याला त्यांच्यावर कां सोपवता येत नाही?

**साधक क** : भूतकाळातल्या घडून गेलेल्या गोष्टींबद्दल तसे वाटले तरी पुढे घडायच्या गोष्टींबद्दल तसे वाटत नाही.

**साधक ग** : मी कर्ता आहे ही समजूत नाहीशी झाल्याखेरीज त्यांच्यावर सोपवता येणार नाही. आणि पंचाईत अशी की हे मीच सोपवायचे आहे. कर्तेपणाने सोपविणे शक्य आहे का?

**साधक ज** : ह्या सर्वांच्या मुळाशी हवेनकोपण म्हणजे वासना आहेत. त्या नाहीशा होत नाहीत, निदान क्षीण होत नाहीत तोपर्यंत साधनाला जोर येणार नाही.

**साधक प** : सगळेच - म्हणजे त्यात साधनही आले - त्यांच्यावर सोपवून देणे कठीणच आहे. म्हणून आज निदान, ज्यात आपले काही चालत नाही असा अनुभव आहे तो प्रपंच तरी त्यांच्यावर सोपवावा.

**साधक ड** : आवड नावड ही वासनेचीच रूपे आहेत.

**साधक क** : वासना क्षीण व्हायला त्या भगवंताकडे वळवल्या पाहिजेत. सगुणाचे प्रेम आणि उपासना हा त्याला मार्ग आहे.

**साधक प** : काही प्रमाणात एकांताची आवश्यकता आहे. त्याखेरीज आपल्या आत काय आहे, कोणत्या गोष्टी साधनाच्या आड येत आहेत ते समजणार नाही. समोरच्या माणसात दिसणारे दोष खरे आत माझ्यात आहेत हे समजले पाहिजे आणि दोषांबद्दल तिरस्कार वाटला पाहिजे. ते जाणे अवश्य आहे. आज काही वेळा मी त्यांचे समर्थन करतो.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणाले की दुसऱ्यामधे दिसणारे दोष बीजरूपाने आपल्यातच असतात. यासाठी नामस्मरणाला सावधपणाची जोड पाहिजे.

**साधक क** : स्वत:चे दोष ओळखून त्यांना नामोहरम करण्यास काहीसा साक्षीभाव येणे आवश्यक आहे, कारण चित्तशुद्धीसाठी स्वत:शी कठोर व्हावे लागेल.

**पू. बाबा** : सर्वांत वाईट म्हणजे विशेष साधन होत नसतांनाही त्याचा अहंकार वाटतो. दुसऱ्याला शिकवावेसे वाटते.

**साधक प** : श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे आपल्या प्रपंचाचे बोचके श्रीमहाराजांच्या पायावर ठेवून गोंदवल्याहून परत येता आले पाहिजे.

**साधक क** : आपले जग आपल्या कल्पनांतून निर्माण झालेले असते. म्हणून चित्त शुद्ध व्हावयाला तशी कल्पना केली पाहिजे.

**पू. बाबा** : तत्त्वज्ञान सगळे बरोबर आहे, पण ते आचरणात आले पाहिजे. संतांचे बोलणे किंवा वचने समोरच्या माणसाला अनुलक्षून असतात.

श्रीमहाराज एकाला सांगायचे की पैशाचा मोह धरता कामा नये. प्रपंच खोटा आहे इत्यादी. आणि दुसऱ्याला म्हणायचे व्यवहार सांभाळलाच पाहिजे. त्याकरता पैसा मिळवला पाहिजे आणि त्यातला थोडा तरी शिल्लक टाकला पाहिजे.

**साधक प** : साधनाचेही असेच आहे. एकच प्रकार सगळ्यांना लागू होणार नाही. प्रत्येकाची मनोवृत्ती, पूर्वसंस्कार इत्यादींवर ते अवलंबून राहील.

**पू. बाबा** : साधन करतांना सावधानता अतिशय महत्त्वाची आहे. आपण खाली आलो हे घसरल्यानंतर लक्षात येते.

**साधक क** : मला वाटते, यासाठी तितिक्षा वाढली पाहिजे. सामान्यत: आपल्या भोवतीच्या घटना आणि संबंध यांच्यामुळे आपण खाली येतो. या घटना आणि संबंध सहन करता आले पाहिजेत. जे घडते ते त्यांच्या इच्छेने घडते असे वाटू लागले की काही झाले तरी तक्रार राहणार नाही.

**साधक ज** : वास्तविक शर्ली मॅक्लीनने म्हटल्याप्रमाणे जग mathematically perfect आहे.

**साधक प** : तथापि ते जिवंत आहे. त्यात creativity आहे.

**पू. बाबा** : हे मात्र खरे! सारखी नवनिर्मिती चालू आहे.

**साधक प** : बासरी पाहिली तर एक पोकळ नळी, पण तिच्यात किती संगीत भरलेले असते. तुम्ही वाजवाल ते त्यात असते. तसे नाम अनंत आहे. साऱ्या विश्वाला व्यापून पुन्हा ते आहेच.

**साधक ज** : पुण्याच्या डॉ. प. वि. वर्तकांनी त्यांचा अनुभव दिला आहे. ते योगमार्गाने गुरु ग्रहावर गेले पण तेथील चंद्र किती आहेत ते मोजू लागताच खाली आले. कारण मोजणे (finiteness) ही भौतिक क्रिया जडातच शक्य आहे. ती सुरू होताच आध्यात्मिक अनुभव थांबला.

**पू. बाबा** : योगाचे राहू द्या; ते आपल्याला शक्य नाही. पण नाम आपले काम करतेच. तथापि त्याला आपले co-operation पाहिजे. त्याला विरोधी असे विचार आणि वागणे उपयोगाचे नाही.

**साधक ग** : खरे co-operation म्हणजे त्यांच्यावर सोपवणे. आपली इच्छा, आपला resistance नाहीसा करणे आहे.

**पू. बाबा** : हे समजून वागले पाहिजे तरच ह्या सगळ्याचा उपयोग. दिवस जाताहेत; आता दिरंगाई उपयोगाची नाही.

## |२९६| (२७ नोव्हेंबर १९९२)

आज पू. बाबा खूप प्रसन्न दिसत आहेत.

**पू. बाबा** : आपला जन्म वासनेतून झाला आहे. हे मिळावे, ते टळावे अशा वृत्ती मनात एकसारख्या उठत असतात आणि त्या आपले मन आणि वृत्ती व्यापून टाकतात. वासनांतूनच देह आलेला आहे. त्यामुळे ह्या सर्व वासनाही पुन्हा देहबुद्धीतूनच येतात. त्यातून बाहेर पडणे कठीण आहे. त्याला धाडस पाहिजे. ते धाडस आपल्याजवळ नाही. आपण नामाचे महत्त्व समजले आहे म्हणतो, पण ते समजणे अगदी वरवरचे आहे. ते वृत्तीपर्यंत खोल गेलेले नाही. नाम वृत्तीपर्यंत खोल गेले म्हणजे त्याचे अस्तित्व म्हणजे Reality समजेल. आपण सत्संगती म्हणजे देहाची संगत समजतो. सत्पुरुषाची देहाची संगत लाभणे देखील दुर्मिळच. पण तेवढ्यानेही होत नाही कारण सत्पुरुष देहापलीकडेच असतो. म्हणून श्रीमहाराज म्हणाले की नामाची संगत ठेवावी. देह जितका खरा वाटतो तितके नाम आपल्याला खरे वाटत नाही. आणि जोपर्यंत देहाचे खरेपण जात नाही तोपर्यंत नामाचे खरेपण अनुभवास येणार नाही.

नामासंबधीचे आपले जे विचार चालतात तेही देहबुद्धीतूनच चालतात. म्हणजे दृश्याचे नियमच आपण नामाला लावतो. म्हणून ज्ञानराजांनी म्हटल्याप्रमाणे जोपर्यंत हृदयात देहबुद्धीच्या जागी सद्बुद्धीचा प्रकाश पडत नाही तोपर्यंत साधन करावे असे वाटूनही प्रत्यक्षात तसे घडत नाही. यालाच आचार्यांनी प्रतिबंध असे म्हटले आहे. हा प्रतिबंध दूर कसा व्हायचा? मी दूर करतो म्हणून तो दूर होत नाही. स्वामी रामदासांनी म्हटले आहे की तो प्रतिबंध नामानेच दूर होईल. त्यांच्या गुरूंनी त्यांना सांगितले की तू नाम घे म्हणजे तुला शांतीचा लाभ होईल आणि त्यांनी अखंड नामाचा ध्यास धरला. ती निष्ठाही आपल्याजवळ नाही. सद्बुद्धीबद्दल ज्ञानराज म्हणतात :

जेथ न संचरे पुण्यपाप। जें सूक्ष्म आणि निष्कंप।
गुणत्रयादि लेप। न लागती जेथ॥ २.२३६॥
अर्जुना ते पुण्यवशें। जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे।
तरी अशेषही नाशे। संसारभय॥ २.२३७॥
जैसी दीपकळिका धाकुटी। परी बाहु तेजातें प्रगटी।
तैसी सद्बुद्धि हे थेकुटी। म्हणों नये॥ २.२३८॥

ही बुद्धी जागी व्हायला लागणारा पुण्यांश कमी पडतो. बरे, आपण विचार करतो म्हणतो पण तोही टोकापर्यंत करीत नाही. उदाहरणार्थ, मला पुस्तकांचे प्रेम वाटते ते कां वाटते? लगेच उत्तर मिळते की त्यातून मला तृप्ती मिळेल असे वाटते. पण हे खरे आहे का? हीच गोष्ट प्रत्येक वस्तूच्या आणि व्यक्तीच्या बाबतीत आहे. आपण त्यात तृप्ती शोधत असतो. म्हणून मृत्यूनंतर माझ्याबरोबर काय येणार आहे असा विचार केला तर लक्षात येईल की माझ्या वासनाच तेवढ्या माझ्याबरोबर येणार. मग इतर गोष्टींना मी कां महत्त्व द्यावे? महाभारतात एक श्लोक आहे -

धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे। भार्या गृहे बंधुजना: स्मशाने।
देहश्चितायां परलोकमार्गे। धर्मानुगो गच्छति जीव एक:॥

पूर्वी सोनेनाणे जमिनीखाली पुरून ठेवत. मृत्यूनंतर ते येथेच राहाणार. गुरेढोरे गोठ्यात राहतील. बायको फार तर दारापर्यंत येऊन घरातच थांबेल आणि मित्र, आप्तेष्ट यांची सोबत स्मशानापर्यंतच असेल. केवळ धर्म म्हणजे साधनच जीवाला पुढे नेऊ शकेल हे खरे पटले तर आज जे संसाराचे ममत्व आहे ते राहाणार नाही.

देहबुद्धी सुटायला माणसाचे कर्तृत्व म्हणजे मी कर्ता हा भाव नाहीसा झाला पाहिजे. वास्तविक आपले कर्तेपण किती लंगडे आहे याचा व्यवहारात पदोपदी अनुभव येतो. पण तरीदेखील मी कर्ता हा भाव जात नाही. जगात राहायचे म्हणजे कर्म करावेच लागणार. पण ते कर्म भगवंताच्या इच्छेने घडते आहे. खरा कर्ता तो आहे असे वाटले पाहिजे. पण हे वाटायला आधी मी कर्ता नाही असे वाटले पाहिजे. किंबहुना हे दोन्ही एकाच वेळी घडणारे आहे. आणि माझे कर्तेपण गेले तर सद्बुद्धीची ज्योत हृदयात प्रकाशावयाची शक्यता. त्यासाठी श्रद्धा पाहिजे.

श्रद्धा आणि विश्वास Faith आणि Belief यात फरक आहे. हा फरक कृष्णप्रेमनी फार चांगला सांगितला आहे. भक्ती, विश्वास, श्रद्धा इत्यादींबद्दल कृष्णप्रेम काय म्हणतात ते श्री. दिलीपकुमार रॉय यांनी श्रीअरविंदांना कळवले. त्याचे उत्तर लिहितांना श्रीअरविंद काय म्हणतात ते ऐका :

"We speak here also of Krishna's light, Krishna's light in the mind, Krishna's light in the vital etc. But it is a special light - in the mind it brings clarity, freedom from obscurity, mental error and perversion; in the vital it clears all perilous stuff and where it is, there is a pure and divine happiness and gladness."

"BHAKTI in its fulness is nothing but entire self giving as Krishnaprem very rightly indicates. But then all meditation, all TAPASYA, all means of prayer or MANTRA must have that as its end and it is when one has progressed sufficiently in that, that the Divine Grace descends and the realisation comes and develops till it is complete. But the moment of its advent is chosen by the wisdom of the Divine alone and one must have the strength to go on till it arrives, for when all is truly ready it cannot fail to come."

- Yog Shri Krishnaprem by D.K.Roy. Page 34.

("आपण येथेही कृष्णाच्या प्रकाशासंबंधी बोलतो. आपल्या मनात जाणवणारा कृष्णाचा प्रकाश, प्राणशक्तीत पडणारा कृष्णाचा प्रकाश इत्यादी. तथापि हा मनात होणारा विशेष प्रकाश आहे. त्यामुळे स्पष्टता येते. दुर्बोधता, मनाची अशुद्धी किंवा अपवित्रता, विपरीत भाव यांपासून मुक्ती मिळते. तो प्रकाश प्राणामधील (चित्तातील) भीतिप्रद गोष्टी नाहीशा करून पवित्र दैवी सुख आणि आनंद देतो.

कृष्णप्रेम सांगतात ते बरोबर आहे. भक्तीमध्ये संपूर्ण आत्मसमर्पण असते. तथापि सर्व प्रकारचे ध्यान, तपस्या, प्रार्थना, मंत्र इत्यादींचाही तोच हेतु असला पाहिजे. या गोष्टींची पुरेशी वाढ झाली की दैवी कृपा अवतरते आणि ती साधकाला आत्मसाक्षात्कारापर्यंत घेऊन जाते. पण ही कृपा अवतरण्याचा क्षण भगवंतच त्याच्या इच्छेप्रमाणे ठरवतो. कृपा अवतरेपर्यंत शक्ती आणि धीर हवा कारण साधकाची तशी तयारी झाली की कृपा अवतरतेच")

श्रीअरविंदांचे हे म्हणणे दिलीपकुमारनी कृष्णप्रेमना कळवले. त्यावर कृष्णप्रेम लिहितात :

"True faith is naked. It is not belief in this or that : it Has little, it anything, to do with 'this or that.' It is a naked smokeless flame that burns in the secret recesses of the heart, sustaining the soul and lightening it on its path." - Ibid P. 36

"We should not be worried by the optimist - pessimist business.. optimism is the disposition to think that our wishes will be realised and pessimism the disposition to think that

most probably they will not. Neither of them is at all relevant. Not our wishes but Krishna's will is what matters - and that will be realised, make no mistake about that How and when - is Known to Him - not to us." Ibid. P.37.

("खरी श्रद्धा उघडी असते. श्रद्धा म्हणजे या किंवा त्या गोष्टीवरचा विश्वास नव्हे. या किंवा त्या असल्या (सांसारिक) गोष्टींशी श्रद्धेला कर्तव्य नसते. श्रद्धा ही शुद्ध धूम्ररहित ज्योत असून ती हृदयकपाटात प्रकाशते आणि जीवाला धीर देऊन त्याला (आत्मसाक्षात्काराचा) मार्ग दाखवते.

आशावादी निराशावादी असल्या वादांची आपण चिंता करू नये. आपल्या इच्छा पूर्ण होतील अशी ज्यांची मानसिक धारणा असते ते आशावादी आणि बहुतकरून आपल्या इच्छा पूर्ण होणार नाहीतच असे ज्यांना वाटते ते निराशावादी होत. या दोहोंपैकी कोणीच येथे प्रस्तुत नाही. आपल्या इच्छांना महत्त्व नसून कृष्णाची इच्छा महत्त्वाची आहे आणि लक्षात ठेवा की केवळ त्याचीच इच्छा पूर्ण होते. ती कशी आणि केव्हां पूर्ण होते ते त्यालाच माहीत; आपल्याला नाही.")

श्रीकृष्णप्रेमचे हे म्हणणे दिलीपकुमारनी पुन्हा श्रीअरविंदांना कळवले. त्यावर श्रीअरविंद लिहितात :

"As for faith, Krishnaprem's meaning is clear enough. Faith in the spiritual sense is not a mental belief which can waver and change. It can wear that form in the mind but that belief is not the faith itself it is only the external form. Just as the body, the external form can change but the Spirit remains the same, so it is here. Faith is a certitude in the soul which does not depend on reasoning, on this or that mental idea or circumstances, on this and that passing condition of the mind or the vital or the body... it is seen burning still in the soul when one has thought that it was extinguished for ever. The mind may be a shifting sea of doubts and yet that faith may be there within, and, if so, it will keep even the doubt - raked mind in the way so that it goes on in spite of itself towards its destined goal. Faith is a spiritual certitude of the spiritual, the

divine, the soul's ideal, something that clings to that even when it is not fulfilled in life, even when the immediate facts or the persistant circumstances seem to deny it," - Ibid P.38

("श्रद्धेबद्दल म्हणायचे तर कृष्णप्रेम यांचा अर्थ स्पष्ट आहे. आध्यात्मिक दृष्टीने श्रद्धा म्हणजे डळमळणारा किंवा बदलणारा (मनाचा) विश्वास नव्हे. काही वेळा मनामध्ये विश्वास तसे रूप घेईल; पण ती खरी श्रद्धा नव्हे. तो श्रद्धेचा केवळ बाह्य आकार म्हणता येईल. शरीराचा बाह्य आकार बदलला तरी शरीरातील आत्मा तसाच राहतो; तसेच हे आहे. श्रद्धेच्या बाबतीत आत्म्याची खात्री असते आणि ती खात्री विचारावर किंवा मनाच्या कल्पनांवर, परिस्थितीवर किंवा त्या त्या वेळच्या मनस्थितीवर, किंवा देहावर किंवा प्राणशक्तीवर अवलंबून नसते. काही वेळा श्रद्धेची ज्योत विझली असे वाटले तरी ती हृदयात निष्कंप तेवत असते. मनात विविध शंकांचे कल्लोळ उठत असले तरी आतमध्ये श्रद्धा स्थिर राहील आणि शंकांचे घर झालेल्या मनाला देखील ती आपल्या ध्येयाकडे नेईल. श्रद्धेत आध्यात्मिक निश्चितपणा असतो. श्रद्धा आत्म्याचा - त्या दिव्य आत्म्याचा - आदर्श असतो. तो आदर्श जीवनात साध्य झाला नाही, घडणाऱ्या घटना आणि परिस्थिती यांमुळे तो आदर्श साध्य होणार नाही असे वाटत असले तरी श्रद्धा त्या आदर्शालाच चिकटून राहते.")

**पू. बाबा** : हे सगळे वाचून दाखवायचे कारण ज्ञानेश्वर महाराज, श्रीअरविंद, कृष्णप्रेम यांनी म्हटल्याप्रमाणे हृदयात सद्बुद्धीची ज्योत प्रकाशली पाहिजे.

**साधक प** : हृदयात ज्योत आहेच. तिच्यावरचे आवरण दूर झाले पाहिजे. त्यासाठी कर्तेपण जाणे आवश्यक आहे. माझे कर्तेपण मी नाहीसे करीन म्हणणे हे कर्तेपणाचेच लक्षण आहे.

**पू. बाबा** : होय, पण मग हे कसे करायचे ?

**साधक प** : मला वाटते, काहीही न करता स्वस्थ बसून राहिले तर खरे आपण आत काय आहोत ते समजून येईल. खरोखरच आपल्याला भगवंत पाहिजे का ? कदाचित लक्षात येईल की आपल्याला संसारच पाहिजे. काही हरकत नाही. मग तोच करावा; कारण मी करेन म्हणून परमार्थ होणार नाही.

**साधक ज** : विचार केला तर आपल्या आड काय येते आहे ते आपल्याला समजते.

**पू. बाबा** : विचार तरी आपण पुरता कोठे करतो ? लोकमान्य, अरविंद किंवा विनोबा ही खरी विचारी माणसे. तुमचा मुलगा खूप आजारी असला तर तुम्हाला

झोप लागेल का असे लोकमान्यांना विचारले होते तेव्हां ते म्हणाले की चांगल्यात चांगल्या डॉक्टरकडून त्याला औषधोपचार करेन आणि मग स्वस्थ झोपेन. असा निश्चय, असा विचारांचा खंबीरपणा आणि त्याप्रमाणे आचरण जमणार आहे का? विनोबांचेही असेच. महाप्रयाणाच्या वेळी देखील त्यांची दोन्ही पावले हालत होती. त्या तालावर त्यांचा राम हरी जप चालायचा. ह्या मोठ्यांच्या गोष्टी. पण आपण देखील विचार करून त्यापासून काही शिकले पाहिजे.

**साधक प** : मी विचार म्हणतच नाही. स्वस्थ बसावे; कारण विचार ही देखील कृतीच आहे आणि ती अविद्येतून आलेली असते.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता त्यात थोडा अर्थ आहे. पण आड काय येते हे समजले तरी साधन कसे व्हायचे?

**साधक प** : नाहीतरी साधन होणे आपल्या हातात कोठे आहे?

**साधक क** : तसे कसे म्हणता येईल? गीतेच्या नवव्या अध्यायात म्हटल्याप्रमाणे जो भक्ती करतो त्या प्रत्येकाला मुक्तीचा अधिकार आहे. श्रीमहाराजही म्हणायचे की माणूस म्हणून जो जन्माला आला त्या प्रत्येकाला मुक्तीचा अधिकार आहे. मात्र त्यासाठी अभ्यास ही होकारात्मक बाजू आणि त्याचबरोबर वैराग्य ही दुसरी बाजू आवश्यक आहे.

**पू. बाबा** : (साधक ग ना) तुम्हांला काय वाटते?

**साधक ग** : संसार अपूर्ण आहे. त्यात आणखी काही मिळवले की तो पूर्ण होईल असे वाटते आणि म्हणून कर्तेपणा घेऊन तो आपण पूर्ण करायला धडपडतो. मुळात जे अपूर्णच आहे ते कधीच पूर्ण होणार नाही हे आपल्या लक्षात येत नाही.

**साधक ड** : आपले कर्तेपण लटके आहे हे पदोपदी जाणवत असूनही मी कर्ता हा भाव जात नाही.

**पू. बाबा** : आणि तो जात नाही तोपर्यंत राम कर्ता हा भाव टिकणार नाही.

**साधक प** : मला वाटते, आणखी काही मागत बसण्यापेक्षा मला समाधान दे असे भगवंताजवळ मागावे. मग काही का होईना! काय करून आपल्याला समाधानात ठेवायचे हे तो ठरवणार. नाहीतरी आपली सगळी धडपड समाधानासाठीच आहे.

**पू. बाबा** : बरी आठवण झाली! त्याच्यावर सोपवता आले पाहिजे. ते जमले की कसे मोकळे होता येते. गेल्या आठवड्यातच एक गृहस्थ आले होते. नांवाचे येवढे महत्त्व नाही. त्यांची बायको बरेचदा रविवारच्या निरूपणाला येते. तेही तीन

चार वेळा आले होते. परवा ते पेढे घेऊन आले होते. कशाचे पेढे म्हणून विचारल्यावर त्यांनी ही हकिगत सांगितली. अंधेरीला ते दोन लहान खोल्यांत रहात असत. भिक्षुकीचा व्यवसाय. त्यांच्या घरमालकाने त्यांनी जागा सोडावी म्हणून कोर्टात फिर्याद केली आणि त्याच्यासारखा निकाल होऊन बेलीफ आणून त्याने जागा खाली करून घेतली. यांनी आपले सामान दोन तीन मित्रांकडे ठेवले, बायकोला नाशकास पाठवले आणि आपण एका मित्राकडे राहू लागले. ते म्हणाले, मला काहीच करणे शक्य नव्हते. प्रवचनात तुम्ही नामाच्या शक्तीबद्दल सांगितले होते म्हणून मी अखंड नामस्मरण करू लागलो आणि श्रीमहाराजांना म्हटले की आता तुम्ही पहा. मित्रांनी वरच्या कोर्टात जायचा सल्ला दिला पण त्यासाठी माझ्याजवळ पुरेसे पैसे नव्हते. मित्रांनी मदत केली आणि वरच्या कोर्टात गेलो. तेथे कृष्णमूर्ती म्हणून न्यायाधीश होते. त्यांनी कोर्टात जेव्हां प्रवेश केला तेव्हां त्यांच्या जागी मला श्रीमहाराजच दिसले. मला हा भ्रम होतो आहे असे वाटू लागताच ते न्यायाधीश दिसू लागले. त्यांनी तडकाफडकी निकाल देऊन जागा माझ्या ताब्यात परत देण्याचा हुकूम दिला. मी पाहू लागलो तो परत तेथे श्रीमहाराज दिसू लागले!

हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, पहा ही श्रद्धा! निष्ठा असेल तर काय होणार नाही?

**साधक ग** : ते पूर्णपणे शरण गेले. हा भाव फार श्रेष्ठ आहे.

**साधक ख** : गजेन्द्रासारखी त्यांची स्थिती झाली.

**साधक ग** : अब तो जीवन हारे!

**पू. बाबा** : बरोबर आहे. हारे को हरिनाम.

**साधक क** : पण ही अनन्यता विशेषत: रोजच्या जीवनात कठीण आहे. डोक्यावरचे छप्पर नाहीसे झाल्यावर त्या गृहस्थांना नामाच्या शक्तीची आठवण झाली.

**पू. बाबा** : पण साधक म्हणून आपण काही नको का करायला? असे एक करता येईल. प्रत्येक गोष्ट आपल्या गुरूंना सांगून करायची. अगदी मी आता बाहेर जातो आहे, आत्ता बाहेरून आलो, आता जेवायला बसतो आहे, आता झोपतो आहे इत्यादी. ही सवय लागली तर त्यातून अस्तित्वाचा भाव येईल.

**साधक ग** : हे नामाच्या अनुसंधानाइतकेच अवघड आहे.

**पू. बाबा** : पण हा अभ्यास आहे. सुरुवातीला वरच्यावर विसरू; पण मग हे विसरणे कमी होऊ लागेल. सुरुवात तरी केली पाहिजे ना?

**साधक प** : आत्तापर्यंत चर्चा पुष्कळ झाली. आता व्हायचे शिल्लक आहे.

**पू. बाबा** : पाहू; पुढच्या शुक्रवारी यावर जास्त विचार करू.

**|२९७|** (४ डिसेंबर १९९२)

आमच्यापैकी एक साधक काही महिने परगावी गेले होते, ते आज आले म्हणून पू. बाबांनी त्यांना तिकडे जप चांगला झाला ना असे विचारले. ते म्हणाले की पहाटे नियमाचा जप चांगला होत असे पण दिवसा तितकासा होत नसे. त्यामानाने वाचन मात्र झाले.

**पू. बाबा** : दोन दिवसांपूर्वी एक बाई भेटायला आल्या होत्या. मंत्रालयात अधिकारी आहेत. जप करतात. त्या म्हणाल्या की त्यांचा नवरा, सून, मुलगा इत्यादी घरातील माणसे सांगूनही नामस्मरण करत नाहीत. मी त्यांना विचारले, तुम्ही किती जप करता? करावासा वाटतो तितका होतो का? त्या नाही म्हणाल्या. मी त्यांना म्हटले, मग ही दुसऱ्यांना परमार्थ सांगण्याची उठाठेव तुम्हांला कोणी सांगितली आहे? आपलेच साधन धड नाही, ते चांगले कसे होईल इकडे लक्ष द्यावे. दुसऱ्यांना परमार्थ मार्गावर आणायला सत्पुरुष आहेत. ते त्यांचे काम बरोबर करत असतात. तुम्हीच आत्ता म्हणालात की दिवसा व्हावेसे वाटत होते तसे तिकडे नामस्मरण होत नव्हते. ते कां होत नव्हते याचा विचार केलात कां? मला वाटते, नव्हे माझी खात्री आहे की मला माझा प्रपंच आसपासची माणसे, घटना हे सर्व जसे खरे वाटते तसे नाम खरे वाटत नाही आणि त्यामुळे कंटाळा येतो. In a way, we are dead souls ! थोडे नाम घेतो, धुगधुगी आहे म्हणून dead म्हणायचे नाही इतकेच. तुम्ही पुस्तके वाचलीत ते वाईट असे मी म्हणत नाही; पण वाचनात मन रमते, नामात रमत नाही. असे कां होते याचा विचार नको का करायला? मी म्हणतो की नाम राहू द्या; नुसते स्वस्थ बसून माझ्या नामाच्या आड काय येते याचा विचार करावा. प्रतिबंध काय आहे ते कळल्याशिवाय तो दूर कसा करता येईल? व्यवहारात विचार करतांना आपण जी बुद्धी वापरतो तीच बुद्धी आत वळवून विचार करायचा आहे. Let us first diagnose ourselves. काय हरकत आहे असे करायला?

**साधक प** : आपण इतर गोष्टींबद्दल जसा विचार करतो तसा स्वत:बद्दल विचार करता येत नाही. त्यासाठी स्वत:पासून वेगळे होता आले पाहिजे.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. स्वत:पासून थोडे तरी वेगळे झाले पाहिजे.

**साधक प** : दुसरे असे की साधनाच्या आड काय येते याचा विचार करू लागलो की त्या विचारांकडेच जास्त लक्ष जाते आणि साधन लटके पडते.

**पू. बाबा** : तुमची नेहमीची साधनाची वेळ असते तेव्हां नये हा विचार करू. पण दिवसा साधन होत नाही असे हे म्हणतात त्यावेळी आत्मनिरीक्षण करायला काय हरकत आहे? पैसा, मानमान्यता, नातेवाईक, इतर विकार यांपैकी साधनाच्या आड काय येते?

**साधक ग** : मला वाटते, माझा कर्तेपणा आड येतो. मी कर्ता नाही हे पटत नाही तोपर्यंत साक्षित्वाने विचार करता येणार नाही.

**पू. बाबा** : राम कर्ता, साक्षित्व ह्या पुढच्या गोष्टी झाल्या. आधी इच्छा असूनही माझे साधन का होत नाही हे समजले पाहिजे.

**साधक ब** : मला वाटते, प्रार्थना हाच एक मार्ग आहे.

**पू. बाबा** : त्याबद्दल मागे साधक ख म्हणाले होतेच. पण ती प्रार्थना देखील यांत्रिक होते. हेबळ्ळी आणि गोंदवले येथे अक्षरश: हजारो लोकांना साधनाबद्दल प्रश्न विचारला. फक्त एकजण वगळता सर्वांची तक्रार की मनासारखे साधन होत नाही. आपण विचार करतो पण ज्याला होलिस्टिक व्ह्यू किंवा समग्र विचार म्हणतात तो करत नाही. आत्तापर्यंत माझ्या जीवनात ज्या गोष्टी झाल्या त्यांना कितीसे महत्त्व आहे?

**साधक क** : आपला विचार नेहमी खंडित असतो. इतकेच नाही तर आपली अभ्यासाची पद्धत देखील analysis म्हणजे विश्लेषणाची आहे. मी आणि जग यात भेदभाव झाला की जगाकडून माझ्या काही अपेक्षा असतात. त्याचप्रमाणे त्यामुळे सुखदु:खही होते. ज्या जगाचा मी विचार करतो त्या जगाचाच मी एक भाग आहे हे आपण विसरतो.

**साधक प** : सुख आणि दु:ख या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. एक घेतले की दुसरे आलेच. तथापि ती दोन्ही तात्पुरती आहेत हे समजले पाहिजे. साधनात आड येणाऱ्या विकारांसंबंधी माझी एक शंका आहे. विचारांनी आणि साधनाने ते बाहेर पडतील की आत जिरून जातील? की दोन्ही घडेल?

**पू. बाबा** : दोन्ही घडेल. नामस्मरण करू लागलात की प्रथम विकार बळावतील असे महाराजांनीच म्हटले आहे. हे जणू त्यांना निघून जाण्याची नोटीस मिळाल्याचे लक्षण आहे. त्यानंतर मात्र काही विकार आतल्या आत जिरून जातील.

**साधक प** : आतल्या आत जिरून नाहीसे होतील की नाही ते सांगता येत नाही. मृतवत् पडून राहून संधी मिळाली की उसळी मारून ते वर येण्याची शक्यता आहे. म्हणून ते बाहेर पडून जाणेच चांगले.

**साधक ग** : मला वाटते की आपण नामस्मरण न करता दुसऱ्या गोष्टी करतो, उदाहरणार्थ टी.व्ही. पहात बसतो तेव्हां नामस्मरण करायचे सोडून आत्ता मी टी.व्ही पहात का बसलो आहे असा स्वत:ला कधी प्रश्नच करीत नाही.

**साधक ब** : साधक ग म्हणतात ते खरे आहे. I have reached my limit - माझी आता हद्द झाली असे वाटावे इथपर्यंत आम्ही जातच नाही.

**पू. बाबा** : खरोखर श्रीमहाराजांना असे सांगता आले पाहिजे की मला शक्य तितके मी केले, आता तुम्ही पहा. माझी खात्री आहे ते पहातीलच. आणखी असे की श्रीमहाराजांनी आपल्याकरता किती केले आहे असे obligation - कृतज्ञताभाव जर वाढवला तर पदोपदी त्यांची आठवण होऊन साधन चांगले होईल.

## |२९८| (१२ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य ३ शके १९१४. श्रीमहाराजांच्या पुण्यतिथी उत्सवाचा तिसरा दिवस.

संध्याकाळी ७। च्या सुमारास पू. बाबांच्या खोलीत गेलो. नेहमीप्रमाणे खूप गर्दी होती.

**पू. बाबा** : समर्थांनी 'देहेदु:ख तें सूख मानीत जावें।' म्हटले आहे. आपण देहापुरतेच बोलू. आजारात किंवा म्हातारपणी देहाला किती तरी दु:ख होते; ते सुख मानणे शक्य आहे काय ? मोठ्या माणसांच्या गोष्टी सोडून द्या. सामान्य, तुमच्या आमच्या सारख्या माणसाला देहदु:ख होते म्हणजे नेमके काय होते ? हे दु:ख कोणाला होते ? अशा वेळी हे दु:ख नाही, सुख आहे असे मानायचे म्हणजे काय ?

**साधक प** : देहाला होणारी सुखदु:खे मी माझी मानतो. देहतादात्म्यामुळे हे होते. दुसरे असे की सुख आणि दु:ख दोन्ही बरोबरच एकमेकाला लागून आहेत. एक आले की दुसरे येणारच. दु:खाबद्दल तक्रार करतो पण देहसुखाबद्दल माणूस तक्रार करीत नाही.

**साधक ग** : अनुकूल वेदनीयं सुखम् आणि प्रतिकूल वेदनीयं दु:खम् असे सुखदु:खाबद्दल सांगतात. तथापि विवेकी माणूस गुणा: गुणेषु वर्तन्ते म्हणतो. तो म्हणतो की येणारे सुख आणि दु:ख दोहोंशीही माझा संबंध नाही.

**पू. बाबा :** इतक्या शांतपणे आणि विवेकाने देहाचे दु:ख भोगणे शक्य आहे का ?

**साधक ग :** दु:खाचे मूळही, मला वाटते, आपल्या हवे नकोपणात म्हणजे वासनेत आहे. हवे ते मिळाले नाही किंवा नको ते टळले नाही की माणसाला दु:ख होते. सुखाचे कारणही तेच आहे. हवे ते मिळाले किंवा नको ते टळले की सुख होते.

**साधक प :** देहाची जेव्हां स्वस्थ निरोगी अवस्था असते तेव्हां माणसाला देहाचे भान नसते पण देहाला काही कमी जास्त झाले की त्याचे दु:ख होते.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणाले, पोट दुखू लागले की पोटाची आठवण होते. वासनेतून किंवा देहतादात्म्यातून दु:ख येते हे मान्य केले तरीं ते नाहीसे करून त्या जागी सुख कसे आणायचे ?

**साधक क :** सुख आणि दु:ख या दोन्ही कल्पना आहेत. वास्तविक सुख दु:ख असे काही नाहीच. म्हणून ही कल्पना गेली की सुख दु:ख गेले.

**पू. बाबा :** कल्पना नाहीशी कशी करायची ? समजा तुमचे डोके दुखते आहे; अशा वेळी तुम्ही काय कराल ?

**साधक प :** ते थांबायसाठी गोळी घ्यावी म्हणजे झाले ! (सर्वजण हसतात) I am not joking. देहदु:ख ही कल्पना आहे. गोळी घेतली की डोके दुखत असूनही ते आपल्याला समजत नाही. किंवा भूल दिली की ऑपरेशन करतांना होणारे दु:ख समजत नाही. समजा गोळी किंवा भूल यांच्याशिवाय तशी स्थिती झाली तर देहाला दु:ख होईना का ? ते समजले नाही म्हणजे झाले.

**एक श्रोता :** म्हणजे हा योगमार्ग झाला.

**साधक ग (पू. बाबांना) :** तुम्ही श्री. गोळवलकर गुरुजींची त्यांच्या पाठीचे गळू कापले तेव्हां भूल दिलेली नसूनही ते गप्पा मारत होते अशी हकिगत सांगितली होती.

**पू. बाबा :** होय. ते म्हणाले की मी तेवढ्यापुरती त्या भागातली चेतना नाहीशी केली.

**साधक ब :** रमण महर्षींच्या हाताचे ऑपरेशनही तसेच केले होते.

**साधक प :** म्हणजे देहाला दु:ख होत असतानाही माणसाला त्याच्यापासून वेगळे होता येते.

**पू. बाबा :** हे बरोबर आहे. माणसाला देहापासून वेगळे होऊन देहाकडे पहाता आले पाहिजे. देहाला काही होऊ लागले तर होऊ दे, त्याचा हा

स्वभावच आहे असे तो म्हणेल, फार तर त्याला औषधपाणी करून आता गप्प बस म्हणेल. योगाचे सोडून द्या; पण सामान्य माणसाला हे कसे करता येईल?

**साधक ग** : भक्तीच्या भाषेच्या ही तुझी इच्छा! जे होते आहे ते सर्व त्याच्या इच्छेने होते आहे असे वाटले पाहिजे.

**पू. बाबा** : तेवढेच नाही. तो माझ्या हिताचे तेच करतो आहे असे वाटले पाहिजे. या दृष्टीने श्री. भाऊसाहेब (केतकर) आपले आदर्श आहेत. तसबिरीपुढे त्यांना (श्रीमहाराजांना) सांगावे म्हणजे आपली जबाबदारी संपली, म्हणाले. आणि असे कां, तर भाऊसाहेब, तसबिरीसमोर सांगितलेले मला ऐकू येते असे श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले होते. तेव्हां तुझी इच्छा म्हणतांना अशी निष्ठा पाहिजे.

**साधक** : सुख दु:ख या कल्पना आहेत आणि त्या स्मृतिरूप आहेत. ऐकून वाचून माणूस ठरवतो की अमकी गोष्ट मला सुख देईल.

**पू. बाबा** : आपल्याला त्या दु:खाच्या मुळाशी जाता आले पाहिजे. म्हणजेच त्याचे स्वरूप कळले पाहिजे. ते कळले की हे असेच असायचे ही खात्री होईल. आपल्या गुरूंचे एकसारखे स्मरण ठेवले, प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून केली तर आपण करतो त्यातून दु:ख निर्माण झाले तरी माणसाला दु:ख वाटणार नाही. त्यांची आठवण सतत ठेवायची म्हणजे अखंड नामस्मरणात राहायचे, कारण ते नामातच आहेत.

## |२९९| (१३ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य चतुर्थी. उत्सवाचा चवथा दिवस.

**पू. बाबा** : (मांडवे·गांवच्या श्री. देशपांडे यांना) : आज काही शंका नाही का?

**श्री. देशपांडे** : शंका नाही पण निदिध्यासन होत नाही.

**पू. बाबा** : म्हणजे काय ते सोपे करून सांगा.

**श्री. देशपांडे** : एकसारखे साधन होत नाही. कर्तव्य म्हणून प्रपंचाकडे लक्ष द्यावे लागते आणि मन विचलित होते.

**पू. बाबा** : नाथांनी सांगितलेले आपण लक्षात ठेवले पाहिजे. प्रपंच न सोडता, कर्मरेखा न ओलांडताच साधन केले पाहिजे.

**एक रिटायर्ड गृहस्थ** : गेली तीस वर्षे मी परमार्थ मार्गात आहे. नियमितपणे पूजा, पारायणे करतो पण घरात पत्नीचा विरोध कमी होत नाही. त्यामुळे त्रास होतो.

**पू. बाबा** : पूजापाठ, पारायणे म्हणजे अध्यात्म नव्हे. अध्यात्म हे अंतरंगातले आहे. आतून सुधारणा झाल्याखेरीज अध्यात्म नाही. क्रोध आणि कामवासना कमी झाल्याखेरीज आतून सुधारणा होणार नाही. पारायणे करून क्रोध तसाच रहात असेल तर बायकोचा विरोध राहाणारच. याच्याउलट जर तुमच्यामधे आतून बदल होतो आहे असे त्यांना दिसून आले तर त्यांचा विरोध मावळेल.

मला भगवंत हवा अशी प्रथम **आस** म्हणजे इच्छा निर्माण झाली पाहिजे. त्यातूनच **हव्यास** निर्माण होऊन शेवटी त्याची परिणती **ध्यासात** होईल.

**|३००|** (१४ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य पंचमी. उत्सवाचा पाचवा दिवस. नेहमीप्रमाणे संध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो.

**पू. बाबा** : आज इतकी वर्षे आपण गोंदवल्याला उत्सवाला येतो आहोत. आता येथे राहण्या-खाण्याच्या सगळ्या सोयी झाल्या आहेत. ह्या सोयी नसत्या तर आपण आलो असतो का याचा प्रत्येकाने आपल्या मनाशी विचार करावा आणि स्वत:शीच उत्तर शोधावे.

पुढचा प्रश्न की मी कां येतो? येथे येऊन मला काय मिळवायचे आहे? त्या दृष्टीने माझे प्रयत्न चालू आहेत का?

येथे येतांना जर भगवंत हवा असे वाटत नसेल तर आणि केवळ बाहेरच्या गोष्टींत आपण रमलो तर येण्याचा काय उपयोग? भगवंत हवा असे वाटत असेल तर काही पथ्ये पाळणे आवश्यक आहे. त्याखेरीज आपले पाऊल पुढे पडणार नाही.

पहिली गोष्ट म्हणजे मी काय करायला हवे याचा विचार केला पाहिजे. दुसरा काय करतो, कसा वागतो ते पाहू नये. आपल्या दोषांची जाणीव होणे ही सुधारणेची सुरुवात आहे. तुकाराम महाराज म्हणाले, "कासया मी वर्णू दोष इतरांचे। मज काय त्यांचे कमी असे॥" हे पथ्य कसोशीने पाळून करावयाच्या गोष्टी अशा :

१) आपण येथे नामस्मरणासाठी येतो, तेव्हां शक्य तितके जास्त नामस्मरण करावे. वायफळ गप्पांत वेळ घालवू नये.

२) बोलायचेच झाले तर साधनाला पोषक असेच बोलावे. तुकाराम महाराजांचे किंवा ज्ञानेश्वर महाराजांचे अभंग आणि ओव्या किंवा श्रीमहाराजांचे चरित्र, अभंग, वचने इत्यादींचे चिंतन करावे.

३) साधन चांगले व्हावयाला पाहिजे असेल तर त्याला योग्य अशा आहार विहारांची जरुरी आहे. ते सांभाळले आणि रात्रीच्या शांत वेळी नामस्मरण केले तर ते छान होते. प्रयत्न केले पाहिजेत. उगीच दरवर्षी येतो आणि जातो असे होता कामा नये.

हा अभ्यास येथे आपण आहोत तोपर्यंत करू आणि तो घरी घेऊन जाऊ. स्वामी विवेकानंद म्हणत की प्रत्येक घरात अशी एक खोली असावी की जेथे पावित्र्य असावे. त्या खोलीत साधन करावे. वाईट विचार मनात येतील तेव्हां आपण देखील त्या खोलीत जाऊ नये. पुण्यामुंबईत हे शक्य नाही म्हणून अपवित्र विचारांना मनातूनच हद्दपार करावे लागेल. त्यासाठी अखंड नामस्मरणाचा अभ्यास केला पाहिजे.

## |३०१| (१५ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य षष्ठी. उत्सवाचा सहाव्या दिवस

पू. बाबा (मांडव्याचे श्री. देशपांडे यांना) आज काय शंका आहे?

**श्री. देशपांडे :** अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणात एक ओवी आहे. तिचा अर्थ नीट समजत नाही. ओवी अशी :

सर्व शून्याचा निष्कर्षु। जिया बाईला केला पुरुषु।
जेणें दादुलेनि सत्ताविशेषु। शक्ति जाली॥ २७॥

ओवीचा भावार्थ असा की सत्तामात्राचे सार म्हणजे शक्तीने शिवाला बाईलवेडा (पति) केले आणि त्याच्या अनुमोदनाने विश्वाची निर्मिती केली.

दुसरी शंका गीतेतील 'सर्वधर्मान् परित्यज मामेकं शरणं व्रज' या श्लोकातील सर्वधर्मान् चा अर्थ काय?

**पू. बाबा :** येथे सर्वधर्मान्चा अर्थ सर्व मानवी कल्पना असा आहे. सर्व मानवी कल्पना - अगदी ईश्वरासंबंधीच्याही - सोडून मला शरण ये - असा आहे कारण मानवी कल्पनांनी अथवा बुद्धीने भगवंत जाणता येणार नाही. 'यो बुद्धेः परतस्तु सः।' स्पिनोझाने मोठे छान वर्णन केले आहे. तो म्हणतो A Finite can never think of Infinite. To try to understand Infinite is like trying to find in a dark room, a black cat, which is not there ! भगवंत बुद्धीने साध्य होणार नाही. भावनेने, प्रेमानेच तो साध्य होईल. जे असीम आहे ते बुद्धीच्या सीमेत कसे सामावेल.

**श्री. देशपांडे :** सूफी अवलियाची एक गोष्ट आहे. हा अवलिया एका ठिकाणी फार तर तीन-चार दिवस राहत असे. असाच तो एका गावी जाऊन वडाच्या पारावर बसलेला असतांना तेथे एक तरुण गवळण दूध विकायला आली. तिने दूध विकले; मात्र एक तरुण आला होता त्याला न मापताच दूध दिले. तो तरुणही पैसे न देता निघून गेला. दुसऱ्या आणि तिसऱ्या दिवशीही असेच घडले. त्या अवलियाने हे पाहिले होते. त्याने गवळणीला पैसे न घेता त्या तरुणाला दूध देण्याचे कारण विचारले तेव्हां ती म्हणाली की प्रेमात मोजदाद नसते. हे ऐकून तो अवलिया स्वत:शीच म्हणाला की मी अल्लावर प्रेम करतो म्हणतो आणि जप मोजतो. खरोखर जप मोजण्याची ही माळ मी स्वत:जवळ उगीचच बाळगली आहे.

नंतर चर्चा साधन कसे वाढेल, भगवंताचे प्रेम कसे निर्माण होईल. श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची आणि नामाच्या सत्यतेची जाणीव कशी वाढेल इत्यादी विषयांवर झाली. चर्चेचा समारोप करतांना पू. बाबा म्हणाले तुलसीदासांना रामाशिवाय दुसरे काही सुचत नव्हते. कवितावली, दोहावली, विनय पत्रिका, पदावली, रामचरित मानस इत्यादी सर्वांमधे त्यांनी रामकथा गाइली आहे. त्यांच्यासारखे सर्व बाबतीत आपल्या गुरूंबद्दल झाले पाहिजे. ज्ञानेश्वर महाराज आणि एकनाथ महाराज यांनी गुरुभक्तीचे जे रसाळ वर्णन केले आहे त्याचे चिंतन, मनन करावे. आपल्या जीवनात घडणाऱ्या सर्व गोष्टी - अगदी लहान सहान देखील - त्यांच्या कानावर घालाव्या, या बाबतीत श्री. भाऊसाहेब (केतकर) आपले आदर्श आहेत.

## |३०२| (१७ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य अष्टमी शके १९१४.

सकाळी निरूपणानंतर बोलतांना पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांनी नाम दिले ते आपण घेतो. ब्रह्मानंद महाराज म्हणत की श्रीमहाराजांनी दिलेले नाम म्हणजे श्रीमहाराजांचाच आवाज आहे.

परवा मांडव्याचे श्री. देशपांडे यांनी अमृतानुभवातील एका ओवीचा (पहा. संवाद क्र. ३०१) अर्थ विचारला होता. संध्याकाळी पू. बाबांनी अर्थ सांगितला. ते म्हणाले, या जगात सर्वत्र शक्तीचा खेळ दिसतो. ती शक्तीच जगाची निर्मिती करते. ईश्वराची निर्मिती देखील तिनेच केलेली आहे. शिव आणि शक्ति भिन्न नाहीतच. Passive (स्तब्ध) शिवच जेव्हां active

(क्रियाशील) होतो तेव्हां ती शक्ती होते. शिवाच्या अनुमोदनाने ती विश्व निर्मिते. सीतेनेच अवतारी रामाला निर्माण केले. त्या अर्थाने 'बाईला केला पुरुषु.' 'रामो न गच्छति न तिष्ठति नानुशोचत्याकाङ्क्षते त्यजति नो न करोति किञ्चित्।' असे अध्यात्म रामायणात म्हटले आहे.

अन्य चर्चा चालू असतांना साधक ब म्हणाले की एकांतात गेल्याखेरीज खरे साधन होणार नाही म्हणून एकांतात गेले पाहिजे.

**पू. बाबा** : प्रपंचात राहूनच एकांत साधला पाहिजे. (साधक घ ना) तुम्ही दोन महिने एकांतात गेला होता ना? तुमचा अनुभव सांगा.

**साधक घ** : एकांतात गेल्यावर सुरुवातीला सर्व वासना उफाळून आल्या पण मग त्यांचा उपशम झाला आणि साधन चांगले झाले.

**साधक ब** : व्यवहारात आपण एकांतात असतो पण लहान सहान गोष्टीत देखील श्रीमहाराजांचा हात आहे हे आपण विसरतो. माझी एकांताची कल्पना थोडी वेगळी आहे. दोन-तीन समविचारी आणि साधन करणारी माणसे महिनाभर एकांतात गेली तर ब्रेन स्टॉर्मिंग होईल आणि मग व्यवहारात परत आल्यावरही आपण श्रीमहाराजांचे आहोत हा भाव खोल जाईल.

**साधक प** : एकांतात गेला की माणसाला आपल्या आत काय काय दडलेले आहे ते समजून येईल. एरवी व्यवहारात ते वर येऊ लागले तर आपण ते आत दडपून टाकतो.

**पू. बाबा** : माणूस एकांतात गेला तर परत आल्यावर त्याचे नातेवाइकांशी पूर्वीसारखे संबंध राहातील असे सांगता येत नाही. श्रीमहाराज म्हणत की माझ्या माणसाने प्रपंचाची हेळसांड करता कामा नये. तेव्हां एकांतात जाण्यापेक्षा प्रपंचात राहूनच परमार्थ करता आला पाहिजे. श्रीमहाराजांनी आणि समर्थांनी यावर भर दिला आहे. प्रपंचात स्मरण राहणे कठीण जाते. अस्तित्व भावना टिकत नाही. पण याला ज्ञानमार्गापेक्षा भक्तिमार्गाने जाणे हाच उपाय आहे. माझ्या संसारात जे काही घडते आहे ते त्यांच्या इच्छेने घडते आहे. ते करतात ते माझ्या हिताचे असते; ते माझे कुटुंब प्रमुख आहेत असे मनावर ठसवावे आणि प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करण्याचा अभ्यास करावा. सत्संगतीने साधन सोपे होते हे खरे, पण ती नेहमीच मिळणे शक्य नाही. गोंदवल्यासारख्या ठिकाणी वरच्यावर येणे शक्य नाही. आणि वरच्यावर आलो तर कदाचित आजचा भाव टिकणार नाही. ते रूटीन होईल. म्हणून ज्ञानेश्वरी, दासबोध, नाथभागवत, श्रीमहाराजांचे चरित्र यांसारख्या ग्रंथांचे, हे माझ्यासाठी सांगितलेले आहे अशा श्रद्धेने वाचन, मनन, चिंतन करावे.

श्रीमहाराजांची आठवण एकसारखी जागृत ठेवावी. त्यांना नामात पाहण्याचा अभ्यास करावा.

**।३०३।** (१८ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य नवमी शके १९१४ पुण्यतिथी उत्सवाचा नववा दिवस.

संध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो. त्यांना थोडा थकवा वाटतो आहे. घसाही बसला आहे.

**पू. बाबा :** आज तुम्हीच चर्चा करा. आपण नेहमी 'राम इच्छा,' राम कर्ता असे म्हणतो, त्याचा अर्थ काय?

मांडव्याचे श्री. देशपांडे म्हणाले की मी कर्म करतो आणि ते करण्याची मला इच्छा होते याचे कारण ईश्वराने संकल्प केला आणि जग निर्माण केले येथपर्यंत मागे जाते. तथापि माझी इच्छा आणि माझे कर्तेपण हे जीवाचे अंशरूपाने आलेले कर्तेपण आहे. ते अज्ञानातून आलेले असल्यामुळे अपूर्ण आहे. हे जाणणे म्हणजे अंशाचा संकल्प आणि कर्तेपण जाणणे आहे.

**साधक ग :** आजचा 'मी' हा देहबुद्धीचा आहे. माझी इच्छा किंवा वासना ह्या मी चे कारण आहे. त्या वासना पूर्ण करण्यासाठी मी जे कार्य करतो त्यात काही वेळा तरी मी ठरवतो त्याप्रमाणे घडते. त्यामुळे माझे कर्तेपण मला खरे वाटते. तथापि जेव्हां त्या कर्तेपणाचा अपुरेपणा जाणवू लागतो त्यावेळी काही मर्यादेपर्यंत मी कर्ता आणि त्याच्या पलीकडे राम कर्ता असे वाटू लागते.

**साधक प :** कर्तेपणा हे साहजिक रूप आहे.

**एक साधक :** कित्येकदा आपण ठरवतो त्यापेक्षा वेगळे घडते म्हणून जे घडेल ती राम इच्छा म्हणावे लागते.

**साधक ब :** नव्वद टक्के गोष्टींत मी प्रयत्न करतो आणि त्याचे अपेक्षित परिणाम मला मिळतात. त्यात एक प्रकारचा Sense of achievement असतो. असे असतांना राम कर्ता हे कसे पटावे?

**एक साधक :** जे काही घडते ते प्रारब्धानुसार घडते. म्हणून राम कर्ता, राम इच्छा यांमध्ये न गुंतता प्रारब्धावर श्रद्धा ठेवावी म्हणजे घडेल त्याचे सुखदु:ख होणार नाही.

**साधक ब :** सुख दु:ख होणार नाही हे खरे नाही. प्रारब्धाचा सिद्धान्त ज्याला खरोखर पटला त्याच्या हातून वाईट कर्म घडणारच नाही.

**साधक ग :** प्रारब्धाचा सिद्धान्त पटणे कठीण आहे. तो ज्ञानमार्ग आहे. त्यापेक्षा राम कर्ता, राम इच्छा हे समजायला आणि आचरणात आणायला सोपे आहे. अर्थात तसे ते सोपे नाहीच. जोपर्यंत मी कर्ता हा भाव जाणार नाही तोपर्यंत राम कर्ता हे खरे खरे पटून माणूस निश्चिंत होणार नाही. मी कर्ताच्या मुळाशी अहंकार आहे, तो गेला पाहिजे.

### **।३०४।** (१९ डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य दशमी शके १९१४ उत्सवाचा दहावा-पुण्यतिथी दिवस.

संध्याकाळी पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हां त्यांनी काही जुन्या गोष्टी सांगितल्या.

पू. बाबांच्या मनात दुसऱ्या एका साधक गृहस्थांबद्दल द्वेष होता. एक दिवस मानसपूजा करतांना त्यांना श्रीमहाराजांच्या अंगावर फोड दिसले. नंतर त्याबद्दल त्यांनी श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, तुम्ही त्या गृहस्थांचा द्वेष करता त्यामुळे हे असे झाले. दुसऱ्या दिवशी पू. बाबा त्या गृहस्थांच्या घरी जाऊन त्यांची क्षमा मागून आले तेव्हां त्यांना बरे वाटले.

**साधक प :** साधनात नाम वाट दाखवते ते असे.

**पू. बाबा :** अहंकार हे देहबुद्धीचे लक्षण आहे; इतकेच नव्हे, तर अहंकाराखेरीज व्यवहार होणार नाही असे आपणास वाटते. पण आपण विचार करावा. एकदा श्रीमहाराजांनी विचारले, तुम्ही जेवता तेव्हां मी हाताने तोंडात घास घालतो म्हणता पण पॅरलिसिस होऊन हात लुळा पडला तर म्हणता की हातातली शक्ती गेली. मग शक्तीच सर्व काही करते आहे हे कां ध्यानात घेत नाही? ज्याला आपल्या जीवनात शक्ती सर्व काही करते हे समजले त्याचा अहंकार नाहीसा होईल आणि मग ती शक्ती अथवा राम कर्ता आहे हे खरे खरे जाणवेल.

आणखी एकदा श्रीमहाराजांनी विचारले, तुम्ही रोज सकाळी दाढी करता ना? मी म्हणालो, होय, एक दिवसाआड करतो. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, दाढी करतांना आरशात पाहता तेव्हां तुमच्या डोळ्यातून कोण पाहतो याचा कधी विचार केला आहे काय? तो जो पाहणारा आहे तो देहाहून वेगळाच आहे. (पहा अध्यात्म संवाद भाग २, संवाद २२०). तसेच झोप लागते म्हणजे काय जाते आणि जाग येते म्हणजे काय येते याचा विचार केला तरी मी माझे कर्तृत्व म्हणतो ते किती तकलादू आहे हे लक्षात येईल आणि मग राम कर्ताचा खरा अर्थ कळेल.

**साधक प :** हे कळण्यासाठी त्याचे विस्मरण होऊ न देणे, म्हणजे तो एकसारखा माझ्या बरोबर आहे, माझा अंतर्यामी आहे हे मनाला शिकवले पाहिजे.

**पू. बाबा :** मी कसाही असलो तरी तुमचा आहे, तुम्ही मला अंतर देऊ नका. मी पदोपदी तुम्हांला विसरतो पण मला सांभाळून घ्या अशी प्रार्थना करावी. त्यांना एकसारखे बरोबर ठेवावे. त्यांची संगत वाटली पाहिजे; आणि ते नामात आहेत म्हणून नामाची संगत पाहिजे. प्रत्येक गोष्ट - अगदी लहान सहान देखील - त्यांच्या कानावर घालून करायचा अभ्यास केला तर खात्रीने त्यांचे अस्तित्व जाणवू लागेल.

**।३०५।** (२० डिसेंबर १९९२)

मार्गशीर्ष वद्य एकादशी शके १९१४.

सकाळी नऊ वाजता आम्ही पू. बाबांकडे गेलो. ते खूप प्रसन्न दिसत आहेत.

**पू. बाबा :** भगवंताचे अस्तित्व मानणे किंवा राम कर्ता म्हणणे याचा अर्थ तो माझा रक्षणकर्ता आहे, पालनकर्ता आहे हा होय. नामस्मरण करतांना हा अर्थ प्रतीत झाला पाहिजे. नामाला ह्या अर्थाची जोड दिली पाहिजे. आपले अस्तित्व आणि श्रीमहाराजांचे अस्तित्व यातला हा फरक आहे. हा dimensional difference आहे. माझे अस्तित्व भ्रामक आहे तर त्यांचे अस्तित्व व्यापक आहे. तेच अस्तित्व खरे आहे. नामाच्या साधनाने त्या अस्तित्वापर्यंत पोचता येते. नाम अर्थरूप आहे आणि या अर्थानेच 'मला नामात पहा' असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. नामस्मरण करता करता आपले अस्तित्व त्यांच्या अस्तित्वाने भरून टाकले पाहिजे. असे करता करता त्या गोपींसारखी स्थिती होईल. "हृदयमें न जाने। प्राण है कि कान्ह है।" वाणी आणि तिचा अर्थ एक होण्यासाठी नामस्मरणाचा अभ्यास पाहिजे.

पू. बाबांचे बोलणे चालू असतांना दोघे गृहस्थ त्यांना भेटायला आले. त्यांनी पू. बाबांना त्यांच्या साताऱ्याच्या कॉम्प्यूटर इन्स्टिट्यूटमध्ये या अशी गळ घातली; तथापि पू. बाबांनी त्यांना नकार दिला. ते दोघे गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले, लौकिकाला (म्हणजे लौकिकापासून, प्रसिद्धीपासून) फार जपले पाहिजे. खरे सांगतो, श्रीमहाराजांनी सांगितले आहे म्हणून नव्हे तर आतूनच मला आता कोठे जावेसे वाटत नाही. लौकिकात गुंतून आपली शक्ती वाया जाते.

नुकतेच श्रीपादला (प्रा. दादा बेलसरे) कॉलेजच्या ॲडमिशन्सच्या संदर्भात शिक्षण मंत्र्यांनी बोलावले होते. त्यांचे झालेले बोलणे त्याने मला सांगितले. नेहमीच तो सगळ्या गोष्टी मला सांगतो तसेच हेही सांगितले. दुसऱ्या दिवशी पहाटे मानसपूजेला बसलो आणि श्रीमहाराजांच्या ऐवजी तो मंत्री समोर आला आणि मला वाटले की आता डोके फोडून घ्यावे आणि रडू आले. मी उठून पुन्हा आंघोळ केली आणि परत मानसपूजेला बसलो. इतके आपण प्रपंचात गुंततो आणि आपली शक्ती पदोपदी खर्च होते. त्या दृष्टीने ब्रह्मानंद महाराज माझे आदर्श आहेत. कोरेगावहून पायात काही न घालता ते चालत येत आणि श्रीमहाराजांचे दर्शन होईपर्यंत पाणी देखील पीत नसत! याउलट स्वत:च्या गाडीने पुण्याहून येतांना साताऱ्याला पोचताच लोक हॉटेलात खायला जातात! कसे साधन व्हायचे? साधनात अति सावधानता पाहिजे. त्याखेरीज मनाला येणारी सूक्ष्मता कशी टिकायची?

साधक प यांनी नुकतीच घडलेली एक हकिगत सांगितली. साधक ब यांच्या पत्नी उत्सवासाठी दि. १७ ला गोंदवल्याला आल्या. त्यानंतर आमची खोलीमध्ये नामस्मरणाच्या पातळीच्या किंवा सूक्ष्मतेच्या संदर्भात चर्चा चालू होती. साधक प साधक ब यांच्या पत्नीला म्हणाले की तुम्ही येथे उशीरा आलात पण आम्हांला तुमची आठवण होत होती. ह्या आमच्या आठवण होण्याला महत्त्व आहेच पण त्यापेक्षाही साधक ब ना तुमची आठवण होत होती याचे जसे तुम्हांला जास्त महत्त्व वाटते तसे मुमुक्षूचे नामस्मरण आणि साधकाचे नामस्मरण यात फरक आहे. साधकाला भगवंताचे स्मरण झाले की भगवंतालाही त्या साधकाचे स्मरण होणारच!

ही हकिगत ऐकून पू. बाबा उद्‌गारले, "बाळ, कसं सुचतं तुला हे!" पू. बाबांनीही मग एक हकिगत सांगितली. एकाचे नुकतेच लग्न झाले होते. जास्त रजा नसल्याने लग्नानंतर दोन दिवसांनी तो कामावर जाऊ लागला. एक दिवस संध्याकाळी घरी आल्यावर बायको दिसली नाही तेव्हा तो आईला म्हणाला, 'आज घरात कोणी दिसत नाही.' वास्तविक इतर सगळी माणसे घरात असूनही बायको नाही म्हणजे कोणी नाही असे त्याला वाटले; तसे बाकी सगळे असूनही त्यात श्रीमहाराज नसले तर काही नाही असे झाले पाहिजे.

साधक ग सकाळी पू. बाबांकडे गेले होते तेव्हां गोंदवल्याला नेहमी येणारे एक गृहस्थ पू. बाबांना भेटायला आले होते. आता सेवानिवृत्तीनंतर त्यांनी गोंदवल्याला राहायला यावयाचे ठरवले आहे. ते म्हणाले की गोंदवल्याला

यावयाला लागल्यापासून त्यांच्यामधे खूप बदल झाला. येथेच राहायला यावयाचे ठरवल्यानंतर पुष्कळ वर्षात ज्या नातेवाइकांना भेटलो नव्हतो आणि ज्यांच्याशी बरे नव्हते त्या सर्वांची यादी तयार केली आणि त्या सर्वांकडे स्वत: जाऊन भेटून, बोलून संबंध पुन्हा चांगले करून आलो. ते म्हणाले, मला वाटू लागले की पूर्वीचे ते ताणतणाव तसेच ठेवले तर मृत्यूच्या वेळी नामाची आठवण राहाण्याऐवजी ते वैर आणि भांडणेच आठवायची!

पू. बाबांना नमस्कार करून आम्ही उठलो. साधक ब त्यांच्या पाया पडले तेव्हां पू. बाबा म्हणाले की आमचे सगळे तुम्ही काढून घेता. यावर साधक ब म्हणाले, ते न संपणारे आहे कारण ते श्रीमहाराजांकडून येते आहे. श्रीरामकृष्ण म्हणाले की आई ज्ञानाच्या राशीच्या राशी आणून ओतत होती; तसे हे आहे. म्हणून आपल्या पाया पडायचा आमचा अधिकार आहे.

संध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हां तेथे खूप मंडळी बसलेली होती. पू. बाबा म्हणाले, काल उत्सव संपला. तेव्हां आता विशेष कोणी येईलसे वाटले नव्हते; पण तुम्ही सर्वजण जमला आहात. मी तुम्हांला विचारतो की वर्षानुवर्षे आपण येथे उत्सवाला येतो. आपण का येतो आणि ज्याच्यासाठी येतो ते मिळते का यावर आपण विचार केला आहे का?

**डॉ. आठवले :** मी येतो तो मुख्यत: सैपाकघरात आणि वाढपाचे काम करणारी पुष्कळशी माणसे म्हातारी झाली आहेत त्यांना मदत करावी म्हणून येतो. त्यातच तुमच्या निरूपणांचाही लाभ होतो.

**पू. बाबा :** लोकांना मदत एखाद्या राजकीय कॉन्फरन्सला गेलात तरी होऊ शकेल. त्यासाठी इथं कशाला यायला हवं? आपण येतो ते श्रीमहाराजांकडे येतो. त्यांची आपल्याकडून काय अपेक्षा आहे ते नको का पहायला?

**साधक ग :** मी दरवर्षी येतो पण मला नेमके काय पाहिजे ते समजत नाही. समजा, श्रीमहाराज येऊन पुढे उभे राहिले आणि त्यांनी विचारले की तुला काय पाहिजे तर नेमके उत्तर देता येणार नाही. त्या लाकूडतोड्यासारखीच स्थिती होईल. माझ्या कल्याणाचे असेल ते करा असेच म्हणावे लागेल, कारण माझे कल्याण कशात आहे ते मला माहीत नाही.

**साधक ब :** तसे नाही; श्रीमहाराजांनी विचारले तर मी निश्चित सांगेन की मला नामाचे प्रेम द्या.

**डॉ. आठवले :** येथे आले की समाधान वाटते; पण खरे समाधान किंवा शांती याची आम्हांला कल्पनाच नाही.

**साधक प** : समाधान म्हणजे काय हे माहीत नसले तरी येथे येणाऱ्या प्रत्येकाला त्याचा निश्चित स्पर्श होतो. नाहीतर तो वरचेवर आलाच नसता.

**राघवेंद्रस्वामी** : तो काहीसा relaxed होतो.

**साधक म** : एखाद्या सहलीला गेले तरी माणूस relaxed असतो. त्यासाठी इथे कशाला यायचे ?

**पू. बाबा** : relaxation मधे देखील फरक असावा. इथे आल्यावर तात्पुरते का होईना, माणूस सर्व बाजूंनी मोकळा होतो. आपण वरच्यावर येथे येतो त्याचा परिणाम म्हणजे श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची भावना जागी झाली पाहिजे. ते आहेत, माझ्याकडे पाहात आहेत असे जाणवले पाहिजे. येथे आल्यावर प्रत्येकाला शांतीचा अनुभव येतो, यात संशय नाही.

**साधक ग** : आपण तीन प्रकारची शांती सांगितली होती. त्यापैकी उन्हाने तापलेला दगड गंगेत पडला की थंड होतो तशी आमची शांती असते. ती शांती आतमधे शिरत नाही.

**साधक ब** : किती छान उदाहरणे श्रीमहाराजांनी दिली आहेत.

**पू. बाबा** : दुसरी शांती भिजलेल्या धोतराची. त्यात आतबाहेर पाणी असते पण ते वेगळे राहाते. आणि तिसरी शांती खडीसाखरेची. ती वेगळी राहात नाही. पाणी गोड होते.

**डॉ. आठवले** : म्हणजे कोणासारखी म्हणता येईल ?

**पू. बाबा** : ब्रह्मानंद महाराज, आनंदसागर होतेच. पण भाऊसाहेबांची श्रीमहाराजांशी भेट झाली आणि श्रीमहाराजांनी आजपासून तुमचा संसार माझा झाला म्हटल्यावर ते श्रीमहाराजांशी समरस झाले. ब्रह्मानंद महाराज श्रीमहाराजांसमोर बसत नसत. जी, म्हणून हात जोडून पुढे उभे राहात. त्यामुळे त्यांना काही बोलता येत नाही असे श्रीमहाराज म्हणत. याच्या उलट, इतरांशी, भाऊसाहेबांशी देखील श्रीमहाराज हसून खेळून असत. एकदा भाऊसाहेब श्रीमहाराजांशेजारी जेवायला बसलेले असतांना ब्रह्मानंद महाराजांनी, नको नको म्हणत असतांनाच भाऊसाहेबांच्या पानात आग्रहाने तीन-चार कडबू वाढले. ते पाहून श्रीमहाराज, भाऊसाहेबांच्या कानाला लागून म्हणाले, भाऊसाहेब, मला उष्टं चालतं आणि भाऊसाहेबांच्या पानातले दोन कडबू त्यांनी घेतले. त्यांनी नंतर ते इतरांना वाटून टाकले ती गोष्ट वेगळी! पण असे प्रेम!

**साधक ग** : आपण सांगितलेली सख्यभक्ती ती ही! भगवंत झाला तरी त्याला सखा पाहिजे असतो. संत म्हणजे तर divine असतात आणि human ही असतात.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणत की अर्जुनाने जसे आपल्या रथाच्या घोड्यांचे लगाम कृष्णाच्या हाती दिले तसे आपल्या जीवनाचे लगाम सद्गुरूंच्या हाती द्यावे. ते करतील ते! सद्गुरु काय किंवा भगवंत काय ते कधी वाईट करणारच नाहीत. ज्याने अर्जुनाला येवढ्या रणांगणात सुरक्षित ठेवले त्याला तुमचा दरिद्री संसार का सांभाळता येणार नाही? पण निष्ठा पाहिजे. दिलं तुला असं वाटलं पाहिजे. आणि हे देणं मनाचंच आहे.

**साधक ग :** मला वाटतं, म्हणूनच ते कठीण आहे. एखादी वस्तू उचलून दुसऱ्याला देता येते. तो व्यवहार आपल्याला समजतो. पण सूक्ष्मातले देणे कठीण आहे.

**पू. बाबा :** काही नाही, विश्वास ठेवून हे केलं पाहिजे. Now it is high time! त्यांच्याजवळ जाऊन मागावं. म्हणावं फार उशीर झाला. आता मला आपला म्हणा. त्यांनी, मला नामात पहा म्हटलं आहे; ते मला द्या म्हणावं. मला नामात तुमचं दर्शन होऊ दे. पाहिजे तर त्यांच्या पायांशी रडावं. तळमळून मागितलं तर ते खात्रीनं देतील. आज इतकी वर्षं त्यांची सत्ता अबाधितपणे काम करते आहे. किती लोक त्यांचे अनुभव सांगतात! त्यांना आपल्याबरोबर घरी घेऊन जा. नामात रमायला शिका म्हणजे उत्सवाला आल्याचं सार्थक होईल. त्यांची कृपा आहेच. त्याबद्दल संशय बाळगू नका. श्रीमहाराजांनी लहान मोठा असा कधीही भेद केला नाही.

**साधक ग :** यावरून आठवलं. आपण श्रीमहाराजांच्या चरित्रात श्रीमहाराजांजवळच्या काही माणसांची माहिती दिली आहे. त्या माहितीत काही स्त्रिया म्हणून एक परिच्छेद आहे. सौ. काशीताई म्हणजे भाऊसाहेबांच्या पत्नी एकदा श्रीमहाराजांना म्हणाल्या की महाराज! आपण निरूपण करता तेव्हां कित्येकदा माझं तिकडं लक्ष नसतं आणि मला त्यातलं विशेष काही कळतही नाही. पण निरूपण करतांनाचं आपल्या चेहेऱ्यावरचं तेज पाहून मला आनंदानं रडूं येतं. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, खरं आहे बाई! निरूपण विकल्प असणारांसाठी असतं!

**पू. बाबा :** होय हो; किती अलौकिक चरित्र होतं त्यांचं म्हणून सांगू! काय खुबी असे त्यांच्या वागण्यात! पानं वाढलेली असत, सगळी माणसं पानांवर बसलेली असत आणि महाराज इकडं तिकडं वेळ काढून सगळं अन्न गार झालं की जेवायला बसत. कधी लोकांना गरम अन्न खायला मिळायचं नाही, अशी लोकांची अन्नासंबंधीची आसक्ती त्यांनी कमी केली.

दुसरी एक गंमत सांगतो. श्री. भाऊसाहेबांनी श्रीमहाराजांकडे येण्यापूर्वी एकाकडून अनुग्रह घेतला होता. त्याचं असं झालं की ते गदगला असतांना घरी कुणाचं तरी श्राद्ध होतं. श्राद्धानंतर, श्राद्धासाठी आलेल्या एका भटजींनी भाऊसाहेबांना विचारले की तुम्ही कोणाचा अनुग्रह घेतला आहे का? ते नाही म्हणाले तेव्हां ते भटजी म्हणाले की मी तुम्हांला अनुग्रह देतो. हे ठीक आहे म्हणाले आणि त्यांनी अनुग्रह घेतला. पुढे श्रीमहाराज भाऊसाहेबांना म्हणाले की मी तुम्हांला अनुग्रह देतो पण पूर्वी तुम्ही कुणाचा अनुग्रह घेतला आहे का? भाऊसाहेबांनी हो म्हणून सांगितले. श्रीमहाराज म्हणाले त्यांना जाऊन सांगा की मी अनुग्रह देणार आहे, तेव्हां त्यांची परवानगी असावी. भाऊसाहेब त्या भटजींना भेटले. ते भटजीही म्हणाले की ते (श्रीमहाराज) माझ्यापेक्षा मोठे आहेत; आपण त्यांचा अनुग्रह घ्यावा. पुढे भाऊसाहेबांनी ही हकिगत जेव्हां मला सांगितली तेव्हां मी त्यांना विचारले की त्या भटजींना विचारायला जायला तुम्हांला अवघड नाही कां वाटले? ते म्हणाले, त्यात अवघड काय वाटायचे? श्रीमहाराजांनी विचारा म्हणून सांगितले, तेव्हां सगळी जबाबदारी त्यांची. असा अति सरळ स्वभाव होता त्यांचा! श्रीमहाराजही गंमत करीत. एकदा भाऊसाहेबांना म्हणाले, दमलो बुवा! हे लोक माझी सेवा करायला म्हणून येतात आणि मलाच त्यांची सेवा करावी लागते! भाऊसाहेब गेले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, भाऊसाहेबांनी मला ऋणी केले! (श्री. भाऊसाहेबांच्या आठवणी सांगतांना पू. बाबांचा घसा वरचेवर दाटून येत होता.)

**साधक ग** : ते नाही कां; माझी मुलं उद्या गावाला जायची आहेत म्हणून पाणी मागून आणलं!

**पू. बाबा** : होय; पाणी मागून आणलं आणि महाराजांनी पिठलं-भात करून त्यांना जेवायला वाढलं. खरोखर आई-बाप देखील आपल्या मुलांचं इतकं प्रेमानं करणार नाहीत.

**डॉ. आठवले** : प्रेम आहेच. पण गुरु ज्यांना आपलं म्हटलं त्यांचं रक्षण कसं करतात यासंबंधी रमण महर्षींच्या दोन गोष्टी आठवल्या त्या सांगतो.

१) एका नवविवाहित तरुणाची बंगलोरला बदली झाली. त्याची बायको भगवानांची (रमण महर्षी) भक्त होती. बंगलोरला त्यांना पहिल्या मजल्यावर राहायला जागा मिळाली. नळाचे पाणी खालून पहिल्या मजल्यावर न्यावे लागत असे. त्याची आई म्हातारी होती आणि पाण्याच्या वेळा अशा होत्या की त्यावेळी तो नोकरीवर गेलेला असत असे. परिस्थिती बेताची असल्याने

त्याच्या बायकोला पाणी भरावे लागे. पुढे ती गरोदर असतांना तिला पाणी भरणे अवघड होऊ लागले. एक दिवस अतिशय आर्ततेने तिने भगवानांच्या स्तुतीचे एक पद म्हटले आणि त्यावेळी नळाला पाणी येण्याची नेहमीची वेळ नसूनही नळाला पाणी आले! पुढे नवरा घरी असतांना तिने स्तोत्र म्हणावे व नळाला पाणी येऊन ते नवऱ्याने भरावे असा प्रकार सुरू झाला. पुढे तिची अडचण संपल्यानंतर हा प्रकार बंद झाला. रमण महर्षींना ही हकिगत सांगितल्यावर ते हे सहज शक्य आहे येवढेच म्हणाले.

२) रमणाश्रमाच्या सुरुवातीस केवळ चार-पाच झोपड्या होत्या. गवतानेच शाकारलेल्या असत. त्यावेळी पार्थसारथी नांवाचा एक तरुण भगवानांजवळ होता. भगवान एका झोपडीत रहात आणि बाकीची मंडळी उरलेल्या झोपड्यांतून रहात असत. एके रात्री हा तरुण झोपलेला असतांना त्याच्या झोपडीचे दार उघडले गेले आणि त्याच्या डोळ्यांवर टॉर्चचा झोत आला. त्या झोतात टॉर्च कोणी धरला आहे ते त्याला दिसले नाही. पण तो उठून बसताच त्याच्या उशीवरून तो प्रकाशझोत फिरला. मग त्याला दिसले की भगवान टॉर्च फिरवताहेत. त्या प्रकाशात त्याच्या उशीखालून एक मोठा नाग बाहेर आला आणि झोपडीच्या बाहेर गेला. तो बाहेर जाताच भगवान त्याला आता झोप म्हणाले आणि त्यांच्या झोपडीकडे गेले.

पू. बाबांनीही मग दोन जुन्या हकिगती सांगितल्या.

१) पंढरपूरजवळ इंदापूर म्हणून एक गाव आहे. तेथे एका घराण्यात सात पिढ्या वारकरी झाले. त्यापैकी सातव्या पिढीतील वारकरी म्हातारपणी आंधळे झाले. एक दिवस त्यांची सून त्यांना शौचाला बसवून नदीवर गेली आणि इतर बायकांशी बोलतांना त्यांना शौचाला बसवून आल्याचे विसरली. ते तिची वाट पाहून कसे तरी घरी गेले, पाय धुवायला सुनेकडे पाणी मागितले आणि पाय धुवून घरात जाऊन बसले. थोड्या वेळाने सून घरी आली आणि पहाते तों सासरा पाय धुवून घरात बसलेला. तिने विचारले, मामंजी, पाय धुवायला पाणी कोणी दिले? ते म्हणाले, तूच तर दिलेस. ती चपापली व म्हणाली, मी घरी नव्हते. आत्ताच नदीवरून आले. हे ऐकताच त्या गृहस्थांच्या डोळ्यात पाणी आले. ते उठले आणि घरात विठ्ठल रखुमाईच्या मूर्ती होत्या त्या चाचपून पाहू लागले तर रखुमाईच्या लुगड्याचे ओचे भिजलेले होते.

२) आमच्या (पू. बाबांच्या) वडिलांची आत्या योगमार्गी होती. ती म्हातारी झाल्यावर आमच्या आजीने तिची खूप सेवा केली. ती जेवायला बसली की,

'मेल्या ओंक्या ये' म्हणत असे. तिला आमच्या वडिलांनी विचारले की तू हे काय म्हणतेस? ती म्हणाली, आत तो ओंकार आहे ना, त्याला आहुती देते. पुढे ती आसन्नमरण असतांना वडिलांना म्हणाली, तुला काही कमी पडणार नाही. आमचे वडील त्यावेळी एका कापडाच्या दुकानात नोकरीला होते. सात रुपये पगार होता. पुढे सरकारी नोकरी मिळाली, बढत्या मिळत गेल्या आणि त्यांची भरभराट झाली. 'मेल्या ओंक्या'वरून आठवले, स्वामी रामतीर्थही गंगा नदीस मोठ्या प्रेमाने 'प्यारी गंगी' म्हणत असत.

## |३०६| (१ जानेवारी १९९३)

आम्ही मालाडला गेलो तेव्हां रविवारच्या निरूपणाला येणारे एक गृहस्थ आणि त्यांची मुलगी पू. बाबांकडे आलेले होते. काही कौटुंबिक प्रश्नांनंतर त्यांनी पू. बाबांना विचारले की एका वेळी अर्ध्या तासापेक्षा जास्त वेळ बैठक कशी वाढवावी?

**पू. बाबा** : रोज थोडथोडी बैठक वाढवता आली तर चांगलेच; पण ह्या वयात त्याला मर्यादा राहील. म्हणून शरीराच्या बैठकीपेक्षा मनाच्या बैठकीकडे जास्त लक्ष द्यावे. अनुसंधानात राहायचा प्रयत्न करावा. ते जमू लागले की साधनातील अडचणी आपोआप दूर होतील. ग्रंथवाचन करावे, पण गुरुदेव रानड्यांनी म्हटल्याप्रमाणे when there is need Guru will help you, where Guru cannot, God will help you and where He cannot, His Name will help you. म्हणून नामाच्या संगतीत राहण्याचा प्रयत्न करावा.

त्या गृहस्थांच्या कौटुंबिक प्रश्नांच्या बाबतीत पू. बाबांनी त्यांना सल्ला दिला पण अप्रत्यक्षपणे सुचवले की गुरु यासाठी नसतात. पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की हे म्हणजे कापडाच्या दुकानात जाऊन लाकडे मागण्यासारखे आहे.

**पू. बाबा** : आपले ध्येय निश्चित होत नाही ही खरी अडचण आहे. आता माझे उरलेले जगणे केवळ नामासाठी आहे असे वाटत नाही. काही वेळा आपले नामस्मरण चांगले होते, पण पुन्हा व्यवहारात उतरलो की ते विसरते. व्यवहारातले कर्म करतांना आपण त्यात एकाग्र होतो आणि गुंतून जातो. मला आठवते, दर गुरुवारी माझे एम्. ए. च्या वर्गाला लेक्चर असायचे. त्यासाठी वेगवेगळ्या कॉलेजातली मुले यावयाची. या लेक्चरची मी अगदी कसून तयारी

करीत असे. घरी आणि कॉलेजात जातांना देखील कोणते मुद्दे सांगायचे, फळ्यावर कोणत्या क्रमाने ते लिहायचे इत्यादी उजळणी मनात चालायची. यात नाम कुठेच नसायचे. आपले लेक्चर चांगले झाले पाहिजे असे वाटायचे. तसे आता नामाचे चिंतन आणि स्मरण झाले पाहिजे. व्यवहार होईल तो होऊ दे, अशी स्थिती झाली पाहिजे. पण ती होत नाही. असे कां होते?

**साधक ब :** मला वाटते, आपणच मी असा आहे, तसा आहे, चांगला मॅनेजर आहे; चांगला प्रोफेसर आहे असे इमेज प्रोजेक्ट केलेले असते आणि त्याला आपण जपतो. ते इमेज (प्रतिमा) फोडायचे आपल्याजवळ धाडस नाही; इतकेच नव्हे तर दुसऱ्या कोणी त्याला धक्का लावलेला आपल्याला खपत नाही.

**साधक क :** या सर्वांच्या मुळाशी व्यवहार करणारा 'मी आहे' ही बुद्धी आहे. मी जर लेक्चरची तयारी केली नाही तर कसे होईल? माझ्या कामासाठी मी पैसे घेतो, तेव्हां त्यात चुकारपणा करून कसे चालेल?

**पू. बाबा :** तथापि ते करतांना नामाची आठवण कां राहू नये?

**साधक प :** व्यवहार आणि तो करतांना त्यातच नामाची आठवण या दोहोंना लागणारी शक्ती आपल्याजवळ नाही. आपली शक्ति कमी पडते.

**पू. बाबा :** पण मग ही शक्ती वाढवायचा उपाय सांगा?

**साधक क :** पहिले म्हणजे अनेक वाटांनी जो आपला शक्तिपात होतो तो थांबवला पाहिजे आणि मग शक्ती वाढवायचा प्रयत्न केला पाहिजे.

**साधक प :** प्रयत्न करून मी काही साधेन असे साधनात तरी वाटता कामा नये. व्यवहारात अहंकार पोसला जातो आणि परमार्थात तो नाहीसा करायचा आहे.

**साधक ब :** जोपर्यंत व्यवहारात मी प्रयत्न करतो, तोपर्यंत साधनातही प्रयत्न हवाच. प्रयत्न आणि प्रार्थना या दोन्ही गोष्टी पाहिजेत.

**साधक ज :** मानसपूजेत देखील श्रीमहाराजांना उत्तमात उत्तम फूल देण्याचा माझा प्रयत्न असतो कारण ते कर्म त्यांच्याकरता आहे. तशी इतर कर्मे देखील त्यांच्याकडून आली आहेत; ती त्यांचीच आहेत. म्हणून ती उत्तमात उत्तम करावी. असे करतांना एकसारखे नामस्मरण होईलच असे नाही पण सर्व कर्मांना त्यांची पार्श्वभूमी राहील.

**साधक क :** हे जमते का नाही याची खूण म्हणजे काहीही झाले तरी त्याचे सुखदु:ख होता कामा नये.

**पू. बाबा :** होय. पण व्यवहारातली कर्मे करतांना आपल्याला तसे वाटते का? हारामधे जशी सुवासिक फुले असतात, दिसायला सुंदर पण वास नसलेली फुले असतात तशी पानेही असतात. पण ती सर्व एका दोऱ्यात ओवल्यामुळे चांगला हार होतो. तशी उत्तम, दैनंदिन साधारण आणि नाइलाज म्हणून करावी लागणारी अशी सर्व कर्मे जर भगवंताच्या स्मरणात करायची कला साधली तर कामच झाले.

**साधक ग :** मला वाटते, याच अर्थाने तुकाराम महाराजांनी 'आलें भागा तें करितो। तुझें नाम उच्चारितो॥' असे म्हटले आहे. वाट्याला आलेली कर्मे करावी लागणारच. त्यातून सुटका नाही. म्हणून ती करतांना तुझे नाम उच्चारितो हे जमले पाहिजे.

**साधक क :** त्यासाठी होलिस्टिक व्ह्यू पाहिजे. आपल्याला समग्र जीवन पहाता येत नाही. जुन्या घटनांच्या बाबतीत त्या घडल्या असे वाटते; त्यांचे महत्त्वही कमी होते. पण आजच्या लहान सहान गोष्टी देखील महत्त्वाच्या वाटतात आणि मन त्यात घोटाळत राहाते.

**पू. बाबा :** गोंदवल्याला नामस्मरण चांगले होते असा आपला सगळ्यांचा अनुभव आहे. पण घरी आल्यावर ते टिकत नाही. याला काय करावे?

**साधक प :** कायम गोंदवल्याला जाऊन राहावे!

**साधक ग :** कायम गेलो तर ते कदाचित साधणारही नाही. तिथे कायम राहाणाऱ्या कितीजणांचे चांगले नामस्मरण होते?

**साधक प :** विनोद जाऊ दे; पण मला वाटते की गोंदवल्याला श्रीमहाराज आहेत असे आपल्याला केवळ वाटते असे नसून ती fact - वस्तुस्थिती आहे. याउलट आपल्या घरी श्रीमहाराज आहेत असे आपण मानतो आणि त्यामुळे एकसारखे विसरतो.

**पू. बाबा :** तुमचे हे म्हणणे अगदी बरोबर आहे. मानणे आणि वाटणे यात फरक आहे. गोंदवल्याला त्यांचे अस्तित्व वाटते म्हणजे जाणवते. तुम्ही म्हणता तशी ती fact आहे. घरी त्यांचे अस्तित्व आहे असे आपण मानतो.

**साधक ग :** गोंदवल्याला आपण श्रीमहाराजांच्या घरी आलो असे म्हणतो तर माझ्या घरी ते आहेत असे म्हणतो. अद्यापी घर माझे वाटते. श्रीमहाराजांच्या घरी मी आहे असे वाटत नाही.

**पू. बाबा :** साधक ब आपले इमेज (प्रतिमा) म्हणतात त्यावरून आत्ता मला सुचले. गोंदवल्याला निरूपण करतांना श्रीमहाराजांचे म्हणणे लोकांपर्यंत

व्यवस्थित पोचले पाहिजे. मला ते काम करायचे आहे अशी जबाबदारी वाटते. म्हणजे इमेज जपणेच आहे किंवा रविवारच्या निरूपणाआधी ज्ञानेश्वर महाराजांना नेमके काय सांगायचे असावे असे चिंतन होते. पण एरवी केव्हां तसे चिंतन होत नाही. कर्तेपण आहे तोपर्यंत त्याचे सुखदु:ख राहणारच. म्हणून कर्तेपण गेल्याखेरीज हे इमेज नाहीसे होणार नाही. भक्त यावर उपाय काढतात. ते राम इच्छा आणि राम कर्ता यावर विसंबून राहतात.

**साधक क** : जीव जगाचाच भाग आहे. या जगातच तो राहतो. पण हे विसरल्यामुळे त्याचे जीवन खंडित होते. जगात आणि म्हणून त्याच्या जीवनातही जे जे घडते ते ते राम इच्छेने घडते असे वाटू लागले की काम झाले.

**पू. बाबा** : ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे की 'जालेनि जगें मी झांकें। तरी जगत्वें कोण फांके। किळेवरी माणिकें। लोपिजे काई।। ज्ञानेश्वरी १४.१२३'.

**साधक ग** : म्हणूनच भक्त माया न म्हणता भगवंताची लीला म्हणतात.

**पू. बाबा** : आज हा मुद्दा चांगला स्पष्ट झाला. श्रीमहाराज आहेत असे नुसते वाटता कामा नये. ती वस्तुस्थिती झाली पाहिजे. पण हे कसे घडायचे ?

**साधक ड** : नामच हे घडवून आणील. नाम आणि प्रार्थना यांखेरीज आपल्या हातात काय आहे ?

**साधक ब** : सुरुवातीला तरी तो डिसिप्लिन लावून घेतलाच पाहिजे.

**साधक म** : जे नियम व्यवहारात तेच परमार्थात असे श्रीमहाराज म्हणत. जोपर्यंत व्यवहार मी करतो तोपर्यंत साधनही मीच केले पाहिजे. व्यवहार मी करणार आणि साधन मात्र त्यांनी करवून घ्यावे, म्हणजे ही लबाडी आहे.

**साधक ब** : मला हे मान्य आहे. आपण शक्य तितके साधन करावे आणि त्याला प्रार्थनेची जोड द्यावी.

**पू. बाबा** : त्या दृष्टीने मला साधक अ यांचे कौतुक वाटते. गेल्या दोन वर्षातला जपाचा हिशोब लिहून त्यांनी श्रीमहाराजांपुढे ठेवला. दोन वर्षात फक्त एकदाच त्यांचे रोजचे साधन चुकले. काही नाही; निर्धाराने केले पाहिजे. हेच एकमेव ध्येय ठरले तर ते होईल.

## |३०७| (८ जानेवारी १९९३)

दि. ६ जानेवारीला बाबरी मशीद पाडली त्या घटनेला बरोबर एक महिना झाला. आणि मुंबईत पुन्हा दंगा सुरू झाला आहे. अशा या स्थितीत आम्ही काय करावे ?

**पू. बाबा :** आवश्यक तिथे जावे लागेल, कामे करावी लागतील. पण जेथे गरज नाही तेथे उगीचच जाऊ नये असे श्रीमहाराज सांगत, ते करावे; आणि मुख्य म्हणजे या घटनांनी मनाची स्थिरता घालवू नये. कारण मग जपाकडे लक्ष लागणार नाही. इतिहास पाहिला तर लक्षात येईल की असे अस्थिरतेचे काळ अधून मधून येतातच. समर्थांच्या काळी मुसलमानी सत्ता होती आणि जीवन किती धोक्याचे होते. पण त्यात त्यांनी साधन सांभाळले, उत्साह टिकवला. दंगल कमी व्हावी म्हणून आपणाला काही करणे शक्य नसले तरी जपाला बसण्यापूर्वी निरपराधी लोकांचे रक्षण कर आणि अपराध्यांना शासन कर अशी भगवंताची प्रार्थना करावी; असो.

आज चर्चा करायचा विषय वेगळा आहे. सध्या रविवारी आपला गीतेतला 'कर्मण्येवाधिकारस्ते' हा सुप्रसिद्ध श्लोक चालू आहे. त्या श्लोकात फळाची आशा ठेवू नको म्हटले आहे. आशा म्हणजे त्यांना काय म्हणायचे आहे?

**साधक ग :** वासनेचे व्यक्त स्वरूप म्हणजे आशा असे म्हणता येईल. अमुक केले की तमुक घडते हा कार्यकारण संबंध आहे. तसेच हे मिळावे ते टळावे हेही आहे.

**साधक ड :** आशेचा संबंध भविष्यकाळाशी आहे. तिला कल्पनेचा आधार असतो.

**पू. बाबा :** बरोबर. म्हणजे आशेला काळाचे बंधन आहे. याचाच अर्थ असा की काळापलीकडे गेल्याशिवाय आशा नाहीशी होणार नाही. मग आशा सोडणे कसे शक्य आहे?

**साधक ग :** काळापलीकडे तरी जायला पाहिजे किंवा वासनाशून्य तरी झाले पाहिजे. दोन्हींचा अर्थ एकच.

**साधक ज :** आशेमध्ये अपेक्षा असते. तिला आपल्या कर्तेपणाचा आधार असतो. आणि त्यामुळे अपेक्षा ठेवतांना देखील माणूस शक्याशक्यतेचा विचार करतो.

**साधक क :** होय; उगीच कुणालाही आपण देशाचे पंतप्रधान व्हावे असे वाटत नाही.

**पू. बाबा :** हे ठीक आहे. पण निराश होणे आणि तरीही आपले कर्म करणे शक्य आहे का? भागवतात पिंगलेच्या आख्यानात सांगितले आहे

आशाहि परमं दु:खं नैराश्यं परमं सुखम्।
यथा सञ्छिद्य कान्ताशां सुखं सुष्वाप पिङ्गला॥ **- भागवत ११.८.४४**

या श्लोकावर लिहितांना नाथांनी म्हटले आहे "आशा तेथ नाहीं सुख। आशेपाशीं परम दु:ख। आशा सर्वांसी बाधक। मुख्य दोष ते आशा॥ ३१३॥ ज्याची आशा नि:शेष जाये। तोचि परमसुख लाहे। ब्रह्मादिक वंदिती पाये। अष्टमा सिद्धि राहे दासीत्वें॥ ३१४॥" चांगला परपुरुष मिळावा म्हणून पिंगला वाट पहात होती आणि बराच वेळ वाट पाहिल्यावर तिच्या मनात आले की खरा पर म्हणजे श्रेष्ठ पुरुष अंतर्यामी असतांना स्वार्थी पुरुषाची मी का वाट पहाते आहे? आणि तिला नैराश्य आले. म्हणजे तिची दुसऱ्यापासून सुख मिळविण्याची आशा नाहीशी झाली आणि अंतर्यामी श्रेष्ठ पुरुषाशी रममाण होऊन ती सुखाने झोपी गेली. (पहा : अध्यात्म संवाद भाग २, संवाद १३७) गीता फळाची आशा सोडायला सांगते. दुसऱ्या अध्यायाप्रमाणे पुढे तिसऱ्या अध्यायातही 'निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व' म्हटले आहे. म्हणजे आशेत ममत्व आहे.

**साधक ग :** गीतेतच संगरहित म्हणजे आसक्तिरहित कर्म करायला सांगितले आहे. आशा आणि ममत्व न ठेवता कर्म करावे. कर्माला हेतू आणि दिशा लागेलच. काय करायचे आणि ते कसे करायचे हे ठरवावे लागेलच पण त्याचे फळ मला मिळावेच हा आग्रह नसावा.

**पू. बाबा :** आग्रह नसला तर कर्म उत्कृष्टपणे होईल का? कर्म तर उत्तम झाले पाहिजे आणि फळाची आशा नको. व्यवहारात तर आपण पहातोच की फर्स्ट क्लास मिळावा असा हट्ट किंवा आग्रह धरल्याखेरीज चांगला अभ्यास होत नाही आणि तो मिळाला नाही की नैराश्य येते. अर्थात आपले हे नैराश्य आणि पिंगलेचे नैराश्य वेगळे. पिंगलेला नैराश्यातून उपरती झाली.

**साधक क :** मला वाटते, साधनाच्या बाबतीत आग्रह लागेलच; पण साधनाखेरीज इतर म्हणजे सांसारिक बाबतीत आसक्ती आणि ममत्व गेल्याखेरीज साधन चांगले होणार नाही.

**साधक ग :** वैराग्य आणि त्याचबरोबर साधन करतांना ते चांगले व्हावे, भगवंत भेटावा, समाधानाचा लाभ व्हावा अशी आशा ठेवायला काय हरकत आहे?

**पू. बाबा :** आशा न ठेवता व्यवहारातील कर्मे चांगली होतील का?

**साधक ग :** मला वाटते की फळावरचे लक्ष कमी झाले तर साधनाकडे जास्त लक्ष जाईल आणि कर्म चांगले घडेल.

**पू. बाबा :** तसे घडेलच असे म्हणता येणार नाही. कदाचित कर्माचा उत्साहच नाहीसा होईल. गीतेत अठराव्या अध्यायात सात्त्विक कर्ता सांगतांना

धृत्युत्साहसमन्वित: आणि सिध्यसिध्योर्निर्विकार: अशी पदे योजिली आहेत. फलाची आशा नको पण कर्म करतांना उत्साह राहिला पाहिजे या गोष्टीचा आपल्या चर्चेत चांगला उलगडा झाला. वैराग्य तर पाहिजेच आणि कर्माची आशा सुटावी म्हणून कर्तेपण भगवंताकडे देता आले पाहिजे. ते जमले की जे घडेल ते त्याच्या इच्छेने आणि म्हणून योग्यच घडले आहे असे वाटू लागेल.

आणखी एक प्रश्न आहे. नामाची संगत कशी वाढेल?

**साधक क :** ज्याची संगत करायची त्याच्या पातळीवर आपण गेले पाहिजे, तरच संगत घडणार. नाम अतिशय सूक्ष्म आहे म्हणून आपले मन जेव्हां तितके सूक्ष्म होईल तेव्हांच नामाची संगत होईल.

**पू. बाबा :** संगत व्हायला ज्याची संगत घडायची ते मुळात खरे वाटले पाहिजे. आपल्याला नाम खरे वाटते का? ते राहू दे; महाराज आहेत असे आपण म्हणतो ते तरी खरे वाटते का? स्थूल देहाने आज ते नसले तरी ते आहेत म्हणतो.

**साधक ज :** मला वाटते, ते आता सूक्ष्म देहाने आहेत.

**पू. बाबा :** तसे म्हणा पाहिजे तर; पण अवतारांचा देह अप्राकृत असतो. म्हणजे पंचभूतात्मक जडतत्त्वे त्यात नसतात. सत्पुरुषांचे देहही सत्त्वगुणात्मक असतात. त्यामुळे त्यांचा सूक्ष्म देहही इतर सूक्ष्म देहांपेक्षा वेगळा असतो.

**साधक क :** एकदा दक्षिणेश्वरला एक साधू आले होते; तेव्हां श्रीरामकृष्ण हलधरला म्हणाले की आपण त्यांना पहायला जाऊ. तो म्हणाला, त्यात काय पहायचे? इतरांसारखाच हाडामांसाचा देह. यावर श्रीरामकृष्ण म्हणाले, बाबारे! त्यात चैतन्य प्रकटपणे वास करत असते. तो इतर सामान्य माणसांसारखा नसतो. सत्पुरुषांचा स्थूल देहही वेगळाच असतो. मदरनी नाही का म्हटलेले की त्यांच्या शरीरातील प्रत्येक पेशी जप करते म्हणून.

**साधक ग :** भगवंताची भेट व्हावी अशी आशा करावी म्हणालात. तुकाराम महाराजांनी 'भेटीलागी जीवा लागलीसे आस' म्हटले आहे.

**पू. बाबा :** आणि त्यासाठी 'पाहे रात्रंदिवस वाट तुझी।' म्हणजे काळ आलाच. तेव्हां आशा म्हटले की काळ आलाच. म्हणून कर्तेपणा भगवंताकडे देता आला तरच काळापलीकडे जाता येईल आणि फळाची आशा न ठेवता कर्मे उत्कृष्ट होतील. हे तरी, नाहीतर भाऊसाहेबांसारखे हवे. महाराज भेटले, झाले! असे वाटले पाहिजे. ही स्थितीदेखील चांगलीच आहे पण ती आत्मज्ञान झालेल्याची नव्हे. ब्रह्मानंद महाराजांची स्थिती आत्मज्ञानी पुरुषाची. तथापि ह्या जन्मी निदान भाऊसाहेबांची स्थिती साधली तरी पुष्कळ झाले!

## |३०८| (१५ जानेवारी १९९३)

मुंबईतील दंगलग्रस्त परिस्थितीमुळे संध्याकाळी साडेपाच वाजता पू. बाबांकडे गेलो.

पू. बाबांनी रजनीशांच्या एका पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. त्यात mental energy can be transformed अशा तऱ्हेचा उल्लेख होता. त्या संदर्भात मग मनाच्या शक्तीसंबंधी बोलणे झाले. मनाची शक्ती वाढवण्यासाठी १) तिचा होणारा खर्च कमी करणे आणि २) जास्तीत जास्त नाम घेऊन ती वाढवणे आवश्यक आहे.

**पू. बाबा :** शक्तीचा व्यय टाळण्यासाठी व्यवहार करतांना तिचा कमीत कमी वापर करावा.

**साधक ज :** त्यासाठी दृश्यातील व्यवहारही आवश्यक तेवढेच करावे.

**साधक क :** शक्ती कमी खर्च होण्यासाठी, व्यवहार करतांना त्यातील involvement कमी करावी.

**साधक प :** काळजी किंवा involvement कमी करण्यासाठी दृश्याचे valuation करून त्यातील घडामोडींना प्रमाणाबाहेर महत्त्व देऊ नये म्हणजे शक्तीचा अपव्यय टळेल.

**पू. बाबा :** यासाठी दृश्यातील गोष्टी प्रारब्धानुसार घडतात यावर श्रद्धा हवी. म्हणजे प्रपंच प्रारब्धावर सोडून आपली शक्ती परमार्थासाठी वापरावी. आपण नेमके उलट करतो. जे घडते ते श्रीमहाराज कल्याणाचेच करतात हे मनावर ठसले तर मन शांत राहील.

दृश्याचे ज्ञान मिळविण्यात आपण खूप रस घेतो त्यामुळे त्यात आपली खूप शक्ती खर्च होते. पारमार्थिक ज्ञान हे खरे ज्ञान होय. व्यावहारिक ज्ञान मिळवतांना 'मी'ची वाढ होते आणि ते ज्ञान काही वेळा परमार्थाच्या दृष्टीने घातक ठरते.

**साधक प :** मला वाटते, म्हणूनच ब्रह्मानंद महाराजांनी माझी विद्या घ्या असे श्रीमहाराजांना म्हटले असावे.

**साधक क :** आणि महाराजांनी घेतली म्हटल्यावर त्या विद्येचा अहंकार नाहीसा झाला असावा.

**पू. बाबा :** आपल्या अज्ञानाची जाणीव स्पष्टपणे होणे ही ज्ञानाची खरी सुरुवात आहे. सॉक्रेटीसला जेव्हा त्याचा मित्र म्हणाला की देवतेने कौल दिला आहे

की तू सर्वात ज्ञानी माणूस आहेस तेव्हां प्रथम सॉक्रेटीस विचारात पडला; पण मागाहून म्हणाला की बरोबर आहे. फक्त मलाच माहीत आहे की मला अज्ञान आहे.

कांटनेही बुद्धीचे खरे कार्य स्वत:च्या मर्यादा ओळखणे होय असे सांगितले आहे. साधारण पोट भरायच्या विद्येलाच आपण ज्ञान म्हणतो. सत्पुरुषांचा ज्ञानाचा अर्थ आत्मज्ञान किंवा भगवंताचे ज्ञान असा आहे. इतर ज्ञान हे त्यांच्या दृष्टीने अज्ञान आहे.

श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतलेले एक गृहस्थ एकदा त्यांना म्हणाले की नामस्मरण नीट होत नाही. ते गृहस्थ गेल्यानंतर या तक्रारीसंबंधी मी श्रीमहाराजांना विचारले की असे कां होते? श्रीमहाराज म्हणाले की आपले मन बरेच ठिकाणी वाटले गेले आहे, इतकेच नव्हे तर ते परस्पर विरोधी ठिकाणी वाटले गेले आहे. म्हणजेच आपल्या मनात परस्पर विरोधी वासना आहेत. त्यामधे शक्ती खर्च होते. मला हे पटले. प्रपंच खरा सुखाचा की दु:खाचा हे न कळणे हीच विरोधाची सुरुवात आहे. त्यामुळे दृश्यातील सुखाची कल्पना जाता जात नाही. यासाठी विचारांची स्पष्टता आवश्यक आहे. आपल्या ध्येयावरील दृष्टी ढळता कामा नये.

## |३०९| (२२ जानेवारी १९९३)

**पू. बाबा :** नुकतेच एका ब्रिटिश बाईने लिहिलेले Faith healing वरचे पुस्तक वाचले. विश्वास आणि दृढ संकल्प यांच्या जोरावर कॅन्सरसारखे आजार देखील बरे झाले असा तिचा दावा आहे. हे शक्य आहे का? आणि मला पुढे असे म्हणायचे आहे की हे शक्य असेल तर याचा परमार्थासाठी कसा उपयोग करून घेता येईल? होमिओपॅथीचे डॉक्टर म्हणतात की आजार प्रथम मनात होतो आणि मग तो शरीरात दिसू लागतो. व्यक्त हे अव्यक्तातून आलेले असल्याने त्यांचे हे म्हणणे बरोबर वाटते; पण ते असो. मला वाटते की परमार्थ साधायचे दोन मार्ग आहेत. एक म्हणजे संपूर्ण शरणागती आणि दुसरा मला भगवंत हवा असा दृढ संकल्प. आपल्याला शरण जाता येत नाही. तथापि हे दोन्ही मार्ग एकत्र करून शरण जाण्याचा संकल्प करायला काय हरकत आहे?

**साधक प.:** संकल्प करायचा म्हणजे काय करायचे?

**पू. बाबा :** सर्व बाजूंनी केलेली कल्पना - पूर्ण कल्पना म्हणजे सम्यक् कल्प. उदाहरणार्थ, तुमच्या पुढे काही प्रश्न आहे. तो कसा सुटेल यासंबंधी केलेली कल्पना.

**साधक ज** : संकल्पात विचारापेक्षा कल्पनेचा म्हणजे imaginationचा जास्त भाग आहे. संकल्प भविष्यकाळाबद्दल असतो आणि संकल्प विकल्प हा मनाचा धर्म आहे.

**साधक क** : संकल्पाचे मूळ वासनेत आहे. काही तरी घडावे किंवा घडू नये असे आपल्याला वाटत असते आणि आपण मायेत म्हणजे अज्ञानात राहात असल्यामुळे ते घडण्याची किंवा न घडण्याची आपण कल्पना करतो. भगवंताची कल्पना ही अज्ञानाची कल्पना म्हणता येणार नाही.

**साधक ग** : भगवंताच्या स्वरूपाबाबतही वेडगळ कल्पना आढळतात. साधक क म्हणतात ते बरोबर वाटते. समर्थांनी 'मना पापसंकल्प सोडोनि द्यावा। मना सत्य संकल्प जीवीं धरावा।' असे म्हटले आहे. म्हणजे काही सोडण्याचा किंवा काही धरण्याचा संकल्प असू शकतो. संकल्प हे मनाचे कार्य असले तरी त्यामागे निश्चय असतो.

**पू. बाबा** : होय, हे बरोबर आहे. मनाने भगवंताचा संकल्प करायचा. तो कसा आहे ते मला माहीत नाही, पण मला तो पाहिजे म्हणायचे. बरे, असे काही आहे का, की जे सदैव माझ्याबरोबर आहे आणि कधी नाही असे होत नाही ?

**साधक क** : मी आहे हे भान आहे ना! मी नाही असे कधी होत नाही.

**साधक प** : झोपेत मी कोठे असतो? भूल दिल्यावर देखील मी चे भान नाहीसे होते.

**पू. बाबा** : भान नाहीसे होते पण मी असतोच. ते असो. मला सांगा भगवंताच्या किंवा श्रीमहाराजांच्या अस्तित्वाबद्दल आपल्याला खात्री का वाटत नाही ?

**साधक प** : याची दोन कारणे आहेत. एक म्हणजे दृश्यापलीकडच्या अस्तित्वाची आपल्याला कल्पना नाही आणि दुसरे मी वासनामय आहे तसाच कर्ताही आहे असे वाटते.

**पू. बाबा** : होय, कर्तृत्व जाणे अवघड असले तरी ज्ञानराजांनी 'माझेनि अनुसंधानें देख। संकल्पु जाळणें निःशेख। मद्याजी चोख। याचि नांव॥९.५१८॥' असे ज्ञानेश्वरीत म्हटले आहे. म्हणजे संकल्प विकल्प त्रास देतात पण भगवंताच्या अनुसंधानात राहून ते पूर्णपणे नाहीसे करता येतात, जाळता येतात. म्हणून अनुसंधानाचा अभ्यास केला पाहिजे. त्यासाठी प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी. समर्थांनी चांगले सांगितले आहे. 'चालतां बोलतां

धंदा करितां। खातां जेवितां सुखी होतां। नाना उपभोग भोगितां। नाम विसरों नये।। दासबोध ४.३.७।।'

**साधक ड** : संकल्प पूर्ण होण्यासाठी प्रथम मन, बुद्धी आणि शरीर यात सुसंवाद हवा.

**साधक ज** : सामान्यत: संकल्प विकल्प चालूच असतात. संकल्प नको असेल तर केवळ वर्तमानात राहाता आले पाहिजे.

**साधक क** : वरवरचे वाटणे आणि संकल्प यात फरक आहे. माणसाला विकार नकोत असे वाटते. संसार मिथ्या आहे असे तो म्हणतो. पण आत खोल त्याला त्या विकारांचे, संसाराचे प्रेम असते. तो हवा असे वाटते. नामस्मरण करायची इच्छा आहे असे आपण म्हणतो पण ते न होण्याचे हे एक महत्त्वाचे कारण आहे. म्हणूनच जेथून संकल्प उठतात त्या वृत्तीपर्यंत नाम गेले पाहिजे असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे.

**पू. बाबा** : होय. नाम वृत्तीपर्यंत पोचले की झाले. मग संकल्प उठतील ते नामाचेच उठतील. म्हणून साधन करतांना वृत्तीपर्यंत नाम पोचू दे असा संकल्प करावा.

## |३१०| (२९ जानेवारी १९९३)

**पू. बाबा** : काल माझ्याकडे एक गृहस्थ आले होते. सुमारे सत्तर वर्षांचे असावे. मोठी दाढी ठेवली आहे. त्यांनी त्यांचे नांव, गांव, पत्ता सगळे दिले आहे; पण ते महत्त्वाचे नाही. प्रख्यात नर्तिका श्रीमती कनक रेळे यांची एक शिष्या नेहमी ज्ञानेश्वरी ऐकायला येते. ती या गृहस्थांना घेऊन आली होती. मी त्यांची चौकशी केल्यावर त्या गृहस्थांनी आपला जीवन वृत्तांत सांगितला आणि तुम्ही फक्त नाम घ्या, सत्पुरुष तुमच्याकडे चालत येतील असे श्रीमहाराज म्हणत त्याची प्रचीती आली.

या गृहस्थांचा धारावीत कातडी वस्तू तयार करण्याचा कारखाना होता. सुमारे अडीचशे माणसे कामाला होती. उत्पन्नही चांगले होत होते. ते गृहस्थ म्हणाले की सुमारे वीस बावीस वर्षे हा कारखाना चालवला आणि माझ्या मनात विचार आला की मी हे जे काही करतो आहे त्याचा अर्थ काय? हे असे आणखी किती काळ पैसे मिळवत राहायचे? जीवनाचा हाच उद्देश आहे का? मला हे सर्व थांबवावेसे वाटू लागले. शेवटी बायको मुलांची सर्व तरतूद करून ठेवली आणि बायकोला सांगितले की आता हे सर्व बंद करून मी घर सोडून

जाणार आहे. कुठे जाणार काय करणार माहीत नाही. माझी अस्वस्थता पाहून त्या माउलीनेही थोर मनाने परवानगी दिली.

मजल दरमजल करत मी हिमालयाच्या पायथ्याशी गेलो. तेथे एका सत्पुरुषाची भेट झाली. पण त्यांनी सांगितले की पुढे सिक्कीमच्या बाजूला जा. तेथे तुझे गुरु तुला भेटतील. मी पुढे गेलो. गुरुभेटीची तळमळ लागली आणि ते भेटावे म्हणून गंगेच्या काठी मी आठ दिवस उपोषण केले. थंडीने सांधे धरले आणि बसल्या जागेवरून उठता येईना. काय करावे समजेना. अशा वेळी एक सत्पुरुष पुढे उभे राहिले आणि त्यांनी स्पर्श करताच सांधे सुटले! तहान इतकी लागली होती की मी पाणी प्यायला गंगेकडे धावलो. पाणी पिऊन परत आलो तेव्हा ते सत्पुरुष नाहीसे झाले होते. पुन्हा भ्रमंती सुरू झाली. सिक्कीमच्या बाजूस हिमालयाच्या पायथ्याशी एक आश्रम आहे, तेथे गेलो. त्या आश्रमाचे प्रमुख महंत तेथे न राहता तेथून सात-आठ मैलावर डोंगरातील एका गुहेत राहात होते. मी त्यांना भेटायचे आहे म्हणून सांगितल्यावर आश्रमातले लोक म्हणाले की ते कोणाला भेटत नाहीत. तरीदेखील मी तिकडे गेलो आणि गुहेच्या तोंडाशी तीन दिवस बसून राहिलो.

चवथ्या दिवशी आवाज आला की तुला काय पाहिजे? मी आवाज ऐकला पण आसपास कोणी दिसत नव्हते म्हणून म्हणालो की माझी दृष्टी जड आहे त्यामुळे आपण मला दिसत नाही; पण कृपा करा आणि मला दर्शन द्या. तेव्हां एक तेजस्वी सत्पुरुष समोर दिसले. मी त्यांना नमस्कार केला आणि अनुग्रह करा अशी प्रार्थना केली. ते म्हणाले की अनुग्रह वगैरे काही मी देत नाही, तू परत जा. तरीही मी तसाच बसून राहिलो तेव्हा ते म्हणाले, ठीक आहे. शेजारी एक गुहा होती तिकडे बोट करून म्हणाले की त्या गुहेत जाऊन बैस. काहीही करायचे नाही. मंत्र वगैरे काही नाही. गुहेत वाहते पाणी आहे, तिकडे मलमूत्रविसर्जन करायचे. रोज लोटाभर दूध तुझ्याकडे पोचते होईल. गुहेतून अजिबात बाहेर न पडता चार वर्षे राहायची तयारी असली तर आत जा. मी आत गेलो आणि आत राहिल्यावर माझ्या वासना, माझी देहबुद्धी नाहीशी झाली. आत काहीच करायचे नव्हते; तथापि त्यामुळे अंत:करण शुद्ध झाले. चार वर्षांनंतर गुरु भेटले. त्यांची भेट होताच मलाच मंत्र स्फुरला. गुरु म्हणाले आता दोन-तीन वर्षे भारतात हिंडून ये. पण कोणाकडे काही मागू नको. अशा रीतीने हिंडत असतांना कित्येकदा काही खायला मिळायचे नाही. अशा वेळी रस्त्यात पडलेल्या केळ्याच्या साली देखील खात असे. भ्रमण संपवून परत

आश्रमात गेल्यावर गुरूंनी चौरंगावर बसवून माझी पूजा केली आणि मला मंत्र दिला! आमचा दत्तसंप्रदाय असला तरी त्यांनी मला शक्तीचा मंत्र दिला. एकांतवासात असतांना माझे शक्तीसंबंधी चिंतन होत असे. त्यानंतर गुरु म्हणाले की आता तू कोठेही जा आणि शक्य झाल्यास नीतिधर्माचा आणि शक्तीच्या उपासनेचा प्रसार कर.

पुढे असाच मी हिंडत असतांना भूक लागली होती आणि रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस केळ्यांच्या साली पडल्या होत्या त्या घ्याव्या म्हणून मी रस्ता ओलांडत होतो. तेवढ्यात एक मोटार जोरात ब्रेक मारून थांबली. खरे तर मी त्या मोटारीखालीच जायचा. मोटारीतील गृहस्थाने मला खूप शिव्या दिल्या. आम्हांला फाशी द्यायचा तुझा बेत होता. तुम्ही संन्यासी ऐतखाऊ आहात वगैरे खूप बोलला. मी त्याची क्षमा मागितली. नंतर तो गेला पण थोड्या वेळाने परत आला आणि त्याने विचारले की मी इतक्या शिव्या दिल्या त्याचा तुला राग नाही का आला? मी म्हणालो की राग म्हणजे काय तेच मी आता विसरलो आहे. त्यानंतर त्याने तत्त्वज्ञानाचे काही प्रश्न विचारले आणि मला आपल्याबरोबर त्याच्या बंगल्यात घेऊन गेला. पुढे शंभर एकर जमीन खरेदी करून त्याने एक आश्रम बांधून दिला आणि मला सांगितले की तुम्ही लोकांना शुद्ध परमार्थ सांगा. आता मी त्या आश्रमात असतो. आश्रमाच्या कारभारात मी भाग घेत नाही. माझे गुरु नुकतेच म्हणजे २६ एप्रिल १९९२ रोजी संध्याकाळी साडेचार वाजता १५४ वर्षांचे होऊन वारले.

पू. बाबा म्हणाले, मी त्यांना विचारले की हे सगळे तुम्ही मला का सांगत आहात? ते म्हणाले की कां ते मलाही सांगता येणार नाही. पण तुमच्यामागे मला कृपेचा वर्षाव दिसतो आहे. तुमची विनयशीलता मला आवडली. परत जातांना श्रीमहाराजांची तसबीर पाहून ते थोडे थांबले आणि ह्यांना (सौ. आईंना) म्हणाले, केवढा हा पुण्यपुरुष! जगावर प्रेमाचा वर्षाव करतो आहे!

मी त्यांना विचारले की आता मुंबईत आला आहात तेव्हां घरी जाणार आहात का? तेव्हा ते म्हणाले की होय, त्यांच्या घरी जाऊन येणार आहे. काही म्हणा, मला त्यांच्या चार वर्षे गुहेत राहण्याचे मोठे कौतुक वाटते. कसे राहिले असतील?

**साधक प :** अशाप्रकारे माणूस एकांतात राहिला तर आत काय आहे ते प्रथम बाहेर येईल आणि माणूस स्वच्छ होईल.

**पू. बाबा :** होय. पण आपण कर्माशिवाय राहूच शकत नाही. वासना कर्माला प्रवृत्त करते आणि काही करायचे नाही म्हटले की वासना काय करणार?

**साधक प :** कर्म करायचे म्हटले म्हणजे काळाचे बंधन आले. तथापि अशा तऱ्हेने कोणतेही कर्म न करता माणूस जर सर्वकाळ एकांतात राहिला तर त्याचे काळाचे भान नाहीसे होईल.

**साधक ज :** होय; अशा प्रकारचे प्रयोग केलेले आहेत. अशा एकांतवासात काळाचे भान नाहीसे होते. माणूस काही वेळा बारा-चौदा तास झोपतो तर काही वेळा केवळ दोन-तीन तास झोपतो. जेवण्याखाण्याच्या बाबतीतही असेच होते. म्हणून काळ गेला की इच्छा जातील आणि सुरुवातीला काही इच्छा निर्माण झाल्या तरी बाहेर पडता येत नसल्यामुळे त्या पूर्ण करता येत नाहीत असे दिसले की त्या मनात येणे आपोआप थांबेल.

**साधक ग :** त्याची अमन अवस्था होईल.

**पू. बाबा :** झेन साधूंनी अशा प्रकारची अमन अवस्था सांगितली आहे.

**साधक ग :** ज्ञानेश्वर महाराजांनी, हातपाय तोडलेला माणूस घरातच राहतो म्हणून सांगितले आहे तशी ही अवस्था होईल.

**पू. बाबा :** होय. पण अशा प्रकारचा एकांत पचला पाहिजे. अशा प्रकारचा एकांत श्रीमहाराज सांगत नाहीत. त्यांचे म्हणणे, घरात राहूनच अशा प्रकारचा एकांत निर्माण करता आला पाहिजे. तसे पाहिले तर आपण पाच-सात जण येथे जमतो. तसा प्रत्येकाचा संसार झाला आहे. आता तरी हे जमायला काय हरकत आहे? आता नामाकरता जगतो असे का वाटू नये?

**साधक प :** आपणच आपल्या जबाबदाऱ्या समजत असतो.

**साधक ज :** जबाबदारीला सामाजिक अंगही आहे.

**साधक क :** जबाबदाऱ्या वाढवायच्या म्हटले तर वाढवता येतात. परमार्थ न करण्यासाठी त्यातून पळवाटा शोधता येतात. मुख्य म्हणजे तळमळच कमी पडते. आता फक्त भगवंतच हवा असे आतून वाटत नाही.

## |३११| (५ फेब्रुवारी १९९३)

**पू. बाबा :** मागच्या रविवारी ज्ञानेश्वरीतील स्थितप्रज्ञाची लक्षणे सुरू झाली, त्यामधे 'वीतरागभयक्रोध:' असे स्थितप्रज्ञाचे वर्णन केलेले आहे. स्थितप्रज्ञ झाला तरी कर्मे करतोच. पण ती करतांना त्यामधे प्रेम, आसक्ती, भय किंवा क्रोध नसतो. भय आणि क्रोध यांचा विचार आता राहू द्या. कर्म म्हटले की हेतू

ठेवावाच लागणार आणि त्याचवेळी आसक्तीही असता कामा नये. असे कर्म करता येणे शक्य आहे का? उदाहरण म्हणून सांगतो, आई तान्ह्या मुलाला अंगावर पाजते तेव्हां त्या कर्मात केवळ प्रेमापलीकडे, वात्सल्यापलीकडे काही नसते. तिचे हे कर्म जितके प्रेममय असते तितके सांद्र-प्रेमाने भरलेले नामस्मरण झाले पाहिजे. तसे ते होण्याआड काय येते?

**साधक ब** : लहान मुलाचं आपण उदाहरण दिलंत ते फार बरोबर आहे. मुलाला आई भरवत असते तेव्हांचा त्याचा आनंद, गालाला लागलेली शितं पाहून त्याच्या आईला होणारा आनंद हे सगळं प्रेमस्वरूप असतं. पण ते नामाकडं कसं वळवायचं ते कळत नाही.

**पू. बाबा** : नामाचं राहू द्या. ते जास्त सूक्ष्म आहे. त्यासाठी आपणही तितकं सूक्ष्म व्हायला पाहिजे. म्हणून आज श्रीमहाराजांबद्दल तसं प्रेम वाटायला काय करावं? श्रीमहाराज म्हणत की कोणतीही गोष्ट, मग ते तुमच्या कचेरीतलं काम असो, दुसरा काही व्यवसाय असो किंवा खेळ असो, ते मनापासून करावं. कोणतेही काम, अगदी पत्ते खेळणे देखील मनापासून करायची सवय लागली की नामस्मरणही मनापासून होईल.

**साधक ग** : कर्मामध्ये आसक्ती आहे, कारण वासनेतून कर्म येते आणि ते करताना मी कर्ता आहे असे वाटते. वास्तविक कर्म जड आहे. ते करतांना मी नाहीसा झाला पाहिजे. त्याकरता राम कर्ता, मी कर्ता नाही हा भाव वाढवला पाहिजे.

**पू. बाबा** : तो कसा वाढवावयाचा?

**साधक ड** : विचार केला तर आपल्या लक्षात येते की कितीतरी गोष्टींत माझे कर्तृत्व असे काही नाही; ते घडले. म्हणून प्रत्येक गोष्ट करतांना ती महाराजांना सांगून करायची हा एक मार्ग आहे.

**साधक भ** : विचारापेक्षा प्रेमामध्ये भावना आहे. आई मुलाचे करते त्यात भावना असते. मुलाप्रमाणे श्रीमहाराज माझे आहेत असे वाटले पाहिजे.

**साधक ग** : मला वाटते, आता मी नामाकरता जगतो आहे असे वाटले पाहिजे. तसे आतून वाटू लागले तर प्रत्येक गोष्ट करतांना याची नामाला मदत होणार आहे का; तसे असेल तर करा नाहीतर रोजच्या व्यवहारात त्याची गरज नसेल तर सोडून द्या असे वाटू लागेल.

**साधक ज** : होलिस्टिक व्ह्यू घेता आला तर मी त्याच्या हातातले यंत्र आहे असे वाटू लागेल आणि कर्तृत्व बाधणार नाही.

**पू. बाबा :** होय पण तशी समग्र दृष्टी सोपी का आहे?

बोलण्याच्या ओघात पू. बाबा म्हणाले की दोन-तीन दिवसांपूर्वी कां कोणास ठाऊक, त्यांचे पोट बिघडले. पोटात मुरडा होत होता आणि वरचेवर शौचाला जावे लागत होते. पण ज्ञानेश्वरीच्या विचारात ते इतके गढून गेले होते की हा त्रास होतो आहे याचे त्यांना भान नव्हते. संध्याकाळी हा त्रास होतो आहे हे त्यांच्या लक्षात आले! देहापासून वेगळे होणे म्हणजे काय हे त्यांनी सांगितले व अप्रत्यक्षरीत्या त्यांची आजची अवस्था सांगितली.

**|३१२|** (८ फेब्रुवारी १९९३)

आज पू. बाबांचा वाढदिवस. ८४ वर्षे पूर्ण होऊन आज त्यांना ८५वे वर्ष लागले म्हणून दर शुक्रवारी त्यांना भेटणारे आम्ही सर्वजण संध्याकाळी पावणेसहा वाजता त्यांच्याकडे गेलो. बरीच गर्दी होती म्हणून मागे बसलो. सव्वासहा वाजता पू. बाबांनी आम्हांला पुढे बोलावले.

पू. बाबांना भेटवस्तू, मिठाई व फुले दिल्यावर ते म्हणाले, McIver नांवाचा एक समाजशास्त्रज्ञ आहे. आधुनिक समाजशास्त्राचा त्याने पाया घातला असे म्हणता येईल. तो म्हणतो की मानवसमाज हा ग्रूपस्‌चा म्हणजे गटांचा बनतो. हे ग्रूपस् सामाजिक, धार्मिक, कौटुंबिक, आध्यात्मिक इत्यादि असू शकतात. ग्रूप म्हटले की त्यामधील माणसांचा संबंध आला आणि तो ग्रूप कशा प्रकारचा म्हणजे कोणत्या कारणाने एकत्र आला यावर ते संबंध अवलंबून राहतात. जे. कृष्णमूर्ती म्हणतात की It is a network of relations. एकमेकांशी संबंध असलेल्या या माणसांत आदान-प्रदान म्हणजे देवघेव चालते. सामाजिक संबंधात, उदाहरणार्थ लग्नसमारंभात आपण भेटी देतो तशा या वाढदिवसाला तुम्ही भेटी आणता. भेट द्यायची ती त्या संबंधाला अनुरूप पाहिजे. लग्नामध्ये नवऱ्यामुलीला रेझरसेट दिला तर ते मूर्खपणाचे होईल. आपला संबंध आध्यात्मिक आहे तेव्हा त्या संबंधाला योग्य अशी भेट नको का? तशी तुम्ही मला कोणती भेट देता ते सांगा.

आमच्यापैकी कोणीच काही बोलले नाही, तेव्हा पू. बाबा पुढे म्हणाले, थोडा विचार करा. आपण कुठले कोण, या मुंबईत आलो. नोकरीधंदा करून आज या स्थितीला आलो. हे सगळे का घडले किंवा कसे घडले याचे उत्तर देता येईल का? उगीच प्रारब्धानुसार घडले म्हणण्यात अर्थ नाही. आपला प्रारब्धावर विश्वास नाही. देवाने दिले म्हणावे तर तितकी देवावरही श्रद्धा नाही. गुरूंवर तर

नाहीच नाही. आजारी पडलो आणि गुरूंनी सांगितले, विशेष काही झालेले नाही, बरा होशील, तरी आपले मन अस्वस्थच राहाते. आपला संबंध असलेली माणसे, बायको, नवरा, मुलेबाळे यांचाच संबंध का आला? माझा मुलगा माझ्या पोटीच का आला याचे काही उत्तर आहे का? डॉ. पाथरकरांचा स्वभाव अतिशय उदार होता. पण त्यांच्या बायकोला ते आवडत नसे. त्यामुळे तिच्यापासून चोरून ते दुसऱ्यांना मदत करीत. देव अशा जोड्या का जमवतो कोणास ठाऊक! आमच्या कॉलेजात गोव्यातील एक ख्रिश्चन प्रोफेसर होती. चाळीस वर्षांची झाली तरी तिचे लग्न झाले नाही; कारण ख्रिश्चन ब्राह्मण मुलगा पाहिजे असा तिच्या बापाचा आग्रह! तेव्हां हे सगळे पाहिले की जीवन असे कां असे वाटते आणि या प्रश्नाचे उत्तर मिळत नाही. म्हणून याला अनिर्वचनीय म्हणावे लागते. आज हा शब्द मी तुम्हांला दिला आहे. तुम्ही मला काय देता ते सांगा.

काय द्यावे याचे श्रीमहाराजांचे उदाहरण ऐकण्यासारखे आहे. पूर्वी मी सांगितलेलेच आहे. आंध्रातल्या एका कोमटी व्यापाऱ्याने श्रीमहाराजांना एक जरीकाठी उपरणे भेट म्हणून दिले. श्रीमहाराज म्हणाले, अरे, माझ्याकडे कितीतरी उपरणी आहेत. हे आणखी एक घेऊन काय करू? त्यापेक्षा जे माझ्याकडे नाहीं ते मला दे. व्यापाऱ्याला वाटले की हे दुसरी काही वस्तू मागतील म्हणून तो म्हणाला की दुसरे काय देऊ ते सांगा. यावर श्रीमहाराज म्हणाले की माझ्याजवळ कर्तेपणाचा अभिमान नाही (आणि तो तुझ्याजवळ भरपूर आहे) तेव्हां तो मला दे. अर्थ असा की कर्तेपणाचा अभिमान सोड. तसे आज तुम्ही मला काय देणार? एकदा सॉक्रेटीस रस्त्यातून चालला होता. खूप थंडी होती आणि तो उघडा होता. ते पाहून दहा-बारा जण त्याला कोट घालायला धावले. त्याने ते इतरांना वाटून टाकले! आध्यात्मिक संबंधात जे द्यायचे ते दृश्यापलीकडचे पाहिजे.

एका वाढदिवसाला श्रीमहाराज म्हणाले, मोठा झाला म्हणून वाढदिवस करतात. मोठा व्हायला काय लागते? पुरुषाला दाढी वाढावी म्हणून प्रयत्न का करावे लागतात? वास्तविक आणखी एक वाढदिवस म्हणजे मृत्यूच्या आणखी जवळ गेलो हे लक्षात येऊन साधनाची निकड लागली पाहिजे. आपण सगळे आतात साठाच्या पुढे आहोत, आणि मी तुमच्यापेक्षा वयस्कर आहे. म्हातारा नव्हे हं! साठी बुद्धी नाठी म्हणतात. महाराज म्हणाले, नाठी म्हणजे मेंदूची शक्ती कमी होते, विस्मरण वाढते. इत्यादी. मग अशा स्थितीत साधन कसे

करायचे? यासाठी सत्संग पाहिजे. नामस्मरण वाढले पाहिजे. या बाहेरच्या गोष्टींचा काय उपयोग? त्या दृष्टीने भाऊसाहेब आपले आदर्श आहेत. त्यांनी खरे दिले. त्यांची श्रीमहाराजांवर निष्ठा होती तशी ह्या जन्मी झाली तरी या जन्माचे सार्थक होईल. ते करा.

एकनाथ महाराज, रामदास, ज्ञानेश्वर महाराज यांचे कोणत्याही स्थितीत समाधान भंगले नाही. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीला आत्मरूप गणेशाला वंदन केले, त्यानंतर शारदेला आणि त्यानंतर गुरूंना. ते म्हणतात, 'तैसा पुढतपुढती तोचि। मियां अभिवंदिला श्रीगुरुचि। अभिलषित मनोरुचि। पुरविता तो॥ १.२७॥' अभिलषित मनोरुची पुरविता म्हणजे इच्छा असेल ते देणारा. श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर ते म्हणाले ते बरोबरच आहे; कारण ज्ञानेश्वर महाराजांची इच्छा काय असणार? पसायदानात त्यांनी ती व्यक्त केली आहे. तथापि नाथांची कमाल आहे. प्रपंचात राहून ते त्यापासून वेगळे राहिले. 'ऐसें असावें संसारीं। जोंवरि प्राचीनाची दोरी।' जे चालले आहे ते प्रारब्धानुसार चालले आहे. ते बरोबरच आहे. आणि उदाहरणे तरी कशी दिली आहेत. 'पक्षी अंगणासी आले। अपुला चारा चरोनी गेले॥ मुलीं घरचार मांडिला। खेळ होता उठोनि गेल्या॥' त्यांच्या खेळातले सगळे किती खरे असते. पण आईने हाक मारली की सगळे टाकून तिच्याकडे धावतात. तसे आपल्या या संसारातला सगळा भातुकलीचा खेळ टाकून हाक आली की आनंदाने जाता आले पाहिजे. 'वाटसरू वाटे आले। पहाट होता उठूनि गेले॥ शरण एका जनार्दन। ऐसें असतां भय कवण॥' हा आपला आदर्श आहे. भाऊसाहेब असे वागले. त्यांच्यासारखे देता आले पाहिजे.

संत सहवासाचे महत्त्व अशासाठी की त्यात दैवी आणि मानवी अशा दोन्ही भावांचे मीलन असते. स्वामी रामतीर्थ अमेरिकेतून परत आले. त्यांनी संन्यास घेतलेला होता. लाहोरला त्यांची पूर्वायुष्यातील पत्नी भेटायला आली. पूरणानंद नावाच्या त्यांच्या शिष्याने त्यांना हे सांगितले तेव्हां त्यांनी त्यालाच विचारले, भेटू का? तो हो म्हणाला तेव्हां त्या आत आल्या. त्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. रामतीर्थ, येवढे संन्यासी पण त्यांच्या डोळ्यातही अश्रू आले. थोडा वेळ असा गेला आणि काही संभाषण न करताच त्या उठून गेल्या! आणि शंकराचार्य नाही का? आईला वचन दिले होते म्हणून संन्यास घेतलेला असतानाही तिच्या मृत्यूनंतर लोकापवाद सहन करून त्यांनी तिचे क्रियाकर्म केले. संत संगतीचे महत्त्व फार आहे.

श्रीमहाराजांनी नाम हा माझा प्राण आहे; मला नामात पहा म्हणून सांगितले आणि आपण तर महाराज होते म्हणतो. कारण ज्यांना आपण महाराज म्हणत होतो त्यांना जाळल्याचे आपल्याला माहीत आहे. पण ज्याने मी जाळला तो त्या देहापलीकडे होता आणि आहे हे आपल्याला समजतच नाही. म्हणून, तुमच्या दृष्टीने "मी होतो तेव्हांही मला फारच थोड्यांनी ओळखले" असे श्रीमहाराज म्हणाले. नाम घेतांना त्यांचे खरेपण जाणवले पाहिजे. त्यांच्या अस्तित्वाचे सर्वकाळ भान येणे म्हणजे काय आहे याचा अनुभवच घेतला पाहिजे. ते शब्दात कसे सांगू? फरक नामात नाही, गुरूत नाही, नाम घेणारात आहे. आपल्या अंतरात त्यांची अधिकाधिक खात्री वाटणे, निश्चितपणा येणे याचेच नांव ज्ञान. ते या जन्मी लाभले की आणखी काय पाहिजे?

(टीप : पू. बाबांनी सांगितलेल्या एकनाथ महाराजांच्या अभंगातील ओळी दोन वेगवेगळ्या अभंगातील आहेत. ते अभंग असे :)

१) पांथस्थ घरासी आला। प्रात:काळीं उठोनि गेला॥ १॥
तैसें असावें संसारीं। जैसी प्राचीनाची दोरी॥ २॥
बाळीं घराचार मांडिला। तो सर्वेचि मोडुनि गेला॥ ३॥
एका विनवी जनार्दना। ऐसें करी गा माझ्या मना॥ ४॥

२) पक्षी अंगणीं उतरती। ते कां गुंतोनियां राहती॥ १॥
तैसें असावें संसारीं। जोंवरी प्राचीनाची दोरी॥ २॥
वस्तीकर वस्ती आला। प्रात:काळीं उठोनि गेला॥ ३॥
शरण एका जनार्दन। ऐसें असतां भय कवण॥ ४॥

## ।३१३। (१२ फेब्रुवारी १९९३)

आज सुरुवातीला थोडा वेळ पू. बाबांना बोलतांना त्रास होत असल्याचे जाणवले. बोलतांना जीभ अडखळत होती. पण थोड्या वेळाने ते नेहमीसारखे बोलू लागले. सोमवारी, वाढदिवसादिवशी पुष्कळ लोकांशी बोलावे लागल्यामुळे थकवा आला असावा. मात्र सुरुवातीपासून त्यांची मुद्रा प्रसन्न होती.

**पू. बाबा :** एक अमेरिकन फिलॉसफर आहे. आत्ता त्याचे नांव आठवत नाही पण Going Beyond हे त्याच्या पुस्तकाचे नांव आहे. या पुस्तकात तो म्हणतो की माणूस आपली बुद्धी वापरून जगाचे ज्ञान करून घेतो. इतर प्राण्यांनाही बुद्धी असते पण ती त्यांच्या रक्षण पोषणापुरतीच असते. बाहेरच्या

जगाचे गूढ उकलण्याचा ती प्रयत्न करीत नाही. माणूस बुद्धीचा उपयोग करून दृश्य जगाचे ज्ञान तर करून घेतोच पण ती बुद्धी आत वळवून आत्म्याचे ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न करतो. पण असे करतांना ती बुद्धी अपुरी पडते. माणसाची बुद्धी विचारांच्या द्वारे प्रकट होते आणि विचार शब्दांद्वारे प्रकट होतात. तथापि मुळातच बुद्धी आत्म्यापर्यंत पोचू शकत नसल्यामुळे आत्म्याचे ज्ञान शब्दांनी करून देता येणे शक्यच नाही. हे त्याचे म्हणणे बरोबर आहे. तथापि ॐकार अथवा नाम हे मानवी शब्दापलीकडचे आहे. ते ब्रह्मस्वरूपच आहे. पण आपण आज जे नाम घेतो ते कर्म आहे. कर्माचे मुख्य लक्षण कर्तेपण हे आहे. जोपर्यंत 'मी नाम घेतो आहे' तोपर्यंत इतर कर्माप्रमाणे तेही फळाच्या आशेने केलेले कर्म ठरते. नामाचे हे कर्मपण जाण्यासाठी काय करावे? श्रीमहाराज म्हणत की नामस्मरण 'करायचे' नाही, ते 'घडले' पाहिजे.

**साधक ग** : कर्म करतांना मी कर्ता आहे असे वाटत असते. त्याचप्रमाणे नाम घेतांनाही मी नाम घेतले नाही तर नामस्मरण कसे होईल असे वाटते. जोपर्यंत इतर कर्मातले मीपण जात नाही तोपर्यंत साधनातले मीपणही जाणार नाही. मी कर्ता म्हणून अपूर्ण आहे हे लक्षात येते. म्हणून मला वाटते की राम कर्ता हा भाव वाढवता आला तर काम होईल.

**साधक ज** : मागील घटनांचा विचार केला तर आयुष्यातल्या अनेक महत्त्वाच्या गोष्टीदेखील मी केल्या म्हणण्यापेक्षा त्या तशा घडल्या असे वाटते; पण आजची लहान सहान गोष्ट देखील मी केली पाहिजे असे वाटते.

**साधक ग** : इतकेच नव्हे तर मी केले नाही तर कसे होईलसे वाटते.

**साधक ब** : नामस्मरण जेव्हां चांगले होते तेव्हां हे मी केले नाही हे लक्षात येते पण नेहमीच असे घडते असेही नाही. त्यामुळे मग बरेच वेळा नामस्मरण करावे लागते.

**साधक प** : नामस्मरण चांगले व्हावयाचे की नाही, किती वेळ व्हावयाचे हे सगळे नामावरच सोपवून दिले पाहिजे. असे घडावे, तसे घडावे अशी आपण नामापासून काहीतरी अपेक्षा ठेवतो. ती कशाला ठेवायची? सगळे काही नामावरच सोपवून द्यावे कारण ते शक्तिमय आहे.

**पू. बाबा** : नामाच्या शक्तीचा परवाचाच अनुभव सांगतो. परवा म्हणजे वाढदिवसादिवशी सकाळपासूनच मी हलका झालो आहे; नाम वर आहे आणि ते मला वर ओढते आहे असे वाटत होते. actual levitation (अधांतरी होणे) नव्हते पण मी जमिनीपासून वर उंचावर आहे असे वाटत होते. तो

अनुभव नाहीसा होईल असे वाटून दुपारी मी जेवणही कमी घेतले. पण मग दुपारी दोन नंतर आता लोक भेटायला येतील; हे असे चालणार नाही असा विचार मनात येऊ लागला आणि तो अनुभव नाहीसा होऊन पूर्वस्थितीवर आलो. पण नामाच्या शक्तीचा प्रत्यय आला. असे क्वचितच घडते. नाम घेतांना कोणता भाव ठेवावा म्हणजे त्यांचे अस्तित्व जाणवेल?

**साधक ड** : माझा अनुभव सांगतो. मी नाम घ्यायला बसलो की माझ्या बाजूला श्रीमहाराज बसलेले आहेत आणि मी घेतलेले नाम ते ऐकत आहेत असे मला वाटू लागते आणि नामस्मरण चांगले होते. पण हे फार वेळ टिकत नाही. काही वेळाने हा भाव नाहीसा होतो.

**पू. बाबा** : हे चांगलेच आहे. पण श्रीमहाराज बाजूला बसलेले आहेत ही मी कल्पनाच करतो. प्रत्यक्षात ते आहेत असे कोठे जाणवते? ते जाणवले पाहिजे.

**साधक ड** : आज ते जाणवत नसले तरी या अशा प्रयत्नातूनच ते निर्माण होईल असे वाटते.

**साधक क** : आपण अनेक ठिकाणी गुंतलेले आहोत. ते नामाच्या आड येते. त्या सर्वातून विवेकाने मन बाहेर काढले पाहिजे. त्याशिवाय ते आत वळणार नाही. आम्ही राघवदासांकडे गेलो होतो तेव्हां त्यांनी हेच सांगितले.

**साधक ब** : इतकेच नव्हे तर ते म्हणाले की मी तुमच्यात गुंतलेला नाही आणि तुम्ही माझ्यात गुंतलेले नाही. तुमची वेळ झाली की उठून जा.

**साधक प** : नाम घेतांना काही अपेक्षा ठेवणेच चुकीचे आहे. भूतकाळ थांबवून आणि भविष्यकाळाच्या कल्पना बंद करून आत्ता ह्या क्षणाला मी फक्त नाम घेतो आहे येवढेच राहिले पाहिजे.

**साधक क** : म्हणजे हे living in the present आहे.

**पू. बाबा** : ते देखील कसे पाहिजे? आपण घरात आहोत. घरात अनेक चांगल्या वाईट गोष्टी घडत आहेत. कोणी आजारी पडले तर त्याच्यावर उपचार होताहेत. पण आपले मन मात्र हालत नाही असे घडायला पाहिजे. (आमच्यापैकी एकांना) काय हो, तुमची नात आजारी आहे किंवा तुमच्या मंडळींच्या पायाचे ऑपरेशन करावे किंवा नाही हा विचार चालू आहे अशा वेळी हे शक्य आहे काय?

**साधक** : आम्हांला तरी हे शक्य नाही.

**पू. बाबा** : तुम्हांलाच काय, आपल्याला कोणालाच आज हे शक्य नाही. पण हा आदर्श आहे. विद्यारण्यांनी पंचदशीमधे एक उदाहरण दिलेले आहे. नाटकात रंगमंचावर दिवा असतो. तेथे रंगमंचावर सुखान्तिका होवो किंवा

शोकान्तिका होवो त्याच्याशी त्या दिव्याचा संबंध नसतो. तो केवळ असतो. नाटकदीप असेच त्या प्रकरणाचे नांव आहे. श्लोक असा :

नृत्यशालास्थितो दीप: प्रभुंसभ्यांश्च नर्तकीम्।
दीपयेदविशेषेण तदभावेऽपि दीप्यते॥ १०.११

**साधक ब** : हे नुसते असणे महत्त्वाचे आहे आणि तेच नाम किंवा श्रीमहाराज आहेत. आपण जर विचार केला की दुसरा माणूस आपल्याला कां आवडतो आणि लक्षात आले की आपल्याला त्याच्यापासून काही पाहिजे असे नाही; ते आवडणे निरपेक्ष आहे तर आपण त्याच्या या असणेपणाचेच महत्त्व जाणतो आहोत. कारण जे माझ्या ठिकाणी आहे तेच त्याच्या ठिकाणी आहे.

**साधक क** : असणेपणाचा हा गुण खरा आणि महत्त्वाचा आहेच पण तो या शरीरातून मी आहे असा प्रगट होतो त्याचे महत्त्व आहेच.

**साधक ज** : मी जसा श्वासोच्छ्वास करतो, त्याच्याशिवाय राहू शकत नाही; तथापि त्याच्यावर माझे नियमन नाही तशा जीवनातील इतर घटना सहज वाटत नाहीत.

**साधक प** : हे खरे आहे. अगदी आत्मज्ञान झालेला माणूस, उदाहरणार्थ श्रीरामकृष्ण घेतले तरी शरीराचे महत्त्व राहातेच. शेवटी त्यांना घशाचा कॅन्सर झाला होता. अतिशय त्रास व्हायचा. तेव्हां ते आईला म्हणाले की आई, किती बडवतेस ह्या शरीराला!

**पू. बाबा** : खरे आहे; तथापि तरी देखील त्यांची जी सूक्ष्म अवस्था झालेली होती त्या अवस्थेतून ते खाली आले नाहीत. नाम घेतांना सूक्ष्म होता आले पाहिजे. त्यासाठी आवश्यक ती पथ्ये पाळलीच पाहिजेत.

**साधक क** : आपले साधन स्थलकालनिमित्ताच्या सीमेत राहते; त्याच्या पलीकडे ते जाऊच शकत नाही. ते पलीकडे जावे म्हणून प्रयत्न आणि प्रार्थना येवढाच मार्ग राहतो.

**पू. बाबा** : नामाची संगत झाली पाहिजे. एखाद्या माणसाची संगत जाणवते, तसे झाले पाहिजे. हे जमले तर नाम घेतांना प्रेम येईल की आनंद होईल की वृत्तिशून्य अवस्था होईल?

**साधक प** : अमुकच होईल असे सांगता येणार नाही.

**साधक ग** : संगत म्हणजे असे की चांगल्या माणसाच्या संगतीतून उठावेसे वाटत नाही. तसे नामस्मरण चालू असतांना उठावेसे वाटू नये. नाइलाजाने उठावे लागावे.

**पू. बाबा :** ते खरे रंगणे आहे. माणूस एकदा नामात रंगला की पुढे चालला. आपण कशासाठी तरी नाम घेतो. नामाने काहीतरी व्हावे असे वाटते. ते न होता मला भगवंत हवा हीच इच्छा फार तर राहावी. खरे म्हणजे नाम हेच सर्वस्व वाटले पाहिजे. त्यापासून कोणतीच अपेक्षा असता कामा नये.

## |३१४| (१९ फेब्रुवारी १९९३)

**पू. बाबा :** ह्या आठवड्यात डॉ. बावडेकर भेटायला आले होते. मोठे आर्थोपेडिक सर्जन आहेत. त्यांनी गोंदवल्याला जाऊन श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतलेला आहे. त्यांनी एक प्रश्न उपस्थित केला. ते म्हणाले, माझ्याकडे अनेक पेशंटस् येतात. त्यांच्यावर मी उपचार करतो. त्यांचे दु:ख मला समजते आणि त्याकडे मी वेगळेपणाने पहातो. पण तसे दु:ख मलाही होणे शक्य आहे असे वाटत नाही. स्वत:कडे वेगळेपणाने पहाता येत नाही. सर्वार्थाने इतके यश मिळूनही मला समाधान नाही.

त्यांच्याप्रमाणेच ह्या आठवड्यात श्रीमती किशोरी आमोणकर भेटायला आल्या होत्या. मोठी गायिका आहे. मला त्यांचे गाणे आवडते. राघवेंद्रस्वामींच्या अनुग्रहीत आहेत. श्रीरामाची आवड आहे. त्यांना वाटते की गाण्याच्या स्वरांतून आपल्याला रामदर्शन व्हावे. त्या म्हणाल्या की गोंदवल्याच्या रामाचे दर्शन घ्यायला जाणार आहे. मीराबाईचेही प्रेम आहे; पण त्यांनाही समाधान नाही.

आपण साधन करतो त्यात आपल्याला समाधान आहे का? ब्रह्मानंद महाराजांना जे नाम दिले तेच आपल्याला दिले. नामात भेद नाही. मला नामात पहा म्हणून सांगितल्यावर त्यांनी श्रीमहाराजांना नामात पाहिले; दुसरे काहीही साधन केले नाही किंवा दुसरे अप्रतिम उदाहरण भाऊसाहेबांचे. श्रीमहाराजांनी आला हा संसार माझा म्हणून सांगितल्यावर त्यांचा त्यावर विश्वास बसला. महाराज भेटले, आता आणखी काय मिळवायचे अशी त्यांची वृत्ती बनली. माझा प्रश्न आहे की ही श्रद्धा कशी मिळवायची? आपल्याला नामामधे श्रीमहाराजांचे अस्तित्व कां जाणवत नाही?

**साधक ब :** काही वेळा नाम चांगले होते. महाराज बरोबर आहेत असे वाटते. पण ते हुकमी होत नाही. मला नामात पहा असे त्यांनी सांगितले आहे; पण आपण ते होते म्हणतो. म्हणून श्रीमहाराजांनी म्हटले आहे की मी नामात आहे हे तुम्हांला समजत नाही. मी देहात होतो तेव्हां तुम्ही मी आहे असे समजत होता पण ज्यांनी मला देहात पाहिले त्यांनाही मी समजलो नाही.

**साधक क** : आपल्याला दृश्याचे खरेपण तेवढेच माहीत आहे. त्याच्या पलीकडच्या खरेपणाची जाणीव नाही.

**पू. बाबा** : नामाचे खरेपण हे जास्त सूक्ष्म आहे. पण श्रीमहाराजांचे खरेपण जाणवायला काय हरकत आहे? बरे, ते जाणवत नाहीतच असेही म्हणता येत नाही. गोंदवल्याला ते आहेत असे आपण म्हणतो. (साधक प ना) तुम्हीच त्यांचे तेथे असणे ही fact (वस्तुस्थिती) आहे असे काहीतरी म्हणाला होता ना?

**साधक ग** : ते म्हणाले, गोंदवल्याला आपण जातो तेव्हां तेथले श्रीमहाराजांचे असणे ही fact आहे तर येथे ते आपल्या घरी आहेत असे आपण मानतो. मानणे आणि वाटणे यात फरक आहे.

**पू. बाबा** : पण मग ही श्रद्धा कशी निर्माण व्हायची? याच्या आड काय येते?

**साधक क** : श्रीमहाराजांचे अस्तित्व बुद्धीपर्यंत पोचले पाहिजे.

**साधक ड** : नुसते बुद्धीपर्यंत पोचून उपयोगी नाही. मनाने ते आचरणात आणले पाहिजे. आणि त्यासाठी बुद्धी म्हणजे विचार, मन आणि कृती यांची एकवाक्यता झाली पाहिजे.

**साधक ब** : नाम म्हणजे असणेपणाचा गुण आहे आणि नाम आणि श्रीमहाराज एकच आहेत. आपण जेव्हां नामस्मरण चांगले झाले म्हणतो तेव्हां आपण त्या असणेपणाजवळ गेलेले असतो. तेथे थोडासा का होईना, काळाचा विसर पडलेला असतो. ह्या नामापासून मला काय पाहिजे, कशाकरता मी नाम घेतो याचा विचार केला आणि उत्तर आले की याच्यापासून मला खरोखर काही नको आहे तर समजावे की नामाचे असणेपण जाणवू लागले आहे. कारण मुळात नाम पूर्ण आहे. आज आपल्याला ते साधन वाटते. पण ते पूर्ण आहे. त्यामुळे त्यातून आणखी काही मिळायचे अथवा मिळवावयाचे असे नाहीच. हा विचार सतत ठेवला पाहिजे.

**पू. बाबा** : हे तुमचे म्हणणे बरोबर आहे. नाम पूर्ण आहे हा विचार सतत टिकला पाहिजे.

**साधक ज** : विचाराने हे पटले तरी त्याबरोबरच त्याला वैराग्याची जोड आवश्यक आहे. आज आपल्याला श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची थोडी जाणीव आहे, पण ती टिकत नाही.

**पू. बाबा** : अस्तित्वाचे भान टिकणे हेच स्मरण आहे. किती चटकन आपण विसरतो. परवा पुण्याहून सौ. सुलभाताईंचा (पाटणकर) फोन आला

होता. त्या म्हणाल्या, पोळी लाटतांना नाम चालू असते आणि ती भाजतांना ते विसरते!

**साधक ग** : श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचे भान विचाराने टिकले तरी त्यापेक्षाही तशी तळमळ लागली तर भावनेने टिकेल.

**पू. बाबा** : विचार, भावना इत्यादी मनाचीच अंगे आहेत. त्या सर्वांचीच organic growth होईल.

**साधक क** : समजण्याच्या सोयीसाठी आपण हे analysis करतो. वास्तविक ते सर्व एकच आहे. मुख्यत: आपले ध्येय निश्चित होत नाही हे खरे आहे.

**पू. बाबा** : होय, आणि ते निश्चित व्हावे म्हणून संत परोपरीने सांगत असतात. संतांचीही काही स्वभाववैशिष्ट्ये राहतात. उदाहरणार्थ, अक्कलकोटचे स्वामीमहाराज शिव्या देत. वास्तविक येवढे मोठे सत्पुरुष; महाराज त्यांना गुरुपद देणार होते. त्यांच्या या स्वभावाबद्दल श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले, साधन कालात लोकांपासून दूर राहाता यावे म्हणून जी सवय लागली ती राहिली इतकेच. तथापि सत्पुरुषांच्या पोटी दयाच असते. दात बिघडल्यामुळे तोंडाला घाण येत असली तरी दातांचा डॉक्टर जसा त्या रोग्याचा तिटकारा करत नाही तसे संतही भवरोग्यांचा तिटकारा करत नाहीत. परवा कोणीतरी काका पुराणिकांचे चरित्र वाचायला दिले होते. त्यात काकांनी म्हटले आहे की आधी संत रागवत नाहीत आणि रागावले तर ती त्यांची कृपा समजावी.

**साधक प** : संतांना राग आणायचा म्हणजे तसा जबरदस्त माणूसच पाहिजे. त्याच्यावर त्यांची का नाही कृपा होणार?

**पू. बाबा** : वा! हे फार छान आहे. तुम्ही साधू झालात तर मोठे intellectual (बुद्धिमंत) साधू व्हाल. आणि का होणार नाही? साधनात मात्र राहिले पाहिजे.

## ।३१५। (२६ फेब्रुवारी १९९३)

**पू. बाबा** : आपल्या इथे आणि गोंदवल्याला येणारे एक गृहस्थ बँकेत अधिकारी आहेत. सध्या त्यांची बँकेच्या न्यूयॉर्कच्या शाखेत बदली झालेली आहे. तीन-चार दिवसांपूर्वी त्यांचा न्यूयॉर्कहून फोन आला होता तेव्हां फोनवर त्यांनी सांगितलेली हकिगत प्रथम सांगतो. श्रीमहाराजांच्या समाधी मंदिराच्या

आवारात राहाणाऱ्या एका गृहस्थांचा मुलगा अमेरिकेत मिशिगन स्टेटमधे इंजिनिअर आहे. तेथे त्याची आणि भारतात राहून गेलेल्या एका पाद्र्याची ओळख झाली. त्या पाद्र्याला मराठी भाषा चांगली येते म्हणून माझे एक पुस्तक (त्यांनी नांव सांगितले नाही) या मुलाने त्याला वाचायला दिले. ते वाचून त्याने जीजसच्या नांवाचा जप करायला सुरुवात केली. सुमारे सहा महिने जप केल्यानंतर त्याला एकंदर नीरसपणा (aridness) वाटू लागला. एक दिवस जप करीत असतांना 'जप चालू ठेव, मी तुझ्यामागे आहे' असे मराठी वाक्य त्याला ऐकू आले. हे त्याने इंजिनिअरना सांगितले आणि हा काय प्रकार आहे म्हणून विचारले. ते म्हणाले, त्याचा तुम्ही कशाला विचार करता? नामच सगळा उलगडा करील. त्याने नामस्मरण चालू ठेवले. पुढे एकदा त्याला असेच 'विकल्प सोड' हे शब्द ऐकू आले. त्याच सुमारास त्याची (या पाद्र्याची) आणि मला फोन करणाऱ्या बँक ऑफिसरांची न्यूयॉर्कमधे भेट झाली. या अधिकाऱ्यांचा आध्यात्मिक कल बोलतांना लक्षात आला म्हणून त्या पाद्र्याने त्यांना ही सर्व घटना सांगितली. बँक अधिकारी त्याला म्हणाले की हा श्रीमहाराजांचाच आवाज होता. पाद्र्याने महाराज कोण इत्यादी चौकशी केली तेव्हां या अधिकाऱ्यांनी त्याला गुरूचे महत्त्व, अनुग्रह म्हणजे काय इत्यादी सांगितले. तो पाद्री आता मनापासून जप करतो आणि त्यात त्याला अतिशय समाधान वाटते. त्याने सांगितले की होकायंत्राची नीड्ल (सुई) स्थिर व्हावी तसे आता त्याचे नाम स्थिर झाले आहे.

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले की असे नामस्मरण झाले पाहिजे. ते कर्म होता कामा नये. त्या पाद्र्याचा पूर्वजन्मी श्रीमहाराजांशी संबंध आलेला असणार. गुरूची जन्मोजन्मी शिष्यावर दृष्टी असते. बरी आठवण झाली; एक जुनी हकिगत तुम्हांला सांगतो.

एकदा मी श्रीमहाराजांबरोबर जालन्याला गेलो होतो. तेथे प्रल्हादमहाराज होते. त्यांनी शास्त्रपठण केलेले होते. भागवत छान सांगत. त्यांच्याकडे त्यावेळी वऱ्हाडातले एक शास्त्री आले होते. त्यांनी श्रीमहाराजांना विचारले की आपण नाम घेतो तेही कर्मच नाही का? परमात्मा तर सर्व कार्यकारणभावाच्या पलीकडे आहे. तो कर्माने कसा प्राप्त होणार? श्रीमहाराजांनी माझ्याकडे बोट करून ते यांना विचारा म्हणून सांगितले. तथापि मी गप्प बसलो. नाम हे कर्म नव्हे हे समजावून सांगण्यासाठी नंतर श्रीमहाराजांनी दिलेले उदाहरण अप्रतिम होते. श्रीमहाराज म्हणाले, परमात्मा हा नित्यप्राप्तच आहे तेव्हां त्याची प्राप्ती

करून घ्यायला आणखी काही कर्म नकोच. पण आज आपण त्याला विसरलो आहोत म्हणून त्याचे स्मरण केले की पुरे. तुम्हांला भूक लागते किंवा झोप येते यात कर्म कोणते घडते? ही भूक किंवा झोप जशी तुमच्यातून आपोआप येते तसे नामही आतूनच येते. आज तुम्ही बाहेरून नाम घेता म्हणून ते कर्म आहे. ते आतून येऊ लागले की कर्म राहात नाही. आज आपण बाहेरचे जग आत घेतो आहोत; त्याऐवजी आत जाता आले पाहिजे. प्रल्हादमहाराज म्हणाले की झऱ्यातून पाणी येते तसे नाम आतून आले पाहिजे. झऱ्यात पाणी असतेच पण त्यावरचे दडपण - प्रतिबंध दूर झाल्याखेरीज पाणी येत नाही. तसेच नित्यप्राप्त आहे ते प्राप्त व्हावे लागते.

हे सांगून पू. बाबा म्हणाले की ही वेदान्ताची भाषा राहू दे. शंकराचार्यांनी विवेकचूडामणीत म्हटले आहे 'शब्दजालं महारण्यं चित्तभ्रमणकारकम्।' म्हणून या शब्दजालात न गुरफटता ज्ञान्यापासून आत्मतत्त्व जाणावे. 'अत: प्रयत्नाज्ज्ञातव्यं तत्त्वज्ञातत्त्वमात्मन:॥६२॥' हे ज्ञानीही कसे असतात ते सांगितले आहे. 'शान्ता महान्तो निवसन्ति सन्तो वसन्तवल्लोकहितं चरन्त:। तीर्णा: स्वयं भीमभवार्णवं जना अहेतुनान्यानपि तारयन्त:॥३९॥' वसंतऋतु जसा वनस्पतींना व लोकांना सुख देतो तसे ते असतात. स्वत: संसार सागर तरलेले असतात आणि अहेतुना म्हणजे केवळ दयाबुद्धीने इतरांना तारतात. सत्संगतीचे महत्त्व फार मोठे आहे.

नंतर पू. बाबांनी विचारले की आपले मनासारखे नामस्मरण का होत नाही? आत का जाता येत नाही? प्रतिबंध तरी कोणता आहे? प्रश्न विचारून तेच पुढे सांगू लागले. शंकराचार्यांनी ज्ञानाचे तीन प्रकार सांगितलेले आहेत. पहिले अज्ञान. अज्ञानाला त्यांनी ज्ञान म्हटले आहे, कारण अज्ञानातही मला कळत नाही हे ज्ञान असतेच, दुसरे ज्ञान. यात वस्तू जशी आहे तशी दिसते. यालाच यथातथ्य ज्ञान म्हणतात. अर्थात ते आत्मज्ञानाविषयी सांगत आहेत. आणि तिसरे विपरीत ज्ञान म्हणजे जसे आहे तसे न दिसता वेगळेच दिसणे. आपले ज्ञान या तिसऱ्या प्रकारात मोडते. जगाबद्दल, नामाबद्दल आणि आपल्या गुरूंच्या अस्तित्वाबद्दल आपल्या विपरीत कल्पना आहेत. हे विपरीत ज्ञान नाहीसे करून आपल्या गुरूंना नामात कसे पहायचे? त्यांच्या अस्तित्वाची जाणीव सतत कशी ठेवायची? (साधक ज ना) तुम्ही सांगा.

**साधक ज** : सर्व जगाचे ज्ञान हे माझ्यावरच अवलंबून आहे. जगाकडे मी माझ्या कल्पनेतून पाहतो म्हणून स्वत: बदलायला पाहिजे.

**साधक क :** आपले ज्ञान हे विपरीत ज्ञान आहे हे खरेच. मी आणि जग असे आपण दोन भाग करतो आणि जगाबद्दल किंवा माझ्याबद्दल माझे ज्ञान विचित्र असते. मी जगाचाच भाग आहे आणि त्यामुळे जगाचे गुणधर्म आहेत तेच माझे आहेत हे मी विसरतो. जगातील प्रत्येक वस्तू नाहीशी होणारी आहे तसा मीही नाहीसा होणारा आहे. असे असूनही मी असावा असे वाटते कारण त्या पूर्णातून मी आलो आहे. अज्ञान आणि विपरीत ज्ञान या दोहोंची माझ्या जीवनात सरमिसळ आहे. नामाचे सत्यत्व सूक्ष्मात आहे आणि मी दृश्यात अडकलो आहे. त्यामुळे नाम आणि गुरु यांचे सत्यत्व पटायला मी खरा नाही हे पटले पाहिजे.

**पू. बाबा :** होय; पण आज जो मी दृश्यात रमलो आहे त्यातून बाहेर कसा पडणार ?

**साधक क :** माणूस आनंदाशिवाय राहू शकत नाही. आज तो दृश्यातून आनंद घेऊ पाहतो. दृश्यापलिकडच्या आनंदाची थोडी तरी चव मिळाल्याखेरीज त्याचे तोंड दृश्याकडून वळणार नाही.

**साधक प :** माणूस आनंदाखेरीज राहू शकत नाही; तसेच त्याला उपाधीखेरीज राहाता येत नाही. ज्ञानेश्वरीत सांगितल्याप्रमाणे जोपर्यंत आपण आपल्यामध्ये रमत नाही तोपर्यंत खरे साधन होणार नाही. वास्तविक हेच साध्य आहे. स्वतःमध्ये रमता आले पाहिजे.

**साधक ग :** आपण सांगितलेल्या उदाहरणाप्रमाणे झऱ्यात पाणी असतेच. पण त्या झऱ्याच्या तोंडावर असलेली दगड माती दूर केल्याखेरीज ते वाहू लागत नाही तसे जन्मोजन्मींच्या संस्कारांचे प्रतिबंध दूर झाल्याखेरीज आत्मज्ञान होणार नाही. नामानेच हे प्रतिबंध दूर होतील.

**साधक ब :** साधक प म्हणतात ते बरोबर आहे. आत रमता आले पाहिजे आणि त्यासाठी बाहेरचे रमणे थांबले पाहिजे. बाहेर मी कशाकशात गुंतलो आहे याचा विचार करावा. जगायचे म्हणजे अन्न, वस्त्र, निवारा लागणारच. त्यासाठी नोकरीधंदा करावा लागेल. पण ते मिळाल्यानंतर त्याबाबत जास्त विचार करू नये. इतकेच नव्हे तर ते गेले तर ती त्याची इच्छा वाटली पाहिजे. म्हणजेच आज आहे ते वापरावे पण त्यात गुंतू नये. मी हा प्रयोग करून पाहिला आहे. अद्यापि मी कशात गुंतलो आहे ते माझ्या लक्षात आले आहे. त्यातून बाहेर पडलो म्हणजेच मला आत रमता येईल आणि ते एकदा जमले की आनंदच आनंद!

श्रीमहाराजांनी सांगितले आहे की नाम पूर्ण आहे. असणेपणा हा नामाचा गुण आहे. त्याची प्रचीती यायला पाहिजे. त्यासाठी अंतर्मनाला मी नामाखेरीज कशात गुंतलो आहे हा प्रॉब्लेम दिला पाहिजे. विचाराने एक एक जसे सुटत जाईल तसतसे नामाचे असणेपण जाणवू लागेल. आपल्या प्रवचनात श्रीमहाराजांनी अनेक वेळा या असणेपणाचा उल्लेख केला आहे. असणेपणा जाणवला की त्यापुढे नामाची संगत आहे. त्यासाठी जगाचे खरेपण सुटले पाहिजे.

**साधक प** : जगाचे खरेपण सोडावे हे बरोबर आहे. पण असे करायचा जो प्रयत्न करील त्याला प्रथम aridity तून जावे लागेल. ते कठीण आहे. इकडचे सोडले आहे आणि तिकडचे हाती आलेले नाही अशी ती अवस्था आहे.

**साधक क** : जगाबद्दलच्या चुकीच्या कल्पना सोडाव्या.

**साधक प** : चुकीच्या म्हणू नका. बरोबर आणि चूक आपल्याला माहीत नाही. जग हे असेच असणार हे आपण समजून घ्यायला हवे आणि हे सगळे त्याच्याच इच्छेने चालले आहे.

**साधक ब** : प्रत्येकाच्या व्यक्तित्त्वाचा एक घाट असतो. त्याच्या प्रतिक्रिया त्या घाटाला धरून असतात. जो आपल्या व्यक्तित्त्वाच्या थोडा बाजूला जाऊन स्वत:च्या प्रतिक्रिया पाहू शकेल त्याला स्वत:च्या विपरीत ज्ञानाची खरी कल्पना येईल आणि मग तो त्यातून बाहेर पडेल. दुसरा मार्ग म्हणजे आपले व्यक्तित्त्व dynamic आहे, सतत बदलणारे आहे. त्याला सत्संगतीने योग्य वळण द्यावे.

**पू. बाबा** : काय सोडायचे ते कळले. ते कसे सोडायचे ते पुढच्या शुक्रवारी सांगा.

## ।३१६। (५ मार्च १९९३)

**पू. बाबा** : आपण प्रपंचात फार गुंतलेले आहोत. प्रपंचात सुख नाही. प्रपंच करणाराला परमार्थ साधणार नाही हे समर्थांचे खरे मत. पण त्यांना मठ उभे करायचे होते, लोकसंग्रह करायचा होता म्हणून तडजोड करावी लागली. ती केली नसती तर फक्त कल्याणच त्यांच्याजवळ राहिला असता! म्हणून ते म्हणाले, 'प्रपंच करावा नेटका'. नेटकाचा श्रीमहाराजांनी बरोबर अर्थ केला. सत्पुरुषांनाच हे सुचणार. ते म्हणाले, जो प्रपंच भगवंताच्या स्मरणात होतो तोच प्रपंच नेटका. त्याचे स्मरण नसेल तर तो नेटका नाही. (पहा : अध्यात्म संवाद भाग २, संवाद १२९)

नंतर दृश्याचे प्रेम जात नाही; श्रीमहाराजांचे अस्तित्व खरे वाटत नाही या मुद्द्यांची उजळणी झाली.

**पू. बाबा :** मी यावर पुष्कळ विचार केला. याबाबत मी श्रीमहाराजांना विचारले होते तेव्हां ते म्हणाले होते की माणसाला परमार्थ करावासा वाटतो, पण अविद्येचा म्हणजे मायेचा जोर विलक्षण आहे. तिच्यावर मात करून भगवंताचे स्मरण ठेवायला लागणारी जीवाची शक्ती अपुरी पडते. मनाची शक्ती विलक्षण आहे; पण आपण नामस्मरणाने जी काही थोडीशी शक्ती मिळवतो ती प्रपंचाचा विचार सुरू झाला की, खर्च होते आणि केवळ ओल तेवढी राहाते. किंवा असे म्हणता येईल की आपल्या अंतरात असलेली ज्योत झाकली जाते. जे थोडेसे नामस्मरण करतो त्यामुळे ती विझत नाही, इतकेच. असे कां होते?

**साधक ड :** नामस्मरण करतांना काही वेळ श्रीमहाराजांची आठवण असते पण न कळत ती गायब होते. नामाच्या शक्तीची आम्हांला खरी कल्पनाच नाही.

**साधक प :** नामाच्या शक्तीची कल्पना यायला आपणच आपल्यावर प्रयोग केला पाहिजे. नामस्मरण करतांना आणि नंतर काही वेळ तरी मन शांत झाले तर समजावे की हा नामाचा परिणाम आहे. खऱ्या शांतीची आपल्याला कल्पना नाही पण जी काही शांती वाटेल ती नामाची शक्ती ओळखायला पुरेशी आहे.

**पू. बाबा :** तळमळ पराकोटीला पोचली पाहिजे त्याखेरीज शरणागती येणार नाही.

**साधक ब :** त्याकरता आपल्या आजच्या जीवनाचा घाट (pattern) बदलला पाहिजे. संबंध नाही त्या गोष्टीत देखील आपण उगीचच गुंतून राहातो; ते थांबवले पाहिजे.

**पू. बाबा :** खरे आहे तुम्ही म्हणता ते. गेल्या तीन-चार दिवसांत निदान साठ-सत्तर माणसे भेटली असतील. त्यांपैकी निम्म्यांनी तरी आता राज्याचे मुख्य मंत्री कोण होतील असे तुम्हांला वाटते म्हणून विचारले. वास्तविक आपला त्याच्याशी काय संबंध आहे? इकडे ज्ञानेश्वरी वाचायची आणि हे फालतू विचार करायचे.

**साधक ब :** कोणी का होईना? कोणीही झाला तरी ती सगळी घाणच आहे. साधन करायचे तर असल्या गोष्टींकडे लक्षच देता कामा नये.

**पू. बाबा :** तुमचा काही संबंधच येत नाही तेव्हां एक वेळ हे जमेल पण समजा तुमचा मुलगा सेक्रेटरी आहे आणि होणाऱ्या मुख्य मंत्र्याच्या हाताखाली त्याला त्रास होणार आहे. अशा वेळी तुमचे मन स्वस्थ कसे राहील?

**साधक ब :** मुलगा त्यांचा सेक्रेटरी झाला तेव्हांच तो या घाणीत उतरला आहे. आपण कशाला त्याचा विचार करायचा? आता आपण त्यातून बाहेर पडले पाहिजे.

**साधक ज :** त्यापेक्षा मी असे म्हणेन की जे घडते आहे ते त्यांच्या - श्रीमहाराजांच्या सत्तेने घडते आहे. म्हणून ते योग्य की अयोग्य हा विचार न करता मी त्यांचे अनुसंधान ठेवण्याचा प्रयत्न करावा.

**साधक प :** बरोबर, आजचा जीवनाचा साचा मोडण्यात शक्ती खर्च करण्यापेक्षा आहे त्या साच्यातच जास्तीत जास्त नामस्मरण करणे, अनुसंधान ठेवणे सोपे जाईल. परिस्थिती कशी का राहीना, मनात पालट झाला पाहिजे.

## |३१७| (१२ मार्च १९९३)

आज दुपारी दीड ते साडेतीनच्या दरम्यान मुंबई शेअर बाजार, एअर इंडिया बिल्डिंग, जव्हेरी बाजार, सेंचरी बाजार, दादरचे प्लाझा थिएटर इत्यादी सुमारे तेरा ठिकाणी बॉम्बस्फोट झाले. सुमारे २५० माणसे मेली व ९०० हून जास्त जखमी झाली असे नंतर समजले. या घटनेमुळे नेहमीच्या साधकांपैकी तिघे येऊ शकले नाहीत.

पू. बाबांनी आजचा बॉम्बस्फोटाचा प्रसंग घेऊनच बोलायला सुरुवात केली. अशा प्रकारच्या घटनांचा परिणाम साधनावर होऊ न देण्यासाठी काय करावे? जगाचा स्वभाव ज्याला कळला त्याच्या साधनावर अशा प्रकारच्या घटनांचा परिणाम होणार नाही असे श्रीमहाराज म्हणाले होते. पूर्वी Current नांवाचे एक पाक्षिक निघत असे. त्यात सरकारच्या दिरंगाईमुळे फुकट जाणाऱ्या गोष्टींची यादी देणारा एक स्तंभ असे. श्रीअरविंदांनीही हाच प्रश्न मांडला आहे. मानवी दृष्टीने असे वाटते की सृष्टीत बरेच काही वाया जाते. पण ईश्वराचे planning आपल्याला कसे समजणार? त्याचे नियोजन अतिशय योग्य आणि बरोबर असणारच. पू. बाबा पुढे म्हणाले, या गोष्टींचा परिणाम अगदी आपल्या कुटुंबावर झाला तरी ही ईश्वराची योजना आहे, योग्य आहे याची जाणीव राहावी. फार तर मला ते सहन होत नाही, पण ते बरोबरच आहे असे वाटावे. परिस्थिती आणि तीमध्ये घडणाऱ्या घटनांना विरोध हा एक प्रकारचा अहंकारच आहे.

अहंकार गेल्याखेरीज नामात रस येणार नाही. स्वत:ला आपल्या गुरूंना अथवा भगवंताला दिले पाहिजे. मी तुझा आहे असा भाव वाढवावा म्हणजे ते

सोपे होईल. आपण नाम स्थूलात पाहतो. स्थूल, सूक्ष्म आणि अतिसूक्ष्म अशा तीन पायऱ्या आहेत. आपले मन सूक्ष्म झाल्याखेरीज नामात रस येणार नाही.

## |३१८| (१९ मार्च १९९३

**पू. बाबा :** आज मी खूप आनंदात आहे. त्याचे कारण सांगतो. आपल्या येथे रविवारी प्रवचनाला येणारे एक गृहस्थ आहेत. त्यांच्या पत्नीला क्षय झाला आहे. मध्यंतरी प्रकृती फारच बिघडली होती. घरी करायला कोणी नाही. आजार हा असा (म्हणजे संसर्गजन्य) त्यामुळे कोणी नातेवाईक येऊन राहात नाही. त्यामुळे यांनाच सगळे करावे लागते. श्रीमहाराजांनी मला सांगितले आहे की लोकांना धीर द्यावा. म्हणून मी त्यांना म्हणालो की काळजी घ्यावी, बरे वाटेल. मात्र श्रीमहाराजांनी सांगितलेले औषध - तुळस आणि ज्येष्ठमधाचा काढा - त्यांना नियमित द्यावा. माझा इन्फ्लुएंझाही या काढ्यानेच बरा झाला होता. हे औषधही श्रीमहाराजांनी केव्हा सांगितले ते सांगतो. श्री.--- यांच्या मुलाला क्षय झाला होता. त्या काळात क्षयावर आजच्यासारखी प्रभावी औषधेही नव्हती. श्रीमहाराजांना (पेटीवर) त्या मुलाला क्षय झाल्याचे सांगितल्यावर श्रीमहाराज म्हणाले, त्यांना (मुलाच्या वडिलांना) सांगा, आपल्याला सर्वांनाच क्षय आहे. त्यांच्या काही लक्षात येईना तेव्हां मला म्हणाले त्यांना समजावून सांगा. शरीर आहे त्याला क्षय आहेच. तथापि घाबरण्याचे कारण नाही. तुळस आणि ज्येष्ठमधाचा काढा द्या म्हणजे बरे वाटेल. पुढे तो बरा झाला.

हे जे गृहस्थ मी सांगितले ते पत्नीचे सर्व करतात आणि शक्य तितका जप करतात. त्यांनी आपला अनुभव सांगितला. ते जप करत बसले होते तेव्हां त्यांना जाणवले की बाहेरून जप चालू आहे तसा आत हृदयातही जप चाललेला आहे. त्यांच्या मनात आले की हे बाहेरचे आणि आतले द्वंद्व थांबून जप आत जावा. थोड्याच वेळात जप हळूहळू आत उतरू लागला. ते दोन्ही जप जेव्हा एक झाले तेव्हां त्यांचे शरीर लाकडासारखे झाले. हातपाय हलवता येईनात पण शरीरभर आनंद भरून राहिला. ही अवस्था काही काळ टिकली.

दुसरा अनुभव मानसपूजा करतांनाचा आहे. त्यांची कल्पनाशक्ती तरल आहे. त्यामुळे मानसपूजेतही विविध प्रकारची फुले, वस्त्रे, अलंकार इत्यादींचा ते उपयोग करतात. एक दिवस मानसपूजा करतांना श्रीमहाराजांच्या चेहेऱ्याभोवती त्यांना निळे तेजोवलय दिसू लागले. हा भास होतो आहे काय असे वाटले. तथापि त्यातच ते हरवून गेले. भानावर आले तेव्हां श्रीमहाराजांना

आंघोळ घालत होते ती अर्धीच झाली आहे हे लक्षात आले! असेच आणखी एकदा ते जप करीत बसले होते आणि त्यांना लहानसे निळे आकाश आणि त्यामधे श्रीमहाराज दिसू लागले. डोळे उघडले की ते दृश्य नाहीसे होई व डोळे मिटले की पुन्हा दिसू लागे. त्यामुळे डोळे मिटून बसून राहावे असे त्यांना वाटू लागले. चित्ताकाश म्हणतात ते हेच.

कसे अनुभव येतात पहा! त्यांनी मला काय अनुभव येईल म्हणून विचारले होते तेव्हां देहापासून वेगळे होण्याचा अनुभव येईल असे मी त्यांना म्हणालो होतो. आता मी त्यांना सांगितले आहे की परत असे काही दिसले नाही तर ते मागू नका. श्रीमहाराज म्हणत की हे अनुभव म्हणजे वाटेवरचे दगड किंवा खुणा आहेत. तुम्ही पुढे जाल तसे ते नाहीसे होणारच.

अखण्डानंदांनी एका संस्कृत पुस्तकाचा हिंदी भाषेत अनुवाद केला आहे त्यातला काही भाग तुम्हांला दाखवायचा आहे. नाम आणि रूप यांसंबधी नेहमी चर्चा चालते. या पुस्तकात एका साधकाने म्हटले आहे, "रूपसे मुझे क्या काम है? नामनरेश मेरी जिह्वापर अखंड नृत्य करता है। उपांशु जपसे वैखरी जप श्रेष्ठ है।" दुसरा एक महापंडित रोज हातावर लिंगाची पार्थिव पूजा करीत असे. त्याला त्रिशूलधारी शंकरांनी साक्षात् दर्शन दिले!

मी माझ्या आनंदाचे कारण सांगितले. आपल्याला काय अनुभव आला पाहिजे आणि तो का येत नाही ते सांगा.

**साधक प :** आपण दृश्याच्या पलीकडे जाऊच शकत नाही. अनुभव मागणे हेही दृश्यातलेच आहे. प्रकाश, नाद, चव हे सगळे इंद्रियांना जाणवणारे दृश्यातले अनुभव आहेत आणि हे अनुभव मागणेच चुकीचे आहे; कारण अनुभव यावा म्हणण्यात आपण साधनाचा मूळ उद्देश विसरतो आणि अनुभव आले तरी त्यामुळे निष्ठा वाढून पुढे जाण्याऐवजी माणूस त्या अनुभवातच रमतो. विवेक करून मन आत वळायला पाहिजे ते वळत नाही.

**पू. बाबा :** आणि अगदी अनुभव पाहिजे म्हटले तरी त्यासाठी तुकाराम महाराजांसारखी तळमळ पाहिजे. 'निद्रेसी न लगे डोळा' अशी त्यांची स्थिती झाली होती.

**साधक ब :** अंत:करण शुद्ध झाल्याखेरीज ते होणार नाही. त्यासाठी नामाचाच आधार घेतला पाहिजे. साखरेचा पाक करतांना जशी वर येणारी मळी काढून टाकली की तो शुद्ध होतो तसे साधनानेच अंत:करण शुद्ध होईल. मग अनुभव येतील किंवा येणार नाहीत. मुद्दाम त्यांच्यामागे जाण्याची आवश्यकता नाही.

चर्चा चालू असतांना एक बाई पू. बाबांना भेटायला आल्या त्यामुळे ही चर्चा अपुरी राहिली. त्या बाई म्हणाल्या की त्यांच्या सुनेला फीटस् येतात. लग्नाच्या आधी क्वचित येत पण आता प्रमाण वाढले आहे. पू. बाबांनी सांगितले की सुनेला ॐ नमः शिवाय या मंत्राचा तेरा लक्ष जप करायला सांगा. तुमचा त्रयोदशाक्षरी जप चालूच ठेवा. येथे येण्यापूर्वी त्या श्रीमहाराजांचे दर्शन घेऊन आल्या होत्या. तथापि पू. बाबांनी परत जातांना पुन्हा दर्शन घेऊन हे सर्व श्रीमहाराजांना सांगा म्हणून सांगितले. ते म्हणाले सुनेचे दुखणे जुनाट आहे. ते पूर्ण बरे होणार नाही. पण तेरा लक्ष जप झाल्यावर वर्षात एक दोन वेळाच फीट येईल. श्रीमहाराजांनी सांगितले म्हणूनच हा उपाय मी तुम्हांला सांगत आहे; पण पुन्हा एकदा त्यांची प्रार्थना करून जा.

## ।३१९। (२६ मार्च १९९३)

**साधक ब** : एक विचारायचं आहे. श्रीमहाराजांचं अस्तित्व कसं आहे ? त्या अस्तित्वाची जाणीव कशी व्हायची ? श्रीमहाराज आहेत. मी नामात आहे असं त्यांनी सांगितलं आहे. सद्गुरूंकडून येणाऱ्या नामात सद्गुरूंची जाणीव आहे असंही त्यांनी सांगितलं आहे. आपण जे नाम घेतो ते सद्गुरूंकडूनच येत असते. त्या नामात त्यांची जाणीव आहे. आपल्याला जाणिवेची ओळख बरोबर आहे. कोणतीही वस्तू अगर घटना आपण जाणिवेनेच जाणतो. म्हणजे विशेष साधन असे न करताही आपल्याला जाणिवेची ओळख आहे. या जाणिवेत श्रीमहाराजांची जाणीव आणता आली की अनुसंधान साधले. श्रीमहाराजांच्या जाणिवेचे स्वरूप काय असावे ते कळले तर आपल्याला त्यांना आपल्या जाणिवेत आणता येईल किंवा आपली जाणीव त्यांच्या जाणिवेपर्यंत नेण्याचा प्रयत्न करता येईल. हे सगळे क्वचित उलगडल्यासारखे वाटते पण पुन्हा अस्पष्ट होते. पुन्हा वाटते की content of conscious is consciousness. कॉन्शसनेसचा person's thoughts and feelings as a whole असा अर्थ डिक्शनरीत दिला आहे. म्हणजे श्रीमहाराजांची जाणीव केवळ नामाने भरलेली असू शकते. ते नामस्वरूप, नामावतारच आहेत. पण हा भाव टिकत कां नाही ? पुसट कां होत जातो ? माझ्या जाणिवेत त्यांना कसे धरून ठेवायचे ? कारण जाणीवच सर्व काही आहे. (पहा : अध्यात्म संवाद भाग ३, संवाद २८२)

**पू. बाबा** : याचे कारण उघड आहे. आज माझी जाणीव माझ्या देहाला व्यापून आहे. इतकेच नव्हे तर, मी देह आहे अशा जाणिवेचा पगडा इतका

जोरदार आहे की शेवाळ बाजूला झाले की थोडा वेळ त्याखालचे पाणी दिसावे आणि पुन्हा ते शेवाळाखाली झाकले जावे तसे मी देह नाही, 'माझा' देह म्हणणारा दुसराच कोणी साक्षी आहे असा भाव क्वचित येतो आणि तेवढ्यापुरती जाणीव सूक्ष्म बनते. आपल्या जाणिवेचा त्यांच्या जाणिवेशी स्पर्श होतो पण पुन्हा लगेच आपण स्थूलात येतो. म्हणजे जाणिवेच्या पातळ्या आहेत. जाणिवेच्या खालच्या पातळीवरून आपण आपले दैनंदिन व्यवहार करू शकतो. याच्या वरच्या पातळीवर जाण्यासाठी श्रीमहाराजांना शरण गेले पाहिजे. स्वत:कडे साक्षीभावाने पहाता आले पाहिजे. काही प्रमाणात आपण तसे पाहतोही. मी देहाहून कोणीतरी वेगळा आहे असे वाटते, पण ते स्थिर राहात नाही.

**साधक प :** देहाहून मी कोणीतरी वेगळा आहे असे विचार करतांना वाटले तरी प्रत्यक्ष जीवनात आपले देहाशी तादात्म्य होते. अंगातला शर्ट जसा माझ्याहून वेगळा आहे तसा देह वेगळा वाटत नाही किंवा मी जशी मोटार चालवतो तसा हा देह चालवतो आहे असे वाटत नाही.

**पू. बाबा :** बरोबर आहे. साक्षीभाव वाढायला पाहिजेच. पण त्यापेक्षाही महाराजांचा भर अनुसंधानावर आहे. अखंड नामस्मरण आणि भगवंताचे अनुसंधान याशिवाय मला काहीही प्रिय नाही असे त्यांनी म्हटले आहे. म्हणून अनुसंधान ठेवायचा प्रयत्न केला पाहिजे.

**साधक प :** खरे म्हणजे आज मी जे साधन करतो तेही तेच करून घेत आहेत हे पटले तर मीपणा कमी होईल आणि साधन चालेल. ते नामस्वरूपच आहेत आणि त्यांच्या शक्तीनेच माझे साधन होते हे आतून पटले पाहिजे.

**पू. बाबा :** अनुग्रहाचा तोच अर्थ आहे. ते नाम देतात आणि आपण नाम घेतो ते त्यांच्या सत्तेने घेतो. नामस्मरणाने मी विरघळला पाहिजे. तो विरघळू लागला की शरणागती येईल.

**साधक प :** शरणागतीची अवस्था आपोआप येईल. मी शरण जातो म्हणून होणारी ती गोष्ट नाही.

**साधक ब :** इतके कशाला! आश्वासनात त्यांनी म्हटले आहे, रात्रंदिवस चित्तात आणावे की मी तुम्हांला शरण आहे, मला शरण व्हायला शिकवा. नामाला शरण जा. मी नामाहून वेगळा नाही.

**साधक ग :** मला वाटते, हा एक मार्ग झाला. दुसरा अगदी देहबुद्धीच्या बाजूने विचार केला, मी साधन करतो म्हटले तरी माझ्या शक्तीने जेवढे शक्य

आहे तेवढे मी केले; यापेक्षा जास्त होत नाही अशी खरी स्थिती झाली म्हणजे शरणागती येईल.

**साधक क :** कोणत्याही बाजूने विचार करा, शरणागतीसाठी तळमळ आवश्यक आहे. त्यासाठी ध्येय पक्के झाले पाहिजे. आता मी नामस्मरणासाठीच जगतो असे वाटले पाहिजे. तसे वाटते का याचा आपल्याशीच विचार केला की पुष्कळशा प्रश्नांची उत्तरे मिळतात.

**साधक ब :** तळमळ नाही असेही नाही. पण हे मन मोठे विचित्र आहे. श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवले तरी मन ते टिकू देत नाही. महाराजांनी ज्याला अनुग्रह दिलेला असतो त्याला ते आपला म्हणतात. त्यांनी धरून ठेवलेले असते. त्यांची जाणीव सर्वत्र असली तरी माझ्या जाणिवेची पातळी त्यांच्या पातळीजवळ गेली की त्यांना माझी आठवण होते. नाम घेऊन मी त्यांची आठवण करतो तेव्हां त्यांनाही माझी आठवण होते. त्यांनी लष्करातल्या घोड्यांवर मारलेल्या शिक्क्यांचे उदाहरण दिले आहे. त्यांना त्यांचे शिष्य बरोबर ओळखता येतात. (पहा : अध्यात्म संवाद भाग २, संवाद क्र. १४९)

**पू. बाबा :** श्री. रामकृष्ण दामले आजारी होते. (पहा. अध्यात्म संवाद भाग १, संवाद क्र. ५९ व ८९) रोज दिनकर (श्री. दिनकरराव केतकर) हॉस्पिटलमधे जात असे. संध्याकाळी घरी आला की श्रीमहाराज त्याच्याजवळ रामकृष्णाच्या प्रकृतीची चौकशी करीत असत. एक दिवस त्याने श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारले की तुम्हांला त्याची रोज का आठवण होते? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की तो रोज माझी आठवण करत असला पाहिजे, म्हणून मलाही त्याची आठवण होते.

**साधक क :** एका ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की माझा माणूस दुश्चित झाला तर मला ते लगेच कळते. मी हा दुश्चितपणा कोणत्या गावातून, कोणत्या रस्त्यावरून, कोणत्या घरातून आला आहे ते पहातो. दुश्चित माणसाजवळ राहायला मला कष्ट होतात. नाम जवळ असणाराने दुश्चित होऊ नये.

**साधक प :** साधन आणि शरणागती यांच्या आड आपला अहंकार येतो. मी करतो म्हणून होणारी ती गोष्ट नाही. त्यांनी सांगितले आहे म्हणून मी करतो येवढाच भाव पाहिजे. हीच श्रद्धा. शेवटी साध्य आणि साधन एकच आहेत. पण ते शेवटी आहे, सुरुवातीला नाही आणि हे विचाराने समजणारे नाही.

**साधक ग :** आणि आपला विचार शुद्ध विचार नसतो. त्यात विकल्प असतो.

**पू. बाबा** : आणखी एक मुद्दा मला आत्ता आठवला. आपण इंद्रियांद्वारा आनंद घेतो, रस घेतो तो दृश्यातला असतो. तसा नामातून रस आला, नामाची गोडी लागली की जाणीव सूक्ष्म होण्यासाठी आवश्यक तेवढे नामसाधन आपोआप होईल.

**साधक क** : विषयातून मिळणाऱ्या सुखापेक्षा वरच्या दर्जाचे दु:खविरहित शाश्वत सुख आहे आणि ते नामसाधनाने मिळते असे संत सांगतात. साधन करतांना त्या आनंदाची थोडी झलक मिळाली तरी मग साधकाला आणखी नाम घे म्हणून सांगावे लागणार नाही.

**पू. बाबा** : नामाचे महत्त्व किती म्हणून सांगावे? कासेगावकर वैद्यांना सांगतांना महाराजांचा कंठ दाटून आला, म्हणजे काय असेल! माणसाला शांती पाहिजे. नामाने ती मिळते. शांती हा जीवनाचा मूळ आधार आहे. ज्ञानेश्वरीतही शांत रस मुख्य आहे. अकराव्या अध्यायाची सुरुवात करतांना ज्ञानेश्वर महाराजांनी शांत रसाच्या घरी या अध्यायात अद्‌भुत रस पाहुणा आला आहे असे म्हटले आहे. "जेथ शांताचिया घरा। अद्‌भुत आला पाहुणेरा। आणि येरांही रसा पांतिकरा। जाहला मानु॥ २॥" लग्नसमारंभात वधुवरांबरोबर इतर वऱ्हाडी मंडळींचेही मानपान होते, तसे शांत रसाच्या घरी अद्‌भुत रसाचाच पाहुणचार झाला असे नसून इतर रसांचाही मान-सन्मान झाला. "अहो वधुवरांचिये मिळणीं। जैशीं वराडियांही लुगडीं लेणीं। तैसें देशियेचां सुखासनीं। मिरविले रस॥ ३॥"

**साधक प** : म्हणजे बैठक शांतीची आहे.

**साधक ब** : श्रीमहाराज म्हणाले की तुमच्या मनात काय आहे ते ओळखून सुद्धा तुम्ही नाम घेता म्हणून मी तुमच्या मागे-पुढे चालतो. यावरून कळते की नाम घेतांना त्याखेरीज जे अन्य विचार मनात येतात ते त्यांना कळतात आणि तरीही ते आमच्याकडे दयाशील वृत्तीने पाहतात. यावरून त्यांच्या आपल्यावरील प्रेमाची कल्पना येते.

## ।३२०। (२ एप्रिल १९९३)

**पू. बाबा** : दोन दिवसांपूर्वी ठाण्याचे एक गृहस्थ मला भेटायला आले होते. त्यांनी स्वामी स्वरूपानंदांकडून अनुग्रह घेतला होता. स्वामींनी त्यांना सोऽहं मंत्राची दीक्षा दिली होती आणि जप कसा करायचा तेही सांगितले होते. त्याप्रमाणे ते करू लागले की प्रथम भ्रूमध्य व नंतर सर्व डोके दुखू लागे म्हणून

ते स्वामींना पुन्हा भेटले तेव्हां त्यांनी सोऽहं ऐवजी त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप करायला सांगितले आणि विचारले की तुला काय पाहिजे? हे गृहस्थ म्हणाले की मला भक्ती पाहिजे. तेव्हां स्वामी म्हणाले की ती तर शेवटची अवस्था आहे. आज मी तुला आसक्ती देतो. गुरु, नाम किंवा भगवंताची आसक्ती वाढव. हे गृहस्थ नंतर उठून आले पण स्वामी आसक्ती देतो म्हणाले म्हणजे काय ते त्यांना समजले नाही. पुढे स्वामींनी देह ठेवला आणि ते विचारायचे राहून गेले म्हणून ही आसक्ती ठेवायची म्हणजे काय हे विचारायला ते आले होते.

मी त्यांना प्रथम आसक्ती शब्दाचा अर्थ सांगितला. हा शब्द संज् धातूपासून बनला आहे. संज् म्हणजे चिकटणे. आ + संज्, आ म्हणजे सर्व बाजूंनी. आसक्ती म्हणजे सर्व बाजूंनी चिकटणे. मी त्यांना विचारले, संसारात तुम्ही असे कशाला चिकटलेले आहात? पैशाला? ते नाही म्हणाले. मग मुलाबाळांना? त्यांना मुलगा नाही; तीन मुली. पैकी दोघींची लग्ने झालेली आणि तिसरी डेंटल कॉलेजात शिकते. तीच नेहमी येथे येते आणि त्या दिवशी त्यांना घेऊन आली होती. ते गृहस्थ म्हणाले की त्यांनाही मी चिकटलेला नाही. मग मी विचारले की बाकी काही नाही तरी देहाला चिकटलेले आहात ना? ते म्हणाले, होय. मग मी म्हणालो, देहाला काही कमीजास्त झाले की जीव जसा कासावीस होतो तसे गुरु, नाम किंवा भगवंत यांच्या बाबतीत होईल असे स्वामींनी तुम्हांला सांगितले. त्यांना आणखीही काही सांगून त्यांचे समाधान केले. पण मला सांगा की हे चिकटणे म्हणजे काय? ते कसे घडते? आणि एक सांगतो की ज्याला आपण चिकटतो त्याचा वियोग आपल्याला सहन होत नाही. तद्वियोगे परमव्याकुलता. तेव्हां आपण कशाला चिकटलो आहो ते सांगा.

**साधक प** : तुम्ही सांगितलेत तेच खरे आहे. आम्ही देहाला चिकटलेले आहोत. त्याच्याखेरीज आज मला अस्तित्वच नाही.

**पू. बाबा** : असे कां म्हणता? आपण देहाहून कोणीतरी वेगळे आहोत असेही आपल्याला वाटते.

**साधक क** : असे क्वचित वाटते पण ते वाटणे टिकत नाही. आपल्याला मिळणारी सुखे इंद्रियांद्वारा ह्या देहातूनच मिळतात आणि ह्या सुखांवरच अवलंबून असल्याने मी देहाला चिकटलो आहे.

**पू. बाबा** : सुख किंवा दु:ख देहाला होते की मनाला?

**साधक ग** : काही दु:खे शारीरिक असतात. उदाहरणार्थ आजार होतो आणि मन अस्वस्थ होते. पण काही वेळा वाटणारी काळजी किंवा भीती

मुख्यत: मानसिक असते. तथापि हे खरे की विषयांचा भोग इंद्रियांच्या द्वारा मनच घेते.

**पू. बाबा :** पण या दु:खाच्या मुळाशी मी आणि माझे असते. आसक्तीचे मूळ कशात आहे?

**साधक ज :** आसक्तीचे मूळ वासनेत आहे. अमुक हवे किंवा तमुक नको अशी वासना होते आणि त्या वासनेतूनच आसक्ती येते. आपल्या सगळ्या वृत्ती वासनेतून येतात. आपला जन्मच वासनांतून झाला आहे.

**पू. बाबा :** मला वाटते साधनचतुष्टय यासाठीच सांगितले आहे. विवेक आणि वैराग्य असल्याखेरीज पुढे जाता येणार नाही. नामाची आसक्ती वाटू लागली की मन त्यामधे रमेल. आपल्याला कशाची आसक्ती आहे?

**साधक ग :** आपली आसक्तीही अनेक ठिकाणी वाटलेली आहे. आपल्या वासना वृत्तींमधून प्रगट होतात आणि वृत्ती एकसारख्या बदलत असतात. तुलसीदासांनी रामचरितमानसाच्या अखेरीस आसक्तीच्या भाषेतच भक्ती मागितली आहे. ते म्हणतात

कामिहि नारि पिआरि जिमि लोभिहि प्रिय जिमि दाम।
तिमि रघुनाथ निरंतर प्रिय लागहु मोहि राम॥
उत्तरकाण्ड १३० (ख)

**पू. बाबा :** श्रीरामकृष्णही असेच सांगत. ते म्हणत की ईश्वरासाठी डोळ्यातून पाणी आले की तो दूर नाही. अगदी साध्या साध्या उदाहरणांतून त्यांचा उपदेश असे. गरोदर स्त्रीचे उदाहरण त्यांनी दिले आहे. सून गरोदर आहे म्हटल्यावर सासू तिला हळूहळू हलके काम देऊ लागते आणि दिवस भरत आले की पूर्ण विश्रांती. तसे नामामधे माणूस रमू लागला की हळूहळू त्याचा व्यवहार कमी होऊ लागतो आणि शेवटी त्याचे महत्त्वच नाहीसे होते.

**साधक :** विवेकानंदांचे नाही का! उदरनिर्वाहाचे साधन मागण्यासाठी ते तीनदा कालीमातेपुढे गेले पण मागितली भक्ती. एखाद्याला काही सांगायचे झाले तर त्याचे चित्रच मला समोर दिसते असे श्रीरामकृष्ण म्हणत. धान कांडणाऱ्या बाईचे उदाहरण त्यांनी दिले आहे. एका वेळी तीन-चार गोष्टी ती करत असते. पण मुख्य लक्ष हातावर मुसळ बसणार नाही इकडे असते. तसे संसारात काही करा पण साधनाच्या बाबतीत सावध रहा हे सांगतांना त्यांना धान कांडणारी बाई डोळ्यासमोर दिसत होती.

**साधक ग** : श्रीमहाराजांचे चरित्रही असेच आहे. 'श्रीरामकृष्ण लीलाप्रसंग' वाचून नंतर श्रीमहाराजांचे चरित्र वाचत होतो तेव्हां हेही 'श्रीमहाराजांचे लीलाप्रसंग' आहे असे वाटले.

**पू. बाबा** : ही आसक्तीची कल्पना चांगली आहे. आपल्याला आसक्तीचा अनुभव आहे. नामाची आसक्ती वाटू लागली की काम झाले. व्यवहारात जिला आसक्ती म्हणतात तिलाच परमार्थात भक्ती म्हणतात असे श्रीमहाराजांचे वचन आहे.

**साधक क** : आसक्तीचे भक्तीत भावांतर होऊ शकते. गोपींचे उदाहरण आहेच. सुरुवातीला त्यांचे कृष्णावरचे प्रेम मानवी पातळीवरचेच होते. पण तो कृष्ण परमात्मा निघाला आणि ते प्रेम दिव्य झाले. विवेकानंद एकदा श्रीरामकृष्णांना म्हणाले की कृष्णचरित्रातील राधा हे पात्र काल्पनिक आहे. अशी कोणी राधा नव्हतीच. यावर श्रीरामकृष्ण म्हणाले, नसेना का! पण ज्याच्या कोणाच्या मनातून ती निर्माण झाली त्याचा तो भाव आणि प्रेम खरे होते ना?

**साधक ज** : वास्तविक देहाला instrumental value (साधन मूल्य) आहे. पण प्रपंचात आणि परमार्थातही देह हे साधन आहे हे आपण विसरतो.

**साधक ग** : माणसाचे देहावरही खरे प्रेम आहे असे म्हणता येणार नाही. खरे प्रेम वासनांच्या तृप्तीचे आहे. देहावर खरे प्रेम असते तर डायबेटीस (मधुमेह) असणाऱ्या माणसाने कुपथ्य केले नसते.

**पू. बाबा** : काही म्हणा, सगुणाचे प्रेम ही और चीज आहे. नागमहाशयांना विवेकानंदही मानीत असत. नागमहाशयांच्या मनात संन्यास घ्यायचा विचार होता. पण श्रीरामकृष्णांनी नको म्हटल्यावर त्यांनी पुन्हा त्याचा विचारही केला नाही. तसेच रामकृष्णांनी खायला आवळा मागितल्यावर आवळ्याचे दिवस नसतानाही ठाकूरांनी मागितला त्या अर्थी कोठेतरी तो मिळणारच या श्रद्धेने तीन दिवस आसपासच्या बागांत हिंडून त्यांनी एक आवळा मिळवला आणि तो श्रीरामकृष्णांना दिला. ही खरी भक्ती.

**साधक ग** : 'रामचरितमानस'मध्ये तुलसीदासांनी भक्तीचे महत्त्व सांगतांना उत्तरकाण्डात एक छान प्रसंग दिला आहे. श्रीराम प्रभूंनी प्रसन्न होऊन काकभुशुंडीला वर माग म्हणून सांगितले. ज्ञान, वैराग्य, विवेक, मोक्ष आदि सर्व काही देतो म्हणाले. काकभुशुंडीनी विचार केला की हे बाकी सगळे देतो म्हणतात पण भक्ती देतो म्हणत नाहीत. मूळ दोहा आणि चौपाया अशा आहेत :

काकभसुंडि मागु बर अतिप्रसन्न मोहि जानि।
अनिमादिक सिधि अपर रिधि मोच्छ सकल सुख खानि॥ ८३ (ख)॥
ग्यान बिबेक बिरति बिग्याना। मुनि दुर्लभ गुन जे जग नाना॥
आजु देउँ सब संसय नाहीं। मागु जो तोहि भाव मनमाहीं॥ ८३.१॥
सुनि प्रभुबचन अधिक अनुरागेउँ। मन अनुमान करन तब लागेउँ॥
प्रभु कह देन सकल सुख सही। भगति आपनी देत न कही॥ ८३.२॥

**साधक क** : श्रीरामकृष्णांनीही असेच म्हटले आहे. ईश्वर सगळे काही द्यायला तयार असतो पण भक्ती मात्र सहजासहजी देत नाही; कारण मग तो भक्ताचा बंदिवान होतो. श्रीमहाराजांच्या चरित्रात नाही का! त्यांना बरे नव्हते तेव्हा रामाच्या मूर्तीच्या डोळ्यातून अश्रू आले!

**साधक प** : श्रीकृष्णाने प्रसाद खाल्ला हे कृष्णप्रेम आणि त्यांच्या गुरु यशोदा माँ यांनीच पाहिले. पण येथे तर रामाच्या डोळ्यातले अश्रू सर्वांना दिसले हे विशेष आहे.

**साधक ग** : भगवंतासाठी भक्ताच्या डोळ्यात अश्रू येणे आपण समजू शकतो पण येथे भक्तासाठी भगवंताच्या डोळ्यात अश्रू आले! श्रीमहाराजांचे चरित्र हा त्यांचा लीलाप्रसंग आहे असे मी उगीच म्हणत नाही.

**पू. बाबा** : कोरड्या ब्रह्मज्ञानापेक्षा सगुणाची भक्ती वेगळीच आहे. सीता स्वयंवरासाठी विश्वामित्र ऋषींबरोबर आलेले राम, लक्ष्मण पाहून ब्रह्मज्ञानी जनकाच्या मनात देखील प्रेम निर्माण झाले आणि त्याने विश्वामित्रांना विचारले की हे निर्गुण निराकार ब्रह्मच साकार झाले आहे काय?

**साधक क** : आणि विश्वामित्रांनीही स्पष्ट उत्तर न देता तू खोटे कसे बोलशील असे म्हटले.

**साधक ग** : मूळ चौपाया अशा आहेत. जनक विश्वामित्रांना विचारतो :

कहहु नाथ सुंदर दोउ बालक। मुनिकुल तिलक कि नृपकुल पालक॥
ब्रह्म जो निगम नेति कहि गावा। उभय वेष धरि की सोइ आवा॥ बालकाण्ड २१५.१॥
सहज बिराग रूप मनु मोरा। थकित होत जिमि चंद चकोरा॥
ताते प्रभु पूछउँ सतिभाऊ। कहहु नाथ जनि करहु दुराऊ॥ २१५.२॥
इन्हहि बिलोकत अति अनुरागा। बरबस ब्रह्मसुखहि मन त्यागा॥
कह मुनि बिहसि कहेहु नृप नीका। बचन तुम्हार न होइ अलीका॥ २१५.३॥

**पू. बाबा** : काही म्हणा! नामाचे प्रेम आले पाहिजे. सगुणातून नामाकडे जायचे आहे. नाम थांबले तर जीव कासावीस झाला पाहिजे. आत्तापर्यंत चर्चा पुष्कळ झाली. आता काहीतरी झाले पाहिजे.

## ।३२१। (९ एप्रिल १९९३)

लिहून पूर्ण झालेले नोटबुक पू. बाबांना वाचायला दिले. ते चाळता चाळता गोंदवल्याला मांडव्याचे श्री. देशपांडे यांनी अमृतानुभवातील एका ओवीचा अर्थ विचारला होता ती ओवी पू. बाबांनी पाहिली आणि त्या ओवीच्या संदर्भातच ते सांगू लागले.

ओवी अशी : सर्व शून्याचा निष्कर्षु। जिया बाइला केला पुरुषु।
जेणें दादुलेन सत्ताविशेषु। शक्ति जाली॥ १.२७॥

**पू. बाबा** : पेणचे श्री. मामा फडके - अमलानंद हे पावसच्या स्वामी स्वरूपानंदांचे शिष्य होते, ह्या ओवीच्या संदर्भात स्वामी त्यांना म्हणाले की ब्रह्म हे एकले एक आणि रुक्ष आहे. त्याला संतांनी सगुणात म्हणजे प्रकृतीच्या क्षेत्रात आणले. सर्व दृश्य जगाची निर्मिती प्रकृतीने किंवा शक्तीनेच केली, पण ती ब्रह्माच्या आधिपत्याखाली. ब्रह्माला अशाप्रकारे माया व्यापते. पण भक्ती ही स्त्री असल्याने मायेचा तिच्यावर काही परिणाम होत नाही.

**साधक ग** : रामचरितमानसमध्येही गरुडाने काकभुशुंडीस ज्ञान आणि भक्ती यांमधील भेद विचारला तेव्हा काकभुशुंडी म्हणाला की ज्ञानी पुरुषाला माया भुलविते पण भक्ताच्या बाबतीत भक्ती ही पण स्त्री असल्यामुळे माया तिला भुलवू शकत नाही. 'मोह न नारि नारि के रूपा। पन्नगारि यह रीति अनूपा॥'

**पू. बाबा** : भक्तीमधे भावना आहे, रस आहे. म्हणून नामस्मरण करतांना प्रेम म्हणजे आपलेपणा वाटला पाहिजे. मागच्या शुक्रवारी आपण पाहिले की इतर कशाची नसली तरी आपल्याला देहाची आसक्ती आहे, प्रपंचाची आसक्ती आहे. ती भगवंताकडे वळविणे हे साधन आहे. त्यासाठी नामस्मरण हा उपाय असतांना ते आपल्या हातून का होत नाही? त्याच्यासाठी लागणारा आपलेपणा कसा निर्माण करायचा?

**साधक ज** : आपले सगळे प्रयत्न आपल्या वासना तृप्त करण्यासाठी चाललेले असतात आणि सगळ्या वासनांची तृप्ती झाली असे कधीच होत नाही.

**पू. बाबा :** आपल्याला श्रीमहाराजांनी नाम दिले आहे. ते म्हणाले की नाम हा माझा प्राण आहे. म्हणूनच ब्रह्मानंद महाराज म्हणत की नाम हा महाराजांचा आवाज आहे. कसे सुचले असेल त्यांना हे!

**साधक ब :** म्हणूनच मी म्हणतो की ते कसे आहेत ते मला माहीत नाही पण अंधारातदेखील हा आवाज त्यांचा (श्रीमहाराजांचा) आहे असे ओळखता आले तरी केवढा धीर येऊन साधनात उत्साह वाढेल.

**पू. बाबा :** श्रीमहाराज आहेत या भावनेने आपण नाम घेतो का? भावनेमुळे कृतीला जोर येतो. ती भावना आपल्या ठिकाणी नाही. विचाराला आपण जास्त महत्त्व देतो, पण त्यावरही पूर्णपणे अवलंबून राहात नाही.

**साधक क :** कोणतीही गोष्ट भावनेपर्यंत पोचायला त्या गोष्टीचे प्रेम तरी पाहिजे नाहीतर द्वेष तरी पाहिजे. द्वेषाचे राहू द्या; पण प्रेम सहवासाने निर्माण होते. म्हणून सत्संगती पाहिजे.

**पू. बाबा :** होय. पण तो खरा सहवास झाला पाहिजे ना? ते ज्या पातळीवर आहेत त्याच्या थोडे तरी जवळपास जायला नको का?

**साधक प :** ती पातळी तर राहू द्याच; पण नामाला बसले की एरवी न येणारे विचार मनात येतात आणि आपण त्यांच्या मागून जातो, ते थांबले पाहिजे.

**पू. बाबा :** म्हणजे भूतकाळ विसरा, भविष्याचा विचार करू नका आणि वर्तमानात जगा.

**साधक प :** भूतकाळाचा विचार करून काहीही साधत नाही हे आत ठसले तर भूतकाळ नाहीसा होईल. म्हणजे त्याचे स्मरण राहिले तरी साधनात त्याचा त्रास होणार नाही.

**साधक ब :** आपल्या मेंदूत जे tracks म्हणजे रुळलेले मार्ग आहेत ते प्रथम पुसले गेले पाहिजेत. त्याशिवाय त्यावर नवीन काही लिहिता येणार नाही.

**पू. बाबा :** ह्या सर्वांच्या मुळाशी आपले मन आहे, ते बदलायला पाहिजे. सारासारविवेक किंवा आत्मानात्मविवेक आणि त्याच्या बरोबरच दृढ निश्चयपूर्वक वैराग्य स्वीकारल्याखेरीज साधन नीट होणार नाही.

**साधक ब :** होय; मन हेच culprit (गुन्हेगार) आहे. ते स्वामित्वही गाजवते आणि त्याचवेळी तुमच्या ताब्यात असल्याचा भास निर्माण करते. म्हणूनच मनाच्या श्लोकात समर्थांनी त्याच्या दाढीला हात लावून त्याची विनवणी केली आहे.

**पू. बाबा** : होय. 'मना सज्जना भक्तिपंथेचि जावें.' महाराज म्हणत की हे मन सज्जन असते तर त्याला भक्ती कर म्हणून सांगावेच लागले नसते. (आमच्यापैकी एकांना) तुम्ही म्हणता तसं मन डँबिस आहे.

**साधक प** : त्यातला त्रास देणारा मुख्य भाग अहंकार आहे. त्याचा नाश ते कसा करू देईल? म्हणून नामस्मरण करू लागलात तर त्याच्यावरचा हल्ला ते इतर अनेक विचार निर्माण करून परतवून लावते.

**साधक** : तथापि नाथांनी म्हटल्याप्रमाणे ते मनच जर परमार्थाकडे वळले तर चारी मुक्ती दासी होतात. म्हणून ते परमार्थाकडे वळेपर्यंतच खरे कष्ट आहेत. एकदा ते वळले की काम झाले.

**पू. बाबा** : म्हणजेच आज जे मन बहिर्मुख आहे त्याला अंतर्मुख केले पाहिजे. थोडा त्रयस्थपणा आणून आज आपण कशाकशात गुंतलो आहोत त्याचा विचार करावा. पैसा, कामवासना, नावलौकिक, कर्म करायची हौस, कशात आपण किती प्रमाणात गुंतलो आहोत त्याचे निरीक्षण करून विवेकाने त्यातून बाहेर पडले पाहिजे. दुसरा मार्ग म्हणजे जे जे घडते आहे ते ते त्याच्या इच्छेने घडते आहे हे मान्य करून मनाला स्वस्थ बसायला शिकवले पाहिजे.

**साधक ज** : मला पहिला मार्ग जास्त योग्य वाटतो. त्याची इच्छा म्हणताना तो कोण ते मला अद्यापि माहीत नाही.

**साधक ग** : तथापि श्रीमहाराजांना दुसरा मार्ग जास्त पसंत आहे. राम इच्छा आणि राम कर्ता यांवर त्यांचा भर आहे.

**पू. बाबा** : सगळा मारा या मनावर आहे. ते पालटले की काम झाले.

## |३२२| (१६ एप्रिल १९९३)

**पू. बाबा** : परवा बुधवारी गिरगावातून एक गृहस्थ आणि त्यांची पत्नी भेटायला आले होते. गिरगावात तळवलकरबुवा म्हणून आहेत. त्यांनी श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतलेला आहे आणि तेही अनुग्रह देतात. त्यांच्याकडे हे दोघे जातात. त्या बुवांनी श्रीमहाराजांची प्रवचने वगैरेचा चांगला अभ्यास केलेला आहे. ते म्हणाले की साक्षीभावाने वागा आणि आसक्ती सोडा या दोन मुख्य गोष्टी श्रीमहाराजांनी सांगितलेल्या आहेत. त्यापैकी साक्षीभाव म्हणजे काय ते सांगा व लिहून द्या असे ते म्हणाले. साक्षित्व याचा अर्थ नुसते पहाणे - unbiased पूर्वग्रहरहित होऊन पहाणे असा आहे. आपण ज्या दृश्यात राहातो त्यापासून अलिप्त राहून पहाणे असे श्रीमहाराजांनी सांगितले होते.

त्यावेळी माझ्या मनात आले होते की नुसत्या पहाण्याने किंवा नुसत्या अलिप्त असण्याने काय होणार? माझ्या मनातला विचार ओळखून श्रीमहाराज म्हणाले, एक बाप होता. मोठा कडक शिस्तीचा होता. तो बाहेर गेलेला असतांना घरात मुले दंगा करीत होती. तो बाहेरून आला आणि जिन्यावर त्याच्या पावलांचा आवाज होताच घरात एकदम सामसूम झाले. त्या बापाला याचा पत्ताही नव्हता. वास्तविक इथे त्याने काय कर्म केले? तसे साक्षित्वात कर्म आहेही आणि नाहीही. हे साक्षित्व येण्यासाठी काय करावे?

**साधक प :** मी साक्षित्व आणीन म्हणून ते येणार नाही. जोपर्यंत आपला कर्मावर विश्वास आहे तोपर्यंत आपण अलिप्त होऊ शकत नाही. माझ्या कर्मामुळे दृश्यात बदल होतांना मला दिसतो आणि साक्षित्वात तर नुसते असणे आहे. माझ्या मते तेथे द्वैत राहातच नाही.

**साधक क :** हे पटत नाही. समर्थांनी किंवा इतर मोठ्या संतांनी साक्षित्वाबद्दल सांगताना द्वैतावर भर दिलेला आहे. द्वैताखेरीज साक्षित्व येणार नाही. तुम्ही म्हणता ती कदाचित शेवटची अवस्था असेल; माहीत नाही.

**पू. बाबा :** साक्षित्वासाठी आपल्याला स्वत:कडे वेगळेपणाने पहावे लागेल. म्हणजे जोपर्यंत अहंकार जात नाही तोपर्यंत साक्षित्व येणार नाही.

**साधक ज :** स्वत:चे कर्तृत्व खरे वाटते तोपर्यंत आपल्या जीवनात जे जे घडते ते प्रारब्धाने घडते असे वाटणार नाही.

**साधक क :** कर्तृत्व हे अहंकाराचेच व्यक्त रूप आहे. मी ज्ञाता आहे, मी कर्ता आहे आणि मी भोक्ता आहे असे जे वाटते ते त्या क्रमानेच नाहीसे होईल. साक्षित्वात भोक्तेपण नाही. मी साक्षी आहे ही ज्ञानाची भाषा आहे. त्या ऐवजी 'तो' पहातो आहे, जाणतो आहे, 'तो' कर्ता आहे ही भक्तीची भाषा समजायला जास्त सोपी वाटते.

**साधक ज :** आचरण्यास दोन्हीही कठीणच आहेत. तथापि ज्याच्या त्याच्या मनोरचनेप्रमाणे ज्ञान किंवा भक्ती सोपी वाटेल कारण त्याबद्दल लवकर श्रद्धा निर्माण होईल.

**पू. बाबा :** मग हे कां जमत नाही?

**साधक प :** माझ्यापुरते बोलायचे तर मला असे वाटते की काही वेळा नाम चांगले होते. त्याची शक्ती मिळते. पण आपल्या नकळत व्यवहारात आपण ती वापरतो. ते थांबले पाहिजे. आणि त्याकरता व्यवहाराचे महत्त्व नाहीसे झाले पाहिजे.

**पू. बाबा :** हे खरे आहे. हे आपल्या नकळत घडते. म्हणून वैराग्य पाहिजे. आपल्या साधनाला सर्वोच्च मूल्य दिल्याखेरीज वैराग्य येणार नाही.

आजच्या चर्चेत पूर्वी न आलेला एक मुद्दा असा होता. इतर ज्ञानाप्रमाणे आत्मज्ञानासंबंधीही आपण बाहेरून म्हणजे वाचून, ऐकून ज्ञान मिळवण्याच्या प्रयत्नात आहोत. पण ते पुरेसे नाही. वास्तविक आत्मज्ञानाचा उदय आतच होतो. त्यासाठी अंतरंग स्वच्छ झाले पाहिजे आणि अंतरंगाची शुद्धता नामानेच होईल.

## |३२३| (२३ एप्रिल १९९३)

**पू. बाबा :** नामस्मरण करावे असे वाटते पण ते होत नाही. आमची शक्ती कमी पडते असे पुष्कळजण म्हणतात. ही शक्ती काय आहे? वास्तविक शक्ती एकच आहे. ती नाश पावत नाही; तिचे रूपांतर होते. शक्तीच्या आणि सांख्यांच्या प्रकृतीच्या संकल्पनांमधे साम्य आहे. सांख्य म्हणतात की प्रकृतीच सर्व काही करते. पण श्रीमहाराज म्हणत की यापेक्षा मायेची संकल्पना जास्त बरोबर आहे. सांख्य दर्शन पुरुष व प्रकृति ही दोन भिन्न तत्त्वे मानते. याउलट माया ही भगवंताचीच शक्ती आहे. ब्रह्म आणि ब्रह्मशक्ती एकच आहेत. श्रीअरविंदांची संकल्पनाही अशीच आहे.

**साधक ब :** नाम घ्यायला लागणारी शक्ती कमी पडते हे खरेच आहे. तथापि नामस्मरण होईनासे झाले की एक प्रकारची अपराधीपणाची भावना (guilty feeling) निर्माण होते. साधक म्हणवून घेण्याची आपली लायकी नाही असे वाटते.

**पू. बाबा :** हे बरोबर नाही. मी पापी आहे असे किंवा अशा प्रकारचे विचार साधकाने करू नयेत.

**साधक प :** आपण घसरतो याचे एक कारण असे की मी घसरलो याचे खरे दु:ख होत नाही. साधन चांगले चाललेले असतांना आता आणखी जोमाने हेच चालू ठेवावे असे वाटत नाही. दृश्य जग नॉर्मल वाटते. उदाहरणार्थ, एखाद्याला व्यापारात जास्त नफा मिळाला तर तो व्यापार माणूस आणखी जोमाने करतो. तसे साधनात होत नाही. मनाची सूक्ष्म अवस्था किंवा शांत अवस्था म्हणजे आपले खरे घर आहे असे वाटत नाही. त्यामुळे आपण पुन:पुन्हा दृश्यात येतो. हे शरीर म्हणजे आपले खरे घर वाटते. त्यामुळे तेथेच बरे वाटते.

**पू. बाबा :** हा अतिशय महत्त्वाचा मुद्दा आहे.

**साधक प** : साधनात एकविधता हवी. काहीही कमी जास्त झाले तर ते नामालाच सांगावे. नामच मदत करील असे वाटावे. नामाचाच आधार वाटावा. इतर गोष्टी ऐकून, वाचून बरेचदा फाटे फुटण्याचा संभव असतो. त्यामुळे फारतर करमणूक होते. म्हणून आपली सर्व शक्ती एकत्रित करून ती नामाकडेच लावावी.

**पू. बाबा** : हा निश्चय होणे आणि तो टिकणे महत्त्वाचे आहे. निश्चयासाठी शक्ती लागते. ती मिळावी म्हणून नामाची प्रार्थना करावी. श्रीमहाराज म्हणत की काही केले नाही तरी चालेल; पण काही साधन करायचे असेल तर नामच घ्यावे.

## |३२४| (३० एप्रिल १९९३)

**पू. बाबा** : साधकांनी अद्वैतचर्चा करावी असे समर्थांनी दासबोधात म्हटले आहे. आपण चर्चा करतो त्याचा उपयोग आहे. नुकतेच पुण्याहून एका साधकाचे पत्र आले. ते अक्कलकोटच्या स्वामी महाराजांचे अनुग्रहीत आहेत पण तेरा अक्षरी मंत्राचा जप करतात. आपण करतो ते बरोबर करतो का अशी त्यांना एकदा शंका आली, तेव्हां त्यांना स्वामी महाराज दिसले. ते म्हणाले, तू नाम लेता है न; मैं तेरे पीछे हूँ। हा अनुभव येऊनही त्यांनी विचारले आहे की हे बरोबर आहे ना?

दुसरे एक वसईचे साधक नुकतेच भेटून गेले. ब्रह्मचारी आहेत. पूर्वी रा. स्व. संघाचे कार्य करत. आता ते सर्व सोडले आहे. जवळची सर्व पुस्तकेही देऊन टाकली आहेत. गेली अकरा वर्षे नामसाधन चालू आहे. ते म्हणाले, एकदा पूजेत ठेवलेल्या पादुकांची पूजा करतांना पादुकांमधे स्पंदने जाणवली. कानापाशी नेल्यावर त्यातून जप ऐकू आला. पुढे जप चांगला झाल्यावर कानावर हात ठेवल्यास जप ऐकू येई पण दुसऱ्या कोणाचा स्पर्श झाल्यास तो कमी होत असे. आपणही खूप वर्षे साधन करतो आहोत पण आपल्या साधनाला भोक आहे. नाहीतर प्रगती कां होऊ नये?

गोंदवल्यास एकाने श्रीमहाराजांना विचारले होते की आम्ही रामाजवळ रोज मागतो. तो कां देत नाही? तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, याला कारण म्हणजे राम दाता आहे ही तुमची खरी भावना नाही. संतांची तशी ज्वलंत भावना असते. पू. बाबा पुढे म्हणाले, श्रद्धा हीच संपत्ती आहे. मन तयार झाले पाहिजे.

**साधक ज** : नुकतेच एका साधकांचे मनावर केलेल्या प्रयोगांचे अनुभव वाचले ते सांगतो. ते साधक म्हणतात की बोलणे कमी करण्यासाठी मी असे

पाहिले की बोलणे एक तर आपले श्रेष्ठपण किंवा दुसऱ्याचे दोष दाखवण्यासाठी होते. लक्षपूर्वक ते कमी केल्यावर नव्वद टक्के बोलणे कमी झाले! तसेच कोणतीही गोष्ट करण्यापूर्वी ती मी का करतो असे नुसते बघावे म्हणजे करणे कमी होईल. मनाकडे नुसते पहात राहिल्याने मन लुळेपांगळे होते आणि त्याच्यावर ताबा येतो.

**पू. बाबा :** मनाकडे नुसते पहाणे सोपे नाही. ते जमले तर छानच. नाहीतर मनाची मनधरणी किंवा आळवणी (persuation) करावी. मनाच्या चांगल्या भागाने दुसऱ्या भागाला पटवावे. तथापि यासाठी मनाच्या चांगल्या भागावरची श्रद्धा दृढ झाली पाहिजे. अंतर्मुखता नामानेच येईल. मनामधे खोल उतरायला नामच उपयोगी पडेल. एकदा श्रीमहाराजांना मी म्हणालो की जगात खरी बुद्धिमान माणसे कमी असतात. त्यावर श्रीमहाराज चटकन म्हणाले, नाही; जगात खरी श्रद्धावान माणसे कमी असतात.

## |३२५| (७ मे १९९३)

**पू. बाबा** : आत्ता मी जी हकिगत सांगणार आहे त्यातला 'मी' काढून टाका; त्याला महत्त्व नाही पण श्रीमहाराजांनी अनुभवांबद्दल जे सांगितले आहे ते किती खरे आहे ते पहा. एकदा श्रीमहाराजांना विचारले होते की साधन चांगले होऊ लागले की कोणते अनुभव येतात? तेव्हां ते म्हणाले की अनुभवांच्या मागे जाऊ नये. नंतर म्हणाले, पहिले म्हणजे साधक हलका होतो. म्हणजे मनाने मोकळा होतो. मनाचे बंध जातात. आणि दुसरे म्हणजे चित्तशुद्धी आणि शरीरशुद्धी होऊन सत्त्वगुणाची वाढ होऊ लागते आणि त्यामुळे त्याच्या शरीराला सुगंध येऊ लागतो. हे सांगायचे कारण असे की मागचे तीन रविवार प्रा. मामा महाजन नेहमीप्रमाणे निरूपणापूर्वी भेटायला इथे आले. ते म्हणाले की येथे आले की सुगंध येतो. कसला ते सांगता येत नाही. बोरीवलीचे श्री. पेठेही असेच म्हणाले. बरे, घरात उदबत्ती वगैरेही लावलेली नव्हती. आणि मग माझ्या लक्षात आले की श्रीमहाराजांनी सांगितलेला सुगंध तो हाच. रविवारीच हा सुगंध यायचे कारण म्हणजे मला वाटते की दर शनिवारी पोट साफ होण्यासाठी मी अर्धा चमचा त्रिफळा घेतो. कारण रविवारी सकाळी ज्ञानेश्वरी सांगायची असते आणि पोट साफ असले तर मेंदू चांगला चालतो हा अनुभव आहे. पोट हलके असल्यामुळे रविवारी पहाटे जप चांगला होतो. मन प्रसन्न असते. त्यामुळे त्यावेळी हा सुगंध आला असावा.

**साधक ब** : श्रीमहाराजांनी जे सांगितले त्याचे हे प्रूफ आहे.

**पू. बाबा :** होय, हे प्रूफच आहे. त्यांनी सांगितलेले खोटे कसे असेल? ओळीने तीन रविवारी असे घडल्यावर मात्र मी श्रीमहाराजांची प्रार्थना केली की महाराज, हे थांबवा. म्हणालो की नाहीतर मी जप करणार नाही; तेव्हा ते थांबले! आधीच आम्हांला आमच्या धंद्यामुळे आणि श्रीमहाराजांच्या सहवासामुळे आमच्या लायकीपेक्षा जास्त मान मिळाला. आणखी आता हा लौकिकाचा फंद नको.

**साधक ग :** श्रीरामकृष्णांनी नाही का? त्यांच्या शरीरावर तेज दिसू लागले तेव्हा आई, हे आत जाऊ दे अशी प्रार्थना केली.

**पू. बाबा :** ह्या मोठ्या माणसांच्या गोष्टी. पण हे सर्व जाऊ द्या. मला तुम्हांला विचारायचे आहे की आपले साधन चांगले होण्यासाठी काय करावे? नाम आणि महाराज एकच आहेत. स्वामी रामदासांनी तर श्रीमहाराजांचे नामावतार असे वर्णन केले आहे. तेव्हां नाम घेतांना ही अवताराची कल्पना करावी काय? नाम हे अवतार आहे म्हटले तर त्याचे काय वैशिष्ट्य सांगता येईल?

**साधक ग :** पहिली गोष्ट म्हणजे अवताराची शक्ती असते आणि अवतार घेतांना भगवंताचा काही हेतु असतो.

**पू. बाबा :** नाम घेतांना त्या शक्तीची आपल्याला कल्पना येते का?

**साधक प :** नाम घेतांना प्रथम ते मी घेतो, म्हणजे माझ्या शक्तीचा वापर करतो असे असले तरी हरकत नाही. पण मग पुढे नाम चालते ते त्या शक्तीने चालते ही जाणीव झाली पाहिजे.

**साधक ब :** ही अवताराची कल्पना बरोबर आहे. कारण मंत्र म्हणजे शब्दच असतो. आणि अवताराप्रमाणेच मंत्राच्या बाबतीत it has descended from above असे कृष्णप्रेमनी स्पष्ट म्हटले आहे.

**साधक क :** शिवानंदांनी वेगवेगळे मंत्र आणि त्यांचे परिणाम सांगितलेले आहेत. ॐकारामुळे ब्रह्मप्राप्ती होते, तर ॐ नमः शिवाय किंवा श्रीराम जयराम जयजयराम हा त्रयोदशाक्षरी मंत्र किंवा अन्य तारक मंत्रांमुळे सगुण आणि निर्गुण दोन्हींचीही प्राप्ती होते. सगुणाची शक्ती ही दृश्यातली शक्ती आहे. तिचा अनुभव लवकर येऊ शकतो. आणि जसजसे आपले मन सूक्ष्म होऊ लागेल तसतसा त्या सूक्ष्मातल्या शक्तीचा अनुभव येऊ लागतो असे मला वाटते.

**पू. बाबा :** नाम घेतांना कोणताही संदेह राहाता कामा नये. ते पूर्णच वाटले पाहिजे.

**साधक ग** : देहाला धरून किंवा देहबुद्धीतून येणारा प्रत्येक विचार हा संदेहच म्हटला पाहिजे.

**पू. बाबा** : नामाची आवड वाटू लागली पाहिजे. 'अमृताची उकळी नाम तुझें' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. दुसऱ्या एका अभंगात ते म्हणतात. 'रामनामाचिया चवी। आनरस रुचे केवीं।' गुरुदेव रानडे पुण्याच्या भांडारकर रोडवरील कार्लाइल हाउसमधे राहात होते तेव्हांची गोष्ट आहे. श्री. काका (गणपतराव) कारखानीस पहिल्या मजल्यावरच्या खिडकीपाशी बाहेरून गाणे ऐकू येत होते ते ऐकत उभे होते. गुरुदेवांनी त्यांना काय करताहात म्हणून विचारले. ते म्हणाले, बाहेरून चांगले गाणे ऐकू येत आहे ते ऐकतो आहे. तेव्हां गुरुदेव म्हणाले, ते बाहेरचे संगीत कशाला ऐकता; आतले संगीत ऐका. ही खरी नामाची गोडी! त्याकरता आज तरी प्रामाणिकपणे प्रार्थना करणे आणि अनुसंधानाचा अभ्यास करणे हे आपल्या हाती आहे.

**साधक ग** : नामाच्या शक्तीची कल्पना आली की शरणागती येईल. श्रीमहाराजांनी त्यांच्या आश्वासनात म्हटले आहे की त्यांना म्हणावे मी शरण आहे पण मला शरण जायचे माहीत नाही; ते शिकवा.

**पू. बाबा** : होय. ते देखील तेच करून घेतील. आपण रोज असे म्हणावे. काहीशी कवाईत वाटेल, पण शंभरदा म्हटले तर केव्हातरी तो भाव येऊन जाईल आणि हळूहळू त्यातून स्थिर भाव उत्पन्न होईल.

**साधक ब** : राम केव्हांही येईल म्हणून शबरी त्याच्या स्वागताची रोज तयारी करत होती. तो भाव निर्माण झाला पाहिजे. महाराज अंतर्यामी आहेत. ते केव्हांही प्रगट होतील!

## |३२६| (१४ मे १९९३)

**पू. बाबा** : जयदयालजी गोयन्दकांनी त्यांच्या एका पुस्तकात नामस्मरणाबद्दल सांगतांना म्हटले आहे की नाम घेतांना प्रत्येक दोन शब्दांमधे थोडा पॉझ - विश्राम घ्यावा. उदाहरणार्थ, श्रीराम - जयराम - जयजयराम. आणि ह्या मधल्या पॉझमधे भगवंताचे स्मरण करावे, त्याचे रूप आठवावे म्हणजे नामस्मरण चांगले होते. म्हणजेच दोन शब्दांच्या संधीमधे त्याचे स्मरण करावे. मात्र श्रीमहाराज सांगतात की नाम घेतांना मनात जे अनेक विचार येतात म्हणजेच ज्या अनेक वृत्ती उठतात त्यांऐवजी केवळ भगवंताची वृत्ती ठेवण्याचा अभ्यास करावा. यातूनच वृत्तीची एकतानता साधली की ध्यान

लागेल. त्यासाठी वेगळा अभ्यास नको. प्रश्न असा आहे की हा म्हणजे वृत्तीच्या एकतानतेचा अभ्यास कसा करायचा? मला वाटते, नव्हे माझी खात्री आहे की या अभ्यासात माझे कर्तेपण आड येते. म्हणून राम कर्ता या विचाराची किंवा भावाची जोड दिली तर हा अभ्यास सोपा होईल.

**साधक ग :** येथेच खरी पंचाईत आहे. राम कर्ता आहे आणि त्याचे कर्तेपण मी ठरवणार हा अंतर्विरोध (contradiction) आहे.

**साधक ब :** मला वाटते की नामाचे म्हणजेच श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणिवेमध्ये आहे. नामस्मरण करतांना त्या जाणिवेपर्यंत खोल गेले पाहिजे. त्याच्या आड इतर सगळे विचार येतात. क्वचित आपण अस्तित्वाच्या जाणिवेइतके खोल जातो पण ते टिकत नाही. पुन्हा नाम वरवरचेच होते. तथापि नुकताच मला आलेला एक अनुभव सागतो. गेल्या आठवड्यात आमच्यापैकी एक साधक आमच्या घरी राहून गेले होते. त्यानंतर मी नामस्मरण करत बसतो त्या ठिकाणी ते नसतांनादेखील त्यांचा नेहमीचा पोशाख करून ते नामस्मरण करत बसले आहेत असे मला 'दिसले' आणि मी नामस्मरण करू लागलो. त्यामुळे वाटते की श्रीमहाराजांच्या चरित्रातील प्रसंग डोळ्यांपुढे आणले तर नाम घेतांना येणाऱ्या इतर वृत्ती नाहीशा होऊन केवळ नामाचीच वृत्ती राहील. नाम म्हणजेच महाराज; ते आहेत, ते मला हवे आहेत अशा तऱ्हेचा भाव दृढ होईल.

**साधक प :** या सगळ्यामध्ये मला काय हवे आहे, नामापासून मला काय मिळवायचे आहे ते स्पष्ट झाले पाहिजे. सर्वांचे ध्येय एकच असेल असे नाही, पण काय पाहिजे ते निश्चित झाल्याखेरीज साधन चांगले होणार नाही. दुसरे म्हणजे आपण कार्यकारणभावात आहोत, तेव्हां मला जे मिळवायचे आहे ते नामाने मिळेल, ते मिळवून देण्याची शक्ती नामात आहे अशी खात्री पाहिजे. त्याखेरीज नामाची नड वाटणार नाही.

**साधक ज :** मी नाम घेतांना असे समजतो की माझ्या अंतरात महाराज आहेत. ते एकसारखे नाम घेतच आहेत. फक्त माझे लक्ष तिकडे असले की मला ते ऐकू येते. या भावाची मला खूप मदत होते. माझ्यापुरते सांगायचे तर मला त्यांच्यात विरघळून जावेसे वाटते.

**पू. बाबा :** व्यक्तीनुसार हा भाव वेगवेगळा राहील पण सर्वसामान्यपणे कोणत्याही भावात त्यांच्या अस्तित्वाची जाणीव राहील. नाम म्हणजे महाराजांचा आवाज आहे असे ब्रह्मानंद महाराज म्हणाले होते. मला भगवंताचे

दर्शन पाहिजे, समाधान पाहिजे अशासारखे ध्येय असावे नाहीतर भाऊसाहेबांसारखा सरळ भाव असावा. पण ते फार कठीण आहे.

**साधक प :** काय जे करायचे ते आत्ता करायला पाहिजे. पण काय आड येते ते सांगता येत नाही. आज मृत्यू आला तर त्यांच्याकडेच जाणार. त्यांनी सांगूनही साधन केले नाही याची त्यांच्यापुढे उभे राहिल्यावर लाज वाटेल म्हणून आजच निश्चयाने साधन केले पाहिजे.

**पू. बाबा :** होय. असे झाले तरच ही चर्चा सार्थकी लागली असे म्हणता येईल.

## ।३२७। (२१ मे १९९३)

**पू. बाबा :** ब्लिट्झ साप्ताहिकातले हे कात्रण आहे. यात बिहारमधल्या एका बालयोग्याची हकिगत दिलेली आहे. त्याला दहा-बारा भाषा येतात. वयाच्या बाराव्या वर्षी युरोपात गेलेला असतांना तेथे त्याने बॉटनी, झुऑलॉजीसारख्या विषयांवर तेथील लोकांशी चर्चा केली. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात सांगितले आहे त्याची मला ही हकिगत वाचल्यावर आठवण झाली. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की योग सिद्ध होण्यापूर्वीच जर एखाद्याला मृत्यू आला तर तो अभ्यास पुढे पूर्ण करता येईल अशा ठिकाणी जन्म होतो.

''मोटकी देहाकृति उमटे। आणि निजज्ञानाची पाहांट फुटे।
सूर्यापुढां प्रगटे। प्रकाशु जैसा॥ ६.४५२॥
तैसी दशेची वाट न पाहतां। वयसेचिया गांवा न येतां।
बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें॥ ४५३॥
तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें। मनचि सारस्वतें दुभे।
मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें॥ ४५४॥

**साधक ग :** मला वाटते की या ओव्यांत ज्ञानेश्वर महाराजांनी त्यांचा स्वतःचा अनुभवच सांगितला आहे.

साधकाने ज्योतिषावर कितपत विश्वास ठेवावा असा मुद्दा निघाला. पू. बाबा म्हणाले, माझ्या माहितीचे एक गृहस्थ होते. त्यांना ज्योतिष चांगले समजत असे. तथापि ते म्हणत की व्यवहारदृष्ट्या सगळी चौकशी करून लग्न करावे आणि मग पाहिजे तर दोघांच्या कुंडल्या पहाव्या. कारण घडायचे ते प्रारब्धानुसार घडतच असते. श्रीमहाराज म्हणत की ग्रहांची गती देहापुरतीच

मर्यादित असते. भगवत्प्राप्तीच्या आड ते येत नाही. या संदर्भात स्वामी रामदासांनी काय म्हटले आहे पहा.

"**Devotee** : Do planets really influence our life ?

**Papa** : Greater than planets is God. If you catchhold of Him, you need not be afraid of planets. If you have God's Name on your tongue, you can show your fist to the planets. What can they do ? They may turn you into a beggar, you will still be happy with God's Name on your lips. You do not care whatever difficulty you are put into. The devotee says, "If you throw me into the hell, I will turn the hell into heaven with one drop of happiness I am having."

You take certain situations as good and are happy with them. Some others you take as evil, and you are unhappy. Take everything as good, and you will always be happy. Know, it is all God's will and be perfectly happy. With the Name continuously running on the tongue, you will be ever blissful. Ramdas never had reason to blame anybody or grumble in any circumstance. From the worldly point of view he had very trying and miserable states. He bore everything cheerfully, because he was drinking the divine nectar... the Name... Tune your mind with God and you will be blissful in all circumstances."

God Experience vol. II by Swami Ramdas Q.31 Page 29.

(**भक्त** : ग्रहांचा आपल्या जीवनावर खरेच परिणाम होतो काय ?

**पपा** : परमेश्वर ग्रहांपेक्षा श्रेष्ठ आहे. त्याला जर तुम्ही धरलेत तर तुम्हांला ग्रहांची भीती वाटायचे कारण नाही. तुमच्या जिभेवर जर भगवंताचे नाम असेल तर तुम्ही ग्रहांना मूठ दाखवू शकाल - आव्हान देऊ शकाल. ते काय करतील ? फार तर तुम्हांला भिकारी करतील. पण तरी देखील भगवंताचे नाम तुमच्या ओठांवर असल्यामुळे तुम्ही आनंदात असाल. कोणत्याही संकटाची तुम्हांला भीती वाटणार नाही. भक्त म्हणतो, "तू जर मला नरकात ढकललेस तर माझ्या आनंदाच्या केवळ एका बिंदूच्या प्रभावाने मी नरकाचा स्वर्ग बनवीन."

विशिष्ट परिस्थिती चांगली असे तुम्ही मानता आणि आनंदी होता. दुसऱ्या कोणत्या तरी परिस्थितीला तुम्ही वाईट म्हणता आणि दु:खी होता. कोणतीही परिस्थिती असू दे, ती चांगलीच म्हणा आणि आनंदी व्हा. ती भगवंताची इच्छा आहे हे लक्षात घ्या आणि पूर्ण आनंदी व्हा. जिभेवर अखंड नाम असले की तुम्ही सर्व काळ आनंदात राहाल. कोणत्याही परिस्थितीत कोणाला नांवे ठेवण्याचे किंवा कुरकुर करण्याचे रामदासाला कारणच नव्हते. सांसारिक दृष्टीने विचार केला तर त्याला खडतर परीक्षेच्या आणि दैन्यपूर्ण परिस्थितीतून जावे लागले. पण तो दिव्य नामामृत सेवन करीत होता. त्यामुळे त्याने ते सगळे आनंदाने सहन केले. तुमचे मन भगवंताशी जोडा म्हणजे सर्व प्रकारच्या परिस्थितीत तुम्ही आनंदात राहाल.)

**पू. बाबा** : त्यांना जसे नाम अमृताप्रमाणे वाटले, त्याची गोडी लागली, तशी आपल्याला कां लागत नाही? त्यांनी नामासाठी सर्वस्व सोडले. एवढे जरी नाही, तरी आता आयुष्याचा शेवट आला असतांना तरी साधन चांगले कां होऊ नये? त्याच्या आड काय येते? वास्तविक स्वामी रामदासांनी रामनाम घ्यायला सुरुवात केली आणि त्यांचे वडीलच त्यांचे गुरु झाले. त्यांनी नुसते राम राम म्हणण्याऐवजी त्रयोदशाक्षरी मंत्र देऊन त्याचा जप करायला सांगितले आणि निष्ठेने तो जप करून स्वामी रामदास तयार झाले. आपले गुरु तरी आपल्याला दुसरे काय सांगतात? तरी ते कां होत नाही? स्वामी रामदासांच्या आध्यात्मिक प्रगतीसंबंधी त्यांच्या भक्ताने प्रश्न विचारला त्याला त्यांनी दिलेले उत्तर पहा :

Devotee : Please tell me what are the various stages of your spiritual advancement.

Papa : Ramdas first became a humble servant of Ram by His Grace. He was then repeating "Ram, Ram." Ram gave him His Mantra through the Guru who said, "Instead of repeating 'Ram, Ram' repeat 'Shri Ram Jai Ram Jai Jai Ram.' If you repeat this Mantra always you will get eternal joy." Then Ramdas was engaged in the usual worldly activities. Soon the whole work dropped off and he was repeating Ramnam all the twentyfour hours of the day. In that state God, sitting within his heart, wanted him to go on travel. After two

years of travel Ram whispered in his ears, "I am yourself". Then the servant feeling disappeared and he became a child of the Divine Mother - God.

After the first year's travel he came to Manglore and remained in a cave. Till then he did not know what meditation was. He was only repeating Ramnam. Then he was prompted from within to sit for meditation. At once the body - idea was lost and for hours he sat perfectly absorbed in a state of bliss. Thereafter he saw everything filled with divine light. He was now an embodiment of joy."

God Experience vol. II by Swami Ramdas. Q.32 Pages 29-30.

(**भक्त** : कृपा करून मला तुमच्या आध्यात्मिक प्रगतीचे वेगवेगळे टप्पे सांगा.

**पपा** : ईश्वराच्या कृपेने प्रथम रामदास रामाचा नम्र सेवक झाला. त्यावेळी तो केवळ "राम, राम' असा जप करीत असे. रामाने त्याला गुरूकडून मंत्र दिला. गुरु म्हणाले की केवळ 'राम राम' असा जप करण्याऐवजी तू "श्रीराम जयराम जयजयराम" असा जप कर. हा जप तू जर अखंड केलास तर तुला शाश्वत आनंद मिळेल. त्या काळात रामदास प्रापंचिक व्यवहारात गुंतलेला होता. पण लवकरच ते सगळे काम गळून पडले आणि रामदास दिवसाचे चोवीस तास रामनामात गढून गेला. अशा स्थितीत हृदयस्थ परमेश्वराने त्याला प्रवास करायला सांगितले. दोन वर्षांच्या भ्रमंतीनंतर राम त्याच्या कानात कुजबुजला, "मी तूच आहे" (स्वयें होसी तूंचि देव). मग रामदासाचा दास्यभाव लोपला आणि तो त्या जगज्जननीचे बालक झाला.

पहिल्या वर्षाच्या भ्रमंतीच्या अखेरीस तो मंगलोरला जाऊन एका गुहेत राहिला. त्या वेळेपर्यंत ध्यान म्हणजे काय ते त्याला माहीत नव्हते. तो केवळ नामस्मरण करीत होता. गुहेत ध्यानासाठी बसण्याची त्याला आतून प्रेरणा मिळाली. नंतर त्याची देहबुद्धि एकदम नाहीशी झाली आणि कित्येक तास तो आनंदसमाधीत बुडून गेला. त्यानंतर त्याला सर्व जग भगवत्-प्रकाशाने कोंदलेले दिसू लागले आणि तो आनंदस्वरूप झाला.)

**पू. बाबा** : पहा, त्यांनी स्वत:च्या प्रगतीचे टप्पे कसे दिले आहेत! आणखी एका ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की ते नाम घेत बसलेले असतांना त्यांची

बायको तेथे आली व त्यांना म्हणाली की इतके अती करणे चांगले नाही. तेव्हां त्यांना खूप राग आला व ते तिच्यावर ओरडले. ती बिचारी तेथून निघून गेली. नंतर त्यांना आपण रागावलो याचे वाईट वाटले आणि रडू आले. आणि मग त्यांचा राग कायमचा गेला. ते म्हणतात The devil left me for ever. हे सगळे त्यांचे ठीक आहे. पण आपले कां होत नाही?

चर्चेतून असा सूर निघाला की आमचे ध्येय निश्चित झालेले नाही. त्यामुळे ते साध्य करण्यासाठी लागणारी तीव्र इच्छा किंवा तळमळ नाही. आपल्याजवळ धारणा आहे पण ती शक्ती सांसारिक गोष्टींसाठी खर्च होते.

**पू. बाबा :** समर्थांनी अजपाजपाचे वर्णन केले आहे. नामसाधनातील तो महत्त्वाचा टप्पा आहे. तो कसा गाठायचा?

**साधक ग :** याबाबत मागच्या शुक्रवारी साधक ज यांनी जे सांगितले ते योग्य वाटते. माझ्या हृदयात श्रीमहाराज आहेत आणि ते एकसारखे नाम घेत आहेत. फक्त मी तिकडे लक्ष देतो तेव्हां मला ते ऐकू येते. म्हणजे ते श्वासोच्छ्वासासारखे आहे. तो एकसारखा चालूच असतो. मी लक्ष देतो तेव्हां मला तो जाणवतो. नामाचे तसेच आहे.

**पू. बाबा :** नाम घेतांना त्याच्या अस्तित्वाचा भाव आणि active side म्हणून राम कर्ता ही जोड दिली पाहिजे.

**साधक ब :** आपले नाम हे कर्म होते आणि कर्म करतांना आपण मायेच्या प्रांतात असतो.

**साधक क :** श्रीरामकृष्ण म्हणत की नाम हे मायेपलीकडे आहे. कर्म म्हणून देखील जेव्हां तुम्ही नाम घेता तेव्हां मायेपलीकडे असता. 'नाम ही कृती आहे तर विस्मरण ही वृत्ती आहे' असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. म्हणून नामस्मरणाची कृती इतकी केली पाहिजे की ती वृत्ती व्हावी. त्यासाठी प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी. शक्यतो एकसारखे त्यांचे चिंतन करावे; सुरुवातीला अगदी mechanical वाटले तरी करावे.

**साधक ग :** राम कर्ता हा भाव निर्माण होणे फार कठीण आहे. आपण तोंडाने तसे म्हणतो पण एखादी समस्या कशी सोडवावी हे रामावर न सोपवता त्यावर विचार करू लागतो आणि मग वेगवेगळे पर्याय सुचतात. त्याचा अर्थच मी कर्ता आहे असा होतो. देहबुद्धी गेल्याखेरीज राम कर्ता बाणणे कठीण आहे.

**पू. बाबा :** कोणत्याही बाजूने विचार केला तरी शेवटी नामाशीच यावे लागते. इतक्या आर्ततेने नाम घ्यावे की भगवंत तुम्हांला शोधत येईल आणि

तुमचे गुणदोष न पहाता तुमचा अंगीकार करील. प्रामाणिक प्रयत्न तरी करावा. **It is now high time !**

## |३२८| (२८ मे १९९३)

आजही पू. बाबांनी चर्चेसाठी शरणागती हा विषय घेतला. चर्चा चालू असतांना आज त्यांची मुद्रा विशेष सतेज आणि प्रसन्न होती.

**पू. बाबा :** स्वामी रामदासांचं पुस्तक God Experience वाचत होतो. त्यात त्यांनी शरणागतीवर भर दिला आहे. आपले (म्हणजे आमचे) साधन चांगले का होत नाही यावर मी खूप विचार केला. मला वाटते की शरणागतीखेरीज दुसरा मार्ग नाही. श्रीमहाराज म्हणत की रामाला अनन्य शरण जावे. 'आता फक्त तूंच' हा भाव येण्याला दोन अंगे आहेत. श्रीमहाराजांनी सांगितले आहे की मी नामात आहे. ब्रह्मानंद महाराजही म्हणाले की नाम हा श्रीमहाराजांचा आवाज आहे. याचाच अर्थ असा की त्यांचे अस्तित्व नामामधे आहे. म्हणून नाम घेतांना पहिली गोष्ट म्हणजे मनामधे त्यांच्या अस्तित्वाची भावना पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे नाम हे शक्तिमय आहे. तो नामाचा क्रियात्मक भाग - active side आहे. नाम घेतांना आपोआप शक्तिसंचय होतो. तो टिकावा म्हणून नाम घेतांना राम कर्ता हा भाव दृढ झाला पाहिजे. आपण तोंडाने तसे म्हणतो पण ते प्रत्यक्ष आचरणात राहण्यासाठी लागणारी शक्ती किंवा निश्चय कमी पडतो.

**साधक प :** आपल्याजवळ मनाची शक्ती आहे, पण आपण ती प्रपंचाकरिता वापरतो. ती परमार्थाकडे वळवायला पाहिजे. हे कळते पण प्रत्यक्षात ते घडत नाही. काहीतरी आड येते.

**पू. बाबा :** (साधक क यांना) काय आड येते ते सांगा.

**साधक क :** आम्हांला ते समजत नाही. आता तुम्हीच सांगा आणि काय ते करून घ्या.

**पू. बाबा :** मला वाटते की आपला निश्चय कमी पडतो. काही काळ साधन चांगले होते, पण पुन्हा ते मंदावते. हे टाळायला सत्संग उपयोगी पडतो. पण तो कोठून आणायचा ?

**साधक क :** सत्संग तरी हवा नाहीतर साधनात बुडून गेलेल्या पेटलेल्या साधकाचा संग हवा; म्हणजे त्याच्या सहवासाने साधन वाढते.

**पू. बाबा :** ही दोन्ही कठीण आहेत. आपणच मनाचा निश्चय केला पाहिजे. आता इतके आयुष्य गेले. बरे, जीवनातील इतर गोष्टींबद्दल विशेष रस राहिला

आहे असेही नाही. म्हणून आता अष्टौप्रहर श्वासोच्छ्वासासारखे नाम झाले पाहिजे.

**साधक ब :** ते कठीणच आहे. तथापि इतर सगळ्या (प्रापंचिक) गोष्टीत आणि बाहेरच्या दृश्यातील आघातात देखील नाम चालू आहे हे विशेष आहे असे काही वेळा वाटते.

**साधक ग :** नाम चालते ते त्यांच्या कृपेने याची ही खूण आहे.

**पू. बाबा :** आता नाम सुटेल ही स्टेज गेली. ज्ञानेश्वर महाराजांनी सत्त्वशुद्धीबद्दल सांगतांना म्हटले आहे :

गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु।
भलतेंसणी हानिलाभु। न मनीं जेवीं॥ज्ञानेश्वरी १६.७९॥
तेविं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धीं जें ऐसें अनन्य होणें।
ते सत्त्वशुद्धी म्हणे। केशिहंता॥१६.८०॥ (पहा : अध्यात्मसंवाद भाग २ संवाद क्र. २३६.)

**साधक प आणि क :** तथापि स्टॅग्नेशन - stagnation (साचलेपण) आले आहे असे वाटते.

**पू. बाबा :** काय आड येते ?

**साधक प :** काही काळ स्तब्ध राहून विचार करू लागलो की काय आड येते ते लक्षात आल्यासारखे वाटते पण मग ते दूर करता येत नाही. वास्तविक नाम आतच आहे पण आज आम्ही ते बाहेरून घेतो आहोत. ते आतून आले पाहिजे. पण आत सगळे सुस्त आहे. ते जागे झाले पाहिजे. आत गोड्या पाण्याचा झरा आहे पण त्याच्यावरचे दडपण दूर झाले पाहिजे.

**साधक ब :** म्हणजेच आज नाम जे वरवर चालते ते जाणिवेपर्यंत पोचले पाहिजे. पण काही वेळा मन जाम ऐकत नाही.

**पू. बाबा :** म्हणून तर अभ्यास आणि प्रार्थना याबाबतीत मला ब्रदर लॉरेन्सचे विशेष वाटते. जीजसच्या अस्तित्वाचा 'तो आहे, तो आहे' या भावाचा त्याने किती अभ्यास केला!

**साधक क :** एका पत्रात त्याने म्हटले आहे की जवळ जवळ दहा वर्षे त्याने हा अभ्यास केला आणि मग ख्रिस्त त्याच्या हृदयात स्थिर झाला. त्यानंतर त्याचा अस्तित्वभाव टिकवण्याचे कष्ट राहिले नाहीत.

**पू. बाबा :** पतीचा वियोग जसा पतिव्रतेला सहन होत नाही तसा नामाचा वियोग सहन होता कामा नये. 'सत्स्वरूप रुचलेपणें'मधे खरी गोडी आहे.

सत्स्वरूपाची आवड निर्माण झाली पाहिजे. छत्तीस वर्षे श्रीमहाराजांचा सहवास झाला. केव्हांही पाहिले तर ते भगवंताबद्दल किंवा नामाबद्दलच बोलत असत. (पहा : अध्यात्म संवाद भाग २, संवाद क्र. २३६)

**साधक ब :** समजा, महाराज आले आणि त्यांनी तुला काय पाहिजे म्हणून विचारले तर आता गडबडून जाणार नाही. त्यांच्याजवळ नामाचे प्रेम मागेन. तेवढे आता घट्ट झाले आहे. बाकी संसार चालूच आहे. त्यांच्या अस्तित्वाबद्दल आता तशी शंका नाही; पण त्याची खूण मिळाली पाहिजे. अंधार असू दे, पण त्यांचा आवाज कानावर पडावा.

चर्चेमध्ये साहजिकच श्री. भाऊसाहेबांच्या आठवणी निघाल्या "कैंचें पाप कैंचें पुण्य, राम कृपा करील तो धन्य" यासारख्या श्रीमहाराजांच्या काही वचनांचीही उजळणी झाली.

**पू. बाबा :** साधनाच्या दृष्टीने मला शबरी आदर्श वाटते. मातंग म्हणजे आदिवासी स्त्री. मातंग ऋषींनी साधन सांगितले. राम केव्हांही येईल म्हणून तितक्याच उत्कटतेने त्याच्या स्वागतासाठी ती दररोज तयार राहात होती. कधीही निरुत्साह नाही आणि कितीही थांबायची तयारी! खरोखर भक्ती कशी करावी याचा ती आदर्श आहे. भक्तीची उत्कटता टिकवणे फार कठीण आहे. तुलसीदासांनी तिचे मनोरम वर्णन केले आहे.

**साधक क :** तिला भेटल्यानंतर श्रीराम म्हणाले की ते स्त्री-पुरुष, जात-पात, काहीही पहात नाहीत; केवळ भक्ती पहातात.

**साधक ग :** आणि तिची योग्यता अशी की स्वत: श्रीरामांनी तिला नवविधा भक्ती सांगितली आणि म्हणाले की यांपैकी एक जरी साधली तरी भक्त मला प्रिय होतो. तुझ्या ठिकाणी तर या नऊही प्रकारांचा मनोहर संगम झाला आहे!

## |३२९| (४ जून १९९३)

आज खग्रास चंद्रग्रहण आहे. सुरुवातीला त्यासंबंधी व ग्रहज्योतिषासंबंधी थोडे बोलणे झाले. त्यानंतर पू. बाबा म्हणाले, आपल्याकडे दर रविवारी ज्ञानेश्वरी ऐकायला येणारे श्री. महाजन तुम्हांला माहीत आहेत. पोदार कॉलेजमधे प्राध्यापक होते. आता खूप आजारी आहेत. हॉस्पिटलमधे आहेत. शुद्ध गेली आहे. काही विचारले तर प्रतिसाद येत नाही. पण त्यांच्या बहिणीने श्रीराम म्हटल्यावर मात्र पुढचा मंत्र म्हणू लागले, इतका तो मंत्र

unconscious मधे - अंतर्मनात गेलेला आहे. त्यावरून आठवले, श्री. गोपीनाथ पोतनीस असेच खूप आजारी होते. काही अन्न घेत नव्हते. श्रीमहाराजांना (पेटीवर) हे सांगितले तेव्हां मी त्याला सांगतो असे श्रीमहाराज म्हणाले. नंतर पू. तात्यासाहेबांना श्रीमहाराज असे म्हणाले म्हणून सांगितल्यावर ते म्हणाले की तो (पोतनीस) काही सांगण्याच्या पलीकडे गेला आहे आणि आता महाराज त्याला काय सांगणार आहेत? पुढे त्यांच्या घरी गेल्यावर श्रीमहाराजांनी (पेटीवर) त्यांना गोपीनाथ म्हणून हाक मारली आणि बेशुद्ध असलेला तो गृहस्थ, काय महाराज म्हणाला! श्रीमहाराज त्याला म्हणाले की, अरे तू काही खात का नाहीस? ते म्हणाले, आता काही खावेसे वाटत नाही. श्रीमहाराज म्हणाले की तू काही खाल्ले नाहीस की मला वाईट वाटते. तेव्हां ते खातो म्हणाले. पहा, श्रीमहाराजांनी दिलेले आश्वासन किती खरे आहे. जागेपणी आणि शुद्धीवर असतांना तुम्ही नाम घ्या; मग झोपेत आणि बेशुद्धीत नाम टिकवायची जबाबदारी माझी असे त्यांनी म्हटले आहे. म्हणून अखंड नाम घेतले पाहिजे. आपले असे कां होत नाही? काय अडथळा येतो?

श्रीमहाराजांचे अस्तित्व, नामाची सत्यता - Reality, अंत:करणाची शुद्धता, प्रार्थना इत्यादी पूर्वीच्याच मुद्द्यांवर चर्चा झाली. पू. बाबा म्हणाले की आता ही चर्चा पुरे. यातून काय निष्पन्न होणार? आता ते प्रत्यक्ष केले पाहिजे.

**साधक ब** : जगातल्या कोणत्याही सुखाला दु:खाची झालर असतेच. साधनात अहंकार आड येतो. कर्तेपण रामाकडे सोपवता आले म्हणजे साधन नीट होते. शरणागती येते. तथापि हे सर्व नामाच्या बळाने होते अशी दृढ श्रद्धा पाहिजे.

## ।३३०। (११ जून १९९३)

**पू. बाबा** : आज दुपारी येथे येणाऱ्या एका गृहस्थांचा न्यूयॉर्कहून फोन आला होता. त्यांनी एक हकिगत सांगितली. इस्राइलमधे बाहेरून जाऊन जे ज्यू लोक स्थाइक झाले त्यात काही मराठी भाषिकही आहेत. त्यांनी तेथे मराठी मंडळही स्थापन केले आहे. या ज्यूंपैकी मॅथेमेटिक्सचे प्रोफेसर असलेल्या एका गृहस्थांनी मी लिहिलेले 'ईश्वर : स्वरूप आणि साक्षात्कार' हे पुस्तक वाचले आणि ॐकाराचा जप सुरू केला. हळूहळू त्या जपामधे त्यांचे चित्त रमू लागले. पुढे अमेरिकेत NASA मधे ते व्याख्यान द्यायला गेले असतांना त्यांनी त्यांचा हा अनुभव तेथे भेटलेल्या एका महाराष्ट्रीय गृहस्थांना सांगितला. त्या

गृहस्थांनी नुसत्या ॐकाराऐवजी सोऽहम्‌चा जप करायला सांगितले. म्हणून ते सोऽहम्‌चा जप करू लागले. आता तीन वर्षे झाली. त्यांच्या जपात खंड पडत नाही. जप करायला बसले की त्या पुस्तकाच्या कव्हरवर चित्र काढलेला योगस्थितीतला माणूस त्यांच्यासमोर सजीव होतो असे ते म्हणतात. फोनवर मला त्या गृहस्थांनी विचारले की हे कसे होते? मी त्यांना म्हणालो की ज्यांची भावना जागृत असते त्यांना कित्येकदा Picturization चांगले जमते. उदाहरणार्थ, मानसपूजा करतांना काही जणांना हे चांगले जमते. ही अवस्था चांगली असते. यातूनच पुढचा मार्ग दिसू लागतो. पण हे आपल्याला का जमत नाही? मला वाटते, आपली भावना कमी पडते.

**साधक प** : विचाराने होणारे हे काम नाही. त्यासाठी बळकट श्रद्धाच पाहिजे. आमची श्रद्धा नाही असे नाही. काय करायला पाहिजे ते समजले आहे पण अशी काहीतरी गाठ आहे की प्रत्यक्ष कृतीमध्ये ते उतरत नाही.

**साधक क** : विचार आणि विवेक यांमधे फरक आहे. नुसते विचाराने समजून पुरेसे नाही. विवेक झाला पाहिजे. विवेकाने जे पटले ते माणूस करेलच.

**साधक प** : आपला निश्चय कमी पडतो.

**साधक ग** : साधनाच्या विरोधात असणाऱ्या सगळ्या गोष्टी वासनेतून येतात. त्या वासनांना नामोहरम करून टिकेल इतके नामस्मरण झाले पाहिजे. त्यासाठी लागणारी शक्ती कमी पडते.

**साधक क** : त्यासाठी सत्संग आणि कृपा हाच उपाय आहे. तुलसीदासांनी विनयपत्रिकेत रामाची इतकी स्तुती केली आहे की कृपा केल्याखेरीज रामाला गत्यंतरच राहू नये.

**पू. बाबा** : आजदेखील आपण जे साधन करतो आहोत ते त्याच्या कृपेनेच आहे. पण तेवढे पुरेसे नाही. भावना पेटली पाहिजे. त्यासाठी अनुसंधान टिकले पाहिजे. प्रत्येक विचाराचा, कृतीचा संदर्भ त्याची प्राप्ती हा झाला पाहिजे.

**साधक क** : आपण मागे म्हणालात तसे झोपेतून जागे करून तुम्ही का जगता असा प्रश्न केला तर 'त्याच्याकरता' जगतो असे उत्तर आले पाहिजे. त्यांच्या अस्तित्वाची जाणीव पाहिजे.

**पू. बाबा** : त्यांच्या अस्तित्वाचा भाव कायम टिकला पाहिजे. त्यासाठी प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करायची सवय लावून घ्यावी.

**साधक प** : मन तयार करायला पाहिजे. त्यासाठी आपली सगळी घाण निघायला पाहिजे. आज ते महत्त्वाचे आहे.

**पू. बाबा :** आणि प्रत्येकाची किती घाण आहे कोणास ठाऊक! महाराज म्हणाले त्याप्रमाणे भांडी ओढ्यात भिजत घातली आहेत. आपले ध्येय निश्चित ठरले पाहिजे.

**साधक ग :** ध्येय निश्चित ठरले नसल्यामुळे आणि तळमळ नसल्यामुळे आमची ही भांडी प्रवाहाच्या बाहेर पुन:पुन्हा पडतात आणि श्रीमहाराजांना त्यांना परत परत भिजत टाकावे लागते.

**साधक प :** ईश्वरप्राप्ती हे माझे ध्येय आहे. त्यासाठी जे मन लागते ते मन तयार करण्यासाठी सगळे साधन आहे.

**पू. बाबा :** आपल्या आजच्या जीवनात प्रपंच अनिवार्य आहे. त्याच्या जागी नामस्मरण अनिवार्य झाले पाहिजे. तो आहे, तो आहे असे एकसारखे भान पाहिजे.

**साधक :** आंघोळीच्या वेळी रोज नियमाने विष्णुसहस्रनाम म्हणणारा माणूस बेशुद्ध असूनही डोक्यावर पाणी घालताच विष्णुसहस्रनाम म्हणू लागला. नाम तितके अनिवार्य झाले पाहिजे. ते आपल्या अंतर्मनात - unconscious मध्ये गेले पाहिजे. आत्मसात झाले पाहिजे.

**साधक प :** त्यासाठी लागणारी तळमळ कमी पडते. नामाने मिळणारी शक्ती न कळत इतर ठिकाणी वाया जाते.

**साधक ज :** चित्त सद्गुरूंच्या पायावर किंवा एकाच विचारावर केंद्रित केले तर तेवढा वेळ नामस्मरण चांगले होते.

**पू. बाबा :** सुरुवातीला एकाग्रता कठीण आहे. विनोबा किंवा श्रीअरविंद यांनी ability to think आणि ability to concentrate यांवर भर दिलेला आहे. आपण भारतीय ती गमावून बसलो आहोत असे त्यांचे म्हणणे आहे. तथापि एकाग्रतेपेक्षाही जीवनाचा समग्र विचार करता आला तर ते जास्त चांगले आहे. मग जीवनात जे जे घडते ते ते योग्यच आहे हे समजून येईल.

## |३३१| (१८ जून १९९३)

पू. बाबा आज विशेष प्रसन्न दिसत होते. आम्ही त्यांच्या घरात जात होतो तेव्हांच एक जोडपे त्यांच्याकडे आले. पू. बाबांनी त्यांची चौकशी केली. सहा महिन्यांपूर्वीच त्यांचे लग्न झाले. त्या बाईंची आई दर रविवारी निरूपणाला येते. चांगले चालले आहे ना म्हणून पू. बाबांनी विचारल्यावर ती बाई म्हणाली की ठीक चालले आहे.

आमच्याकडे पाहून पू. बाबा म्हणाले, एक दिवस श्रीमहाराजांनी मला विचारले, कसे काय आहे? वास्तविक अष्टौप्रहर मी त्यांच्या संगतीत होतो; असे असूनही त्यांनी हा प्रश्न विचारला तेव्हां त्यात काहीतरी पेच असला पाहिजे हे लक्षात यायला पाहिजे होते. पण आम्ही मूर्ख! अज्ञान केवढे! नोकरी होती, लोकांत मान्यता होती, मुलगा चांगला शिकत होता, तेव्हां म्हणालो, ठीक आहे. त्यावर श्रीमहाराज म्हणाले, ठीक आहे, नाही; यापेक्षा चांगले असूच शकणार नाही असे वाटले पाहिजे. याचा अर्थ असा की आज मी ज्या परिस्थितीत आहे ती परिस्थिती माझ्या कर्तृत्वाने नसून केवळ त्यांच्या कृपेमुळे आहे. माझे हित ते जाणतात. त्यामुळे सुखाने हुरळून जायचे कारण नाही आणि दु:खामुळे विषाद मानायचेही कारण नाही. आहे ती परिस्थिती परिपूर्णच आहे असे वाटले पाहिजे.

नुकतेच एक गृहस्थ भेटायला आले होते. लहानपणापासून श्रीमहाराजांचे अनुग्रहीत आहेत. नेहमी गोंदवल्याला जातात. ते म्हणाले की धाकटा मुलगा बारावी पास झाला; चांगले मार्क पडले आहेत पण मेडिकलला M.B.B.S. कोर्ससाठी प्रवेश मिळेल अशी खात्री नाही. तो मिळाला नाही तर B.A.M.S. ला नाहीतर B.D.S. ला नाहीतर होमिओपथीच्या कोर्सला प्रवेश मिळतो का ते पहावे की खाजगी विद्यार्थी (payment seat) म्हणून दरसाल पावणेदोन लाख रुपये फी भरून M.B.B.S. कोर्सला पाठवावे हाच विचार एकसारखा मनात येतो. जपाला बसलो की तेवढा तासभर मन शांत असते पण जप करून उठलो की पुन्हा ते विचाराचे भूत मानगूट धरते. रिझल्ट लागल्यावर मुलगा गोंदवल्याला जाऊन श्रीमहाराजांना आपला रिझल्ट सांगून आला. त्याने ज्या दिवशी पुढच्या प्रवेशासाठी अर्ज दिला तेव्हा तो म्हणाला, आता सगळे श्रीमहाराजांवर. तो तसे म्हणाला तरी माझे मन शांत होत नाही असे ते म्हणाले. मी त्यांना म्हणालो की शेजारी मंदिरात जाऊन तुम्ही हे श्रीमहाराजांना कां सांगत नाही? तेव्हां ते म्हणाले की आत्तापर्यंत त्यांनी इतके दिले आहे की आता त्यांना हे सांगायची लाज वाटते. पहा, परमार्थ किती कठीण आहे. 'प्रपंच मुळीच नासका' असे समर्थ म्हणाले. कोणता प्रपंच चांगला म्हणून विचारणे म्हणजे विष्ठा कोणत्या रंगाची चांगली हे विचारण्यासारखे आहे, ही श्रीमहाराजांची दृष्टी. आपले वागणे याच्या उलट. परमार्थ पाहिजे असेल तर हे बदलावेच लागेल. हे कसे करायचे?

**साधक प :** आज आपण जे ठीक चालले आहे म्हणतो त्यालाच धक्का पोचला पाहिजे.

**पू. बाबा :** आद्य शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहितांना 'अथातो ब्रह्मजिज्ञासा।' या पहिल्या सूत्रातील अथ शब्दाचा अर्थ साधनचतुष्टयसंपन्न झाल्यानंतर असा दिला आहे. तसेच नारदभक्तिसूत्रांची सुरुवातही 'अथ भक्तिं व्याख्यास्याम:।' अशी आहे. त्यामधील अथचा अर्थ काय असे श्रीमहाराजांनी विचारले आणि पुढे म्हणाले की संसार सुखाचा नाही हे पटल्यानंतर म्हणजे जोपर्यंत माणसाला संसारात सुख वाटते तोपर्यंत तो खऱ्या अर्थाने भक्तिमार्गाकडे वळणारच नाही.

**साधक ज :** माणसाला सुख पाहिजे असते; दु:ख नको असते. म्हणजे प्रामुख्याने वासनांमुळे मन भगवंताकडे वळत नाही.

**पू. बाबा :** होय. मन भगवंताकडे वळायला एक सत्संगती तरी पाहिजे नाहीतर सद्ग्रंथांची तरी संगत पाहिजे. सत्संगती मिळणे कठीणच. तथापि आपण कालामधे राहातो. काल, आज, उद्या यांतच आपले जीवन सामावलेले असते. म्हणून काहीही करताना आपल्या गुरूंना सांगायची सवय लावून घ्यावी म्हणजे सर्वकाळ त्यांचे स्मरण राहील. हे जमायला काय हरकत आहे?

**साधक ग :** आपण कालाच्या आधीन आहोत. त्याला ओलांडून आपण जगू शकत नाही. तसे गुरूंच्या आधीन आहोत असे वाटत नाही.

**साधक प :** काल म्हणजे हालचाल आली. जप करतांना कालाचे भान गेले तर बरे वाटते. म्हणजे हालचाल थांबली तर बरे वाटते.

**साधक क :** झोपेत देखील काळाचे भान जाते त्यामुळे सुख होते.

**साधक ब :** देहाच्या हालचालीपेक्षा मनाची हालचाल थांबवता आली पाहिजे. मनावर ताबा आला पाहिजे.

**पू. बाबा :** त्यांनी 'नामांत मी आहे' म्हणून सांगितले आहे. मग नामस्मरण करतांना त्यांची संगत कां वाटू नये?

**साधक ग :** आपल्याला दृश्यातल्या संगतीची सवय आहे. नाम सूक्ष्म आहे. सत्संगतीदेखील ग्रंथांच्या संगतीपेक्षा चांगली वाटते कारण ग्रंथ वाचतांना मी त्याला धरावे लागते. पण संत माझ्या हाताला धरून मी कसे वागावे ते शिकवतात.

**पू. बाबा :** हे काहीसे खरे आहे. तथापि महाराज म्हणाले होते की दासबोध, ज्ञानेश्वरी, नाथभागवत यांसारखे ग्रंथ वाचताना हे त्या त्या संतांनी माझ्यासाठी लिहिले आहे. मला सांगितले आहे असा भाव ठेवला तर ते ग्रंथ लवकर समजतात. साधनात पाऊल पुढे पडायला अनुसंधान महत्त्वाचे आहे. प्रत्येक

गोष्ट त्यांना सांगून करायची सवय लावून घ्यावी; कारण साक्षीभाव जास्त कठीण आहे. दुसरे असे की जगाच्या एकंदर पसाऱ्यात माझे जीवन आणि त्यातील घटनांना कितीसे महत्त्व आहे याचा विचार करावा. दृष्टी अशी विशाल करता आली म्हणजे लहान सहान गोष्टींनी आपण जे अस्वस्थ होतो ते सगळे थांबेल आणि साधनाकडे लक्ष लागेल. मग 'तो' सर्वकाळ पाहतो आहे अशी निष्ठा उत्पन्न होईल.

**साधक ब :** त्यांनी अनुग्रह दिला आहे म्हणजे नाम घे अशी त्यांची आज्ञा आहे असे मनाशी पक्के धरून, इतर गोष्टींचा विचार न करता म्हणजे शक्य तितके विकल्परहित होऊन जास्तीत जास्त नाम घेतले पाहिजे. ही शिस्तच लावून घ्यायला पाहिजे.

## |३३२| (२५ जून १९९३)

**पू. बाबा :** आज मी तुमची वाटत पहात होतो! मी सांगणार आहे त्यातला मी काढून टाका; त्याला महत्त्व नाही. पण मला आलेला अनुभव सांगतो. S.S.C. परीक्षेचा रिझल्ट लागल्यानंतर गेले चार दिवस लोकांनी अगदी भंडावून सोडले आहे. इतके टक्के मार्क मिळाले. आता ॲडमिशन कोठे मिळते ही काळजी! पाहिले की कितीही मार्क पडू देत; कोणाला समाधान नाही आणि काळजी सुटत नाही. एकंदर परिस्थितीच अशी आहे. पण ते जाऊ दे. मला सांगायचे आहे ते दुसरेच आहे. माणूस म्हातारा होऊ लागला की त्याचा मेंदू आकसू लागतो. बॉमने म्हटले आहे की चाळिसाव्या वर्षानंतर ही क्रिया सुरू होते. मेंदू आकसू लागला (shrink) की त्याच्या ऱ्हासाला (decay) सुरुवात होते. वेळेवर माणसांची आणि गावांची नांवे आठवत नाहीत. इतर बाबतीतही विस्मरण वाढू लागते.. याचे कारण, मला वाटते की आपण केवळ सांसारिक गोष्टी मेंदूत भरतो. मेंदूचा योग्य उपयोगच करत नाही. मेंदूची शक्ती इतकी मोठी आहे म्हणतात की अगदी हुशार माणूसदेखील मेंदूच्या एकूण शक्तीपैकी केवळ एक पंचमांश शक्तीचाच वापर करतो. सामान्य माणसांचा वापर त्याहून कमीच असतो.

म्हातारपणी विस्मरण वाढत असले तरी विस्मरणाचा हा अनुभव नामाला मात्र लागू नाही. नामस्मरण म्हणजे केवळ repetition नाही. प्रत्येक नाम स्वतंत्र आहे, नवे आहे. नाम स्थूलात आहे तसे सूक्ष्मातही आहे. ते देहबुद्धीच्या आणि जडाच्या पलीकडे आहे. दृश्यावर आधारलेल्या स्मृती कमी होऊ लागतील. पण

ज्याला दृश्याचा आधारच नाही त्या नामाची गोष्ट वेगळी आहे. नाम हे माणसाला देहबुद्धीच्या पलीकडे नेणारे आहे असे श्रीमहाराज म्हणत असत. त्यामुळे गेल्या आठवड्यात मनात विचार आला की आपण नामात आहोत असे श्रीमहाराजांनी अनेकदा सांगितले आहे, तेव्हां आपण त्यांना नामात पाहण्याचा प्रयत्न करावा. म्हणून नामस्मरण करतांना तो भाव मनात आणू लागलो आणि जाणवू लागले की सर्वकाळ ते आपल्याबरोबर आहेत. प्रत्येक नामात ते दिसू लागले. येवढेच नव्हे तर येणारे प्रत्येक नाम वेगळे आहे, पहिल्यापेक्षा निराळे आहे, आतून येते आहे; त्यामधे सौंदर्य आहे, आनंद आहे हे जाणवू लागले आणि नाना, मला ते वचन आठवले - क्षणे क्षणे यन्नवतामुपैति

**ती. सौ. आई** : तदेव रूपं रमणीयताय:। कालिदासाने म्हटले आहे.

**पू. बाबा** : येणारं प्रत्येक नाम नवीन आहे. त्यातनं आनंद उसळतो आहे. आणि मग संख्या ठेवणं बंद झालं. सतत दोन दिवस ही अवस्था टिकली. त्यानंतर ह्या S.S.C. च्या निकालात आणि मार्कांच्या टक्केवारीत आम्ही खाली घसरलो! पण मोठा विलक्षण अनुभव आला. आम्हांला हा अनुभव आला. तुम्हीही प्रयत्न करून पाहा. काय अडचण आहे?

**साधक प** : दृश्यावर मन केंद्रित करायची सवय आहे. मेंदूत ते घट्ट बसलेले आहे. त्याच्याबाहेर पडता येत नाही.

**पू. बाबा** : पण आपल्याला abstract thinking ची सवय नाही असे नाही.

**साधक ग** : पण त्याचे motivation दृश्यातलेच असते.

**साधक प** : होय, विचार सूक्ष्म असले तरी त्यांच्यामागचा हेतू आणि त्यांचे फळ दोन्ही दृश्यातच असतात.

**साधक ग** : प्रत्येक नामात आपल्याला श्रीमहाराज दिसत होते म्हणजे नेमके काय? त्यांचे गुण जाणवत होते की -

**पू. बाबा** : म्हणजे असे पहा की ते माझ्या जवळपास आहेत आणि येणाऱ्या प्रत्येक नामाकडे मी वेगवेगळ्या बाजूंनी पाहतो आहे आणि त्यामधे त्यांचे अस्तित्व जाणवत होते.

**साधक ग** : हे घडायला मन एकाग्र झाले पाहिजे का?

**साधक प** : एकाग्रतेपेक्षाही मला वाटते ते निर्विचार झाले पाहिजे.

**साधक क** : विचार म्हणजे दृश्यच आले. सर्व काही आपण जाणिवेने जाणतो. त्या जाणिवेलाच जाणायचे आहे.

**पू. बाबा :** कृष्णमूर्तींनी The Ending of Time मधे निर्विचार अवस्थेवर फार भर दिला आहे. त्यांना त्या अवस्थेची लहानपणापासूनच सवय होती. त्यांनी म्हटले आहे की You cannot possess the sky !

**साधक ग :** ज्ञानेश्वर महाराजांनी देखील 'आइका आकाश गिंवसावें। तरी आणीक त्याहूनि थोर होआवें।' म्हटले आहे.

**साधक प :** तुम्ही आकाशाला कसे पकडू शकाल ? तुम्हांलाच त्याच्याकडे जावे लागेल. ते आत आहेच. पण तेथपर्यंत पोचण्यासाठी निर्विचार होता आले पाहिजे.

**पू. बाबा :** त्यासाठी आपण संसारात चिकटलेले आहोत, तेथून सुटले पाहिजे.

**साधक ब :** नाम हे त्यांची आज्ञा आहे म्हणूनच घेतले पाहिजे. अनुग्रहाचा हाच अर्थ आहे.

**साधक ग :** त्यांनी आम्हांला धरले आहे पण आमचे तोंड उलट बाजूला आहे. आपण नंतर नामाची संख्या राहिली नाही म्हणालात त्याचे कारण मला वाटते, एकसारख्या वस्तू असल्या तर त्यांची बेरीज करता येते पण प्रत्येक नाम नवीन आणि पहिल्यापेक्षा वेगळे म्हटल्यावर त्याची बेरीज कशी करणार ?

**साधक ब :** मला याचे वेगळे कारण वाटते. मोजणे मायेत येते. मायेच्या पलीकडे जे नाम गेले त्याची मोजदाद कशी करणार ? नामस्मरण इतर विचारांपेक्षा वेगळे आणि खोल जायला कठीण आहे.

**साधक क :** सगळ्या जगाचे ज्ञान जाणिवेला होते. त्या जाणिवेला जाणणे कठीण जाणारच. जगाचे ज्ञान स्थूलातले असल्यामुळे सोपे वाटते पण जाणीव सूक्ष्म असल्यामुळे ती जाणणे कठीण आहे.

बोलण्याच्या ओघात पू. बाबा म्हणाले की त्यांची प्रकृती सारखी त्रास देत असे. तेव्हां एकदा श्रीमहाराज म्हणाले की तुम्ही इतके नियमित वागता, तरीदेखील तुम्हांला त्रास होतो; म्हणजे शरीरप्रकृती शेवटी प्रारब्धावरच अवलंबून असते. तथापि म्हातारपणी तुमची प्रकृती चांगली होईल. मी ते घट्ट धरून ठेवले आहे. चांगली म्हणजे घट्टमुट्ट नव्हे. पण मला जगायचा कंटाळा नाही. उलट, येवढी नामस्मरणाची संधी मिळाली आहे, ती सार्थकी लावली पाहिजे असे वाटते. श्रीमहाराजच म्हणाले होते की म्हातारपणी समाधानासारखे टॉनिक नाही. त्यामुळे नामस्मरण चांगले होऊ लागले की ब्रेन रिज्युव्हिनेट (टवटवीत) होतो.

|३३३| (२ जुलै १९९३)

उद्या गुरुपौर्णिमेचा उत्सव आहे. त्यासाठी मंदिरात उद्याची तयारी, भजन, कीर्तन वगैरे कार्यक्रम चालू आहेत. पू. बाबांनी मंदिरात जाऊन श्रीमहाराजांचे दर्शन घेऊन आलात ना म्हणून विचारले.

**साधक क :** आज मंदिरातले वातावरण प्रसन्न आहे.

**पू. बाबा :** वातावरण प्रसन्न म्हणालात त्यावरून आठवले. आपल्या येथे एक साधक येतात त्यांनी सांगितलेली हकिगत सांगतो. त्यांना त्यांचे सद्‌गुरु म्हणजे गुरुदेव रानडे यांनी तुम्ही दरवर्षी निंबाळला या असे सांगितले होते. गुरुदेव रानडे तेथे ज्या खोलीत जप करत बसत त्या खोलीत ते एकदा या साधकांबरोबर बोलत बसलेले होते. गुरुदेव त्यांना म्हणाले की You will see wonders in this room. मी या साधकांना सांगितले होते की माझे नाम घट्ट म्हणजे दृढ होईल असे अनुभव द्या अशी आपल्या गुरूंजवळ प्रार्थना करावी. गुरुदेवांनीही त्यांना तसे आश्वासन दिलेले आहे. यंदा गुरुदेवांच्या पुण्यतिथी उत्सवाकरता जून महिन्यात ते निंबाळल गेले होते. मी त्यांना सुचवले होते तशी प्रार्थना त्यांनी गुरुदेवांच्या समाधीचे दर्शन घेतांना केली आणि मग गुरुदेव जप करीत असत त्या खोलीत ते जप करीत बसले. तेथे बसल्यावर गुरुदेवांचा 'नारायण नारायण' असा मंत्र भिंतीतून ऐकू येऊ लागला. आपल्याला हा भ्रम होत नाही ना अशी त्यांना शंका आली. म्हणून मग त्यांनी तेथेच साष्टांग नमस्कार घातला तेव्हां त्यांना गुरुदेवांची धूसर आकृती दिसली! ही जिवंत उपासना आहे. जालना येथेही अशी स्पंदने आहेत. श्रीमहाराजांनीही सांगितले आहे की इथे (गोंदवल्याला) पुष्कळ ठेवले आहे; लुटून न्या. त्यासाठी आपण आपली sensitivity - संवेदन क्षमता वाढविली पाहिजे.

**साधक प :** कोणत्याही पवित्र स्थानी अशी स्पंदने असतातच. पण नामातूनच या स्पंदनांचा अनुभव येऊ लागला म्हणजे नामाची संगत लाभेल. मग कोणत्याही जागेवर अवलंबून राहायला नको.

**पू. बाबा :** ही फार पुढची अवस्था आहे. आणखी एक हकिगत सांगतो. परवा एक गृहस्थ आले होते. रिटायर होण्यापूर्वी ते इनकमटॅक्स कमिशनर होते. एका रविवारी निरूपणानंतर ते मला म्हणाले की मी दासबोधातला नामाचा समास वाचून मग नामस्मरण करायला बसतो. त्या समासातली 'महादोषांचे गिरिवर। रामनामें नासती।' ही ओळ मला आवडते. माझ्या हातून पैशाचे नको

ते व्यवहार झाले आहेत; त्याबद्दल मला पश्चात्ताप वाटतो. म्हणून या ओवीचा मला आधार आहे. अगदी अलिकडे मला असा अनुभव आला की कोणीतरी नाम घेत आहे आणि मी ते ऐकतो आहे.

पू. बाबांनी आम्हांला विचारले की हा काय प्रकार असेल ? तेच पुढे म्हणाले की प्राणकोषात म्हणजे Vital मधे नामाला गती मिळाली असावी.

**साधक प** : मला वाटते की त्या गृहस्थांच्या मीचेच हे दोन भाग असावेत. त्यांपैकी चांगला मी नाम घेतो आणि दुसरा मी ते पहातो.

**पू. बाबा** : तुमचे हे म्हणणे बरोबर आहे. लक्षात ठेवा की आता आपल्याला नाम न घेता राहा असे सांगितले तर ते शक्य नाही. कारण नाम कुठेतरी खोल गेलेले आहे. ते कसे खोल गेलेले आहे ते कळणे कठीण आहे. ते जीवाला जडून आहे.

गुरुपौर्णिमेच्या एका उत्सवात सर्वांच्या शेवटी आम्ही प्रसाद घेत होतो तेव्हां श्रीमहाराजांच्या तसबिरीकडे पाहून मी म्हणालो की आज महाराज प्रसन्न दिसताहेत. तेव्हां पू. तात्यासाहेब म्हणाले, महाराजांना आज स्फुरण येणारच. त्यांना आवडते ते नामस्मरण आणि अन्नदान झाले म्हणून ते स्फुरण आहे. उद्या गुरुपौर्णिमा आहे. तुम्ही उद्या काय पाहिजे ते मागून घ्या. वातावरण प्रसन्न आहे. विनयपत्रिकेत दरबारात श्रीराम प्रसन्न असतांना तुलसीदासांनी जसे 'तू हा माझा आहे म्हण' असे मागितले तसे महाराजांना म्हणावे 'आता मला आपला म्हणा; माझा स्वीकार करा.'

## ।३३४। (९ जुलै १९९३)

**पू. बाबा** : शनिवारी (दि. ३ जुलै) गुरुपौर्णिमा झाली, त्याचा दोन-तीन दिवस थकवा होता. आता पाठ, कंबर दुखणे कमी झाले आहे. थकवा फक्त शरीराचाच होता.

नुकतेच वैद्य नांवाचे एक गृहस्थ भेटायला आले होते. मराठी बोलत होते, पण बहुधा गुजराथी असावेत. ते जपानमधे होते तेव्हां एका झेन मास्टरकडे गेले. संस्कृत ध्यानपासून झेन हा शब्द झाला आहे. त्या मास्टरने त्यांना ध्यान कसे करावे ते सांगितले पण त्यांना ते जमेना. चित्त एकाग्र होईना म्हणून त्या मास्टरने त्यांना KOAN (problem) दिला. त्याने सांगितले की आपण मेलो आहोत अशी कल्पना करून मनात काय येते ते पहा. काही दिवस हा प्रयत्न केल्यावर मास्टरने विचारले की हा प्रयोग करतांना तुझ्या मनात मुख्य विचार कोणता येतो ? वैद्य म्हणाले की त्यांच्या बायकोला संधिवाताचा त्रास आहे.

येथे घरकामाला माणसे मिळत नाहीत त्यामुळे बायकोला मदत म्हणून घरातली बरीच कामे मी करतो. त्यामुळे आपण मेलो तर तिचे कसे होईल हाच विचार एकसारखा मनात येतो. झेन मास्टर म्हणाला की बायकोत तुझे चित्त गुंतलेले असल्याने तुझे चित्त एकाग्र होत नाही आणि ध्यान जमत नाही म्हणून विवेकाने मनाला तेथून बाजूला काढ.

नंतर श्री. वैद्य जपानमधून अमेरिकेत गेले. तेथे योगानंदांनी स्थापन केलेल्या योगकेंद्रात ते गेले. तेथे दयामातांनी त्यांना Transcendental Meditation चा अभ्यास करायला सांगितले. तो अभ्यासही जमेना तेव्हां त्यांनी you do some lesser type of sadhana म्हणून सांगितले. पुढे चंद्रकांत हा अध्यात्मपर ग्रंथ लिहिणाऱ्या गुजराथी लेखकाच्या नातवाची व त्यांची भेट झाली तेव्हां तो त्यांना म्हणाला की तुम्ही नसत्या फंदात पडू नका, फक्त नामस्मरण करा म्हणजे सगळे होईल. त्याच सुमारास प्रा. शं. गो. तुळपुळे यांनी लिहिलेले The Divine Name and its Tradition हे पुस्तक त्यांच्या वाचनात आले आणि ते नियमाने नामस्मरण करू लागले. पुढे मुंबईला आल्यावर त्यांना समजले की मालाडला एका मंदिरात बरेच लोक नामस्मरण करतात. म्हणून चौकशी करत ते येथे आले. ते म्हणाले की श्रीमहाराजांची तसबीर पाहताच त्यांचे समाधान झाले.

दुसऱ्या एक विधवा बाई कालच आल्या होत्या. त्यांनी श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतलेला आहे. त्या नामस्मरण करू लागल्या की त्रयोदशाक्षरी मंत्र चालू असतानाच इतर काही मंत्र त्यांना ऐकू येतात. त्या मंत्रांमधे मुख्यत: पांडुरंगाचे व कृष्णाचे मंत्र असतात. त्यांना वाटू लागले की ही काही बाधा आहे की काय? त्यांची चौकशी केल्यावर समजले की त्यांच्या माहेरी वारकरी परंपरा असून लहानपणी काही वेळा त्या पंढरपूरलाही गेल्या होत्या. त्याचा हा परिणाम आहे. मंत्र आणि बाधा एकत्र असूच शकत नाहीत. शिवाय श्रीमहाराजही वारकरी होते. म्हणून मी त्यांना सांगितले की श्रीमहाराजांची प्रार्थना करून जपाला बसत जा म्हणजे हे थांबेल.

तिसरा माझा स्वत:चाच अनुभव सांगतो. गुरुपौर्णिमेदिवशी पहाटे चार वाजता मी मंदिरात श्रीमहाराजांच्या दर्शनाला गेलो. दर्शन घेऊन प्रार्थना केली की आज आपणांकडे इतकी माणसे येणार त्यांना आपला निरोप म्हणून काय सांगू ते सांगा. डोळे मिटलेले असतांनाच डोळ्यांसमोर सिनेमाच्या पडद्यावर दिसावे तसा ज्ञानेश्वर महाराजांचा एक अभंग दिसला. नंतर तो पुन्हा पहावा

म्हणून घरी आल्यावर ज्ञानेश्वर महाराजांचा गाथा उघडताच नेमका तो अभंग समोर आला. अभंग असा आहे.

रसने बोरसु मातृके यो माये ॥ १ ॥
रमणिये माये रमणिये।
रामनामामृत पी जिव्हे॥ २ ॥
निवृत्तिदासा प्रिय।
माय रमणिये माय रमणिये॥ ३ ॥

(अर्थ : हे जिव्हे, रसने, तू सर्व रसांची (माता) देवता आहेस व आपल्या रमणीयतेने सर्वांना रमविणारी आहेस. येवढ्याकरिता रामनामामृताचे तू पान कर. हे जिव्हे, निवृत्तिरायांचा दास जो मी, त्या मला रामनामामृतच प्रिय आहे).

अभंगाचा अर्थ सांगून पू. बाबा म्हणाले, साहजिकच त्या दिवशी मी फक्त श्रीमहाराजांनी सांगितलेले नामाचे महत्त्व येणारांना सांगितले. संतांनी नामाबद्दल इतके सांगितलेले आहे की आपण आता त्याच्या मागेच लागले पाहिजे. सत्संगाखेरीज साधनात प्रगती होणार नाही, म्हणून सत्संग साधावा. त्यांच्याकडून शक्तिपात होतो आणि साधनात खूप मदत होते.

## |३३५| (१६ जुलै १९९३)

**पू. बाबा :** आपल्या येथे येणारे एक गृहस्थ आहेत. त्यांनी गुळवणी महाराजांचा अनुग्रह घेतलेला आहे. सध्या त्यांची न्यूयॉर्कला बदली झालेली आहे. आज त्यांचा तेथून फोन आला होता. ते सांगत होते की एकदा त्यांना व्हिजन आले. झोपेत की जागे असतांना ते त्यांनी सांगितले नाही. त्या व्हिजनमधे मी त्यांना गुळवणी महाराजांच्या बाजूला बसलेला दिसलो आणि गुळवणी महाराजांनी म्हणे त्यांना काही सांगून माझ्याकडे बोट दाखवले. तेव्हांपासून काही विशेष घडले की ते मला सांगतात. त्यांनी फोनवर सांगितले की तिथले वातावरण साधनास अजिबात अनुकूल नाही. तरीदेखील रोज कामावरून घरी परत आले की आंघोळ करून ते ध्यानाला बसतात आणि त्यांचे ध्यान चांगले होते. कामाच्या ठिकाणी घडलेल्या काही घटनांमुळे परवा प्रयत्न करूनही त्यांचे ध्यान लागेना तेव्हां त्यांना रडू आले. प्रपंचातल्या गोष्टींनी आपण किती घसरतो याची एकदम जाणीव झाली आणि फार वाईट वाटले. आपलीही अशीच स्थिती आहे. आपण साधनात दहा पावले पुढे जातो आणि वीस पावले मागे येतो. हे थांबले पाहिजे ना? आयुष्य सरत आले. बरे, आपले काही मोठे प्रॉब्लेम्स आहेत असेही नाही.

**साधक प** : मोठे प्रॉब्लेम्स असे राहिलेले नाहीत. ते सोडून दिले आहेत. पण तरीदेखील जे लहान सहान प्रश्न असतात ते मन गढूळ करायला पुरेसे होतात. नाम खरे वाटत नाही.

**साधक ब** : कृपेशिवाय ते होणार नाही.

**पू. बाबा** : कृपा नाही कसे म्हणता? आज इतकी वर्षे तुम्ही नामस्मरण करत आहात ते कृपेशिवाय का आहे? कृपा आहेच. आता आपण धाडसाने पाऊल पुढे टाकले पाहिजे. 'देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी। तेणें मुक्ति चारी साधियेल्या॥' हरिपाठात ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. याचा श्रीमहाराजांनी सांगितलेला अर्थ परवा काकड्याच्या वेळी ऐकलात ना? पुन्हा सांगतो. देवाचिये द्वारीं म्हणजे जप पश्यंतीपर्यंत पोचतो. महाराज म्हणाले, वैखरीने जप करता करता तो मध्यमेपर्यंत जातो. स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारी ही वाणी असल्यामुळे तिला मध्यमा म्हणतात. जप मध्यमेमधे स्थिर झाल्यावर वीज चमकताच क्षणात आजूबाजूचे सगळे स्पष्ट दिसावे तसा क्षण येतो आणि जप पश्यंतीमधे जाऊन भगवंताचे दर्शन घडते. पण ते स्थिर राहात नाही. त्यासाठी परेपर्यंत जप पोचावा लागतो.

सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता या चार मुक्तींबद्दल श्रीमहाराज म्हणाले की ह्या चार मुक्ती म्हणजे भक्ताच्या मनाच्या चार अवस्था आहेत. जेव्हां भक्ताच्या मनाची अशी स्थिती होते की प्राणिमात्रात त्याला भगवंत किंवा सद्‌गुरु दिसू लागतात तेव्हां तो सलोकता मुक्ती पावतो. ब्रह्मानंद महाराज म्हणाले की महाराजांनी मला अगदी आपल्यासारखे केले. ही झाली सरूपता. येथे भिन्नपणा आहे. समीपतेमधे भक्त भगवंताच्या जवळ असतो. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात म्हटल्याप्रमाणे "जीवु परमात्मा दोनी। बैसोनियां ऐक्यासनीं। जयाचिया हृदयभुवनीं। विराजती॥". अशी ही स्थिती असते आणि शेवटी सायुज्यता, भिन्नपणा नाहीच. सत्संगतीशिवाय हे होणार नाही. यासाठी सर्वकाळ नामाची संगत पाहिजे.

**साधक प** : नामाची संगत कठीण आहे, कारण नाम सूक्ष्म आहे. नामाची संगत ही समीपतेची अवस्था आहे. त्याच्या आधी सलोकता म्हणजे नाम ज्या सूक्ष्म पातळीवर आहे त्या पातळीवर तरी जाता यावे. देहाला महत्त्व नाही हे खरे असले तरी देहाच्या सहाय्यानेच हे साधायचे असल्यामुळे त्यासाठी आवश्यक तेवढी तन्दुरुस्ती राखावी लागेलच.

**साधक ज :** लहान सहान घटनांनी अस्वस्थता येऊ नये यासाठी प्रारब्धाचा सिद्धान्त आचरणात आणला पाहिजे.

**पू. बाबा :** ते वाटते तितके सोपे नाही.

**साधक ग :** प्रारब्धाचा सिद्धान्त पटून तो आचरणात येतो आहे याची कसोटी म्हणजे माणसाची काळजी सुटली पाहिजे.

**पू. बाबा :** प्रारब्धाच्या सिद्धान्तापेक्षा विचाराने काळजी नाहीशी झाली पाहिजे. विश्वाच्या रचनेत आपण कसे नगण्य कस्पटासारखे आहोत हा विचार जरी मनात आला तरी आपण ज्यांना इतके महत्त्व देतो ते प्रश्न किती क्षुल्लक आहेत हे लक्षात येऊन भीती, काळजी इत्यादी नाहीसे होण्यास मदत होते. पण हे तात्पुरते नसावे. काहीही करा, साधनात पाऊल पुढे पडले पाहिजे. आयुष्य चालले आहे; काय करायचे ते आजच केले पाहिजे.

## ।३३६। (२३ जुलै १९९३)

**पू. बाबा :** दिवसभर माणसे भेटायला येतात, त्यांच्या अडचणी सांगतात. ते सगळे ऐकून वाटू लागते की जगात किती अस्थिरता आहे. स्वस्थता अशी कोणाला नाहीच. हे करू की ते, मनाचा निश्चय होत नाही. मनाचा चंचलपणा जात नाही; आणि भगवंतांनी तर गीतेच्या दहाव्या अध्यायात मन ही माझी विभूती आहे असे सांगितले आहे. श्रीमहाराजांना एकदा मी हा प्रश्न विचारला, तेव्हां त्यांनी जे उत्तर दिले ते आठवले की अजून मन थक्क होते. पण ते सगळे आर्ग्युमेंटच सांगतो. अर्जुन म्हणाला, 'चञ्चलं हि मन: कृष्ण' (६.३४). कृष्णा, हे मन फार चंचल आहे. इतकेच नव्हे तर माणसाची मानगूट धरून ते त्याला पाहिजे तसे करवून घेणारे आहे. 'प्रमाथि बलवद्दृढम्।' त्यामुळे त्याला आवरायचे म्हणजे वाऱ्याची मोट बांधण्यासारखे म्हणजे अशक्यच आहे. 'तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिवसुदुष्करम्।' हे एक; आणि पुढे भगवान दहाव्या अध्यायात आपल्या विभूती सांगतांना 'इंद्रियाणां मनश्चास्मि।' असे सांगतात. तेव्हां या दोहोंचा मेळ कसा घालायचा? ह्यावर श्रीमहाराजांनी दिलेले उत्तर अप्रतिम आहे. ते म्हणाले, भगवंत सद्रूप आहे. मन ही त्याची विभूती आहे म्हणजे ते मनाचे 'केवळ असणे' आहे. त्या 'असण्याचे' 'होणे' हे मनाचे चंचलपण आहे. एकाच मनाच्या या दोन अवस्था आहेत. शांत समुद्रावर आलेले तरंग वेगळे दिसले तरी ते समुद्राहून वेगळे नसतात. दृश्य एकसारखे बदलणारे आहे. त्यामुळे जोपर्यंत मन दृश्यात गुंतलेले आहे तोपर्यंत ते चंचलच

राहणार. जो दृश्यापलीकडे गेला त्याचीच प्रज्ञा स्थिर झालेली असते. संत असे असतात. म्हणून त्यांची संगत धरावी.

**साधक प :** संत पदवीला पोचल्याखेरीज मनाची चंचलता नाहीशी होणार नाही आणि ती झाल्याखेरीज संत होता येणार नाही अशी ही गुंतागुंत आहे.

**पू. बाबा :** आपण ३०-३५ वर्षे रोज आठ तास नोकरी केली तसे रोज साधन कां होऊ नये?

**साधक ज :** नोकरी हे निर्वाहाचे साधन होते. त्याचा हेतु आणि फळ दोन्ही दृश्यातलीच होती. साधनाची गोष्ट वेगळी आहे.

**साधक ग :** सुरुवातीला पैसा हे नोकरीचे ध्येय असले तरी पुढे तेवढेच राहात नाही. आपण जेथे काम करतो तेथील आपले विशिष्ट स्थान, इमेज निर्माण झालेले असते आणि ते जपण्यासाठी आपण धडपडतो.

**पू. बाबा :** साधनामधे अनुसंधानाला फार महत्त्व आहे. त्यासाठी प्रत्येक गोष्ट करतांना त्यांना सांगून करावी. प्रपंचात काहीही घडले तरी ते त्यांच्या कानावर घालावे. त्यांच्या कानावर घातले की आपली जबाबदारी संपली असे भाऊसाहेब म्हणत असत. प्रत्येक गोष्टीत त्यांचे स्मरण करावे. यालाच Monoideism म्हणतात. हा अभ्यास आहे. हा साधला म्हणजे त्यांच्या अस्तित्वाचा भाव जागा राहील. ब्रह्मानंद महाराजांना तर श्रीमहाराज रामरूपच दिसत असत.

संतांच्या जवळ समता असते. समता म्हणजे समानता नव्हे. उदाहरणच देतो. एकदा ब्रह्मानंद महाराज त्यांच्यापैकीच एका कानडी माणसाला त्याच्या काही चुकीबद्दल बरेच बोलले. तो ती तक्रार घेऊन श्रीमहाराजांकडे गेला. श्रीमहाराज म्हणाले, बरे, मी पहातो. पुढे बोलण्याच्या ओघात आपण इतके रागावू नये येवढेच ते ब्रह्मानंद महाराजांना म्हणाले. तेव्हां कोणीतरी म्हणाले, पहा, ब्रह्मानंद महाराजांना झुकते माप आहे. समता म्हणजे ज्याला जे योग्य तेच करणे. जावयाला पुरणपोळी आणि त्याच्या घोड्याला हरभऱ्याची चंदी ही समताच होय.

**साधक ब :** वैखरीने नाम घेणे महत्त्वाचे आहे. ते एकसारखे टिकवणे सोपे जाते. मनात इतर विचार चालू असले तरी वैखरीने नाम घ्यावे.

**साधक ग :** मनातील इतर विचार कमी व्हावे म्हणून नाम घेतांना ते आपणच आपल्या कानांनी ऐकावे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे.

**साधक प** : जोपर्यंत नामस्मरण हे कर्म आहे तोपर्यंत ते शक्य तितके वैखरीने घेतलेच पाहिजे. स्वामी रामदास देखील त्यांच्या साधनेच्या सुरुवातीच्या काळात एकसारखे वैखरीने नाम घेत.

**पू. बाबा** : योग्याला जशी योग्य आहार विहाराची पथ्ये पाळावी लागतात तशीच ती भक्तालाही पाळावी लागतात. त्याखेरीज मन सूक्ष्म होत नाही. कोणताही मार्ग घ्या, शेवटी धारणा, ध्यान, समाधि हे अंतरंग साधन करावेच लागते. कसाही वागेन आणि भक्ती करीन म्हणणे वेडेपणाचे आहे.

## ।३३७। (३० जुलै १९९३)

**पू. बाबा** : नुकतेच एक गृहस्थ भेटायला आले होते. साधनी आहेत. त्यांनी ज्ञानेश्वर महाराजांच्या हरिपाठातील एका अभंगाचा अर्थ विचारला. अभंग असा आहे :

तीर्थ व्रत नेम भावेंविण सिद्धि। वायांचि उपाधि करिसी जना॥ १॥
भावबळें आकळे येऱ्हवीं नाकळे। करतळीं आंवळे तैसा हरि॥ २॥
पारियाचा रवा घेतां भूमीवरी। यत्न परोपरी साधन तैसें॥ ३॥
ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण। दिधलें संपूर्ण माझें हातीं॥ ४॥
- ज्ञानदेव हरिपाठ - १२

पहिल्या चरणाचा अर्थ तसा सरळ आहे. भाव नसेल तर तीर्थ, व्रत, नेम इत्यादींपासून काहीही लाभ होत नाही; केवळ उपाधीचे श्रम होतात. पण भाव असेल तर मात्र हातावर सहज आंवळा घ्यावा तितक्या सहज हरीची प्राप्ती होते. तथापि जमिनीवर पडलेला पाऱ्याचा गोळा जसा उचलून हातात घेणे कठीण असते, उचलण्याच्या प्रयत्नातच त्याच्या अनेक बारीक गोळ्या होतात त्याप्रमाणे भाव नसेल तर केलेल्या साधनाचे कष्टच पदरात पडतात. पण ज्ञानेश्वर महाराजांच्या जवळ तो भाव असल्यामुळे माझ्या गुरूंनी, श्रीनिवृत्तिनाथांनी निर्गुण परमात्म्याचा मला पूर्णपणे लाभ करून दिला.

ह्या अभंगात उल्लेख केलेला भाव म्हणजे काय? गुरुदेव रानड्यांनी भाव चा अर्थ प्रेम असा दिलेला आहे. पण तो मूळ अर्थ नव्हे. भू या धातुपासून भव झाला. तेव्हां भाव म्हणजे अस्तित्वभावना. साधन करतांना 'तो (परमात्मा) आहे' अशी खात्री असेल तर तो सहज मिळतो. भगवंत कष्टसाध्य नसून सहजसाध्य आहे असे श्रीमहाराज म्हणत. तळहातावर आंवळा जितका सहज धरावा तितका सहज हरी मिळतो. पण तो अस्तित्वभाव न ठेवता साधन केले

तर केवळ उपाधि वाढविली असे होते. 'नामांत मी आहे' असे श्रीमहाराज सांगतात. तेव्हां नाम घेतांना ते आहेत असे वाटणे म्हणजे भाव. हा भाव कसा यावयाचा? मुख्य म्हणजे नसलेला भाव प्रयत्नाने आणता येतो का?

**साधक प** : याबाबत खरी अडचण म्हणजे आपण दृश्याच्या पलीकडे जाऊ शकत नाही.

**पू. बाबा** : मला असे कोणते अस्तित्व माहिती आहे का, की ज्याच्याबद्दल मला शंका नाही?

**साधक प** : 'मी आहे' याच्याबद्दल म्हणजे माझ्या अस्तित्वाबद्दल मला थोडीदेखील शंका नाही.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. 'मी आहे' याची काही मला एकसारखी आठवण करून द्यावी लागत नाही. माझ्या सर्व व्यवहाराचा पाया 'मी आहे' यावर आधारलेला आहे. अहं नाऽस्मि म्हणतांना देखील ते म्हणणारा आहेच! म्हणून माझे अस्तित्व जितके वादातीत आहे तितके 'त्यांचे' अस्तित्व वादातीत झाले पाहिजे आणि हा अस्तित्वभाव नसेल तर सर्व साधने म्हणजे केवळ उपाधि म्हणजेच कर्मकांड आहे असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

**साधक प** : हा भाव निर्माण होणे ही साधनाची सुरुवात आहे की शेवट? मला वाटते की साधनातून हा भाव निर्माण झाला पाहिजे. त्याकरता 'राम कर्ता' हा अभ्यास आहे.

**साधक क** : 'मी आहे' नाहीसा होऊन 'तो आहे' वाटू लागणे ही मोठी उडी आहे; मग त्यासाठी साधन कोणतेही असो.

**पू. बाबा** : असे आहे का, की 'तो आहे' ह्याची खात्री व्हायला 'मी नाही' हे आधी पटायला पाहिजे? ज्या प्रमाणात ते पटत जाईल त्या प्रमाणात तो प्रकट होईल किंवा 'मी'पेक्षा देखील 'माझे' जास्त बाधते? माझा पैसा, माझे घरदार, माझी माणसे यात आपण जे गुंतलेले आहोत ते कमी झाले पाहिजे.

**साधक क** : हे हळूहळू होईल की एकदम? मला वाटते की सारासार विवेकाने हे एकदा पटले की यातले काहीच माझ्याबरोबर येणारे नाही तर मनुष्य ते सोडेलच.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता हा सारासारविवेक किती जणांजवळ आहे? एक तुकाराम महाराज म्हणाले की 'स्त्री द्यावी गुणवंती तरी तीतें गुंते आशा। म्हणुनि कर्कशा पाठी लावी॥' शेवटी म्हणतात 'तुका म्हणे मज अनुभव आहे अंगें।

आणिक या लोकातें काय सांगो॥' संसाराचे खरे स्वरूप जाणून आता हे पुरे असे कितीजणांना वाटते?

**साधक ग :** श्रीमहाराजांनी म्हटले आहे की मी तुमच्याकडे यावयाला तयार आहे पण तुम्हीच दार उघडत नाही त्याला मी काय करू? मला वाटते, हे दार असे आहे की त्यांनी यावे म्हणून ते उघडतांना आज ज्या खोलीत माझे सगळे आहे ती खोली बंद करावी लागणार आहे; आणि त्यासाठी लागणारे धाडस माझ्याजवळ नाही.

**साधक ब :** पण ते करावेच लागेल. त्यासाठीच अभ्यास आहे. कृष्णमूर्तींनी सांगितले आहे की known च्या म्हणजे दृश्याच्या पलीकडे जावेच लागेल. त्यांनी choiceless awareness सांगितला आहे तो म्हणजे राम इच्छेचा अभ्यास आहे. माझ्या आणि माझ्या संबंधातील इतरांच्या जीवनात जे घडते आहे ते राम इच्छेने घडते आहे असे वाटणे म्हणजे choiceless awareness आहे.

**साधक प :** राम इच्छेच्याही आधी राम कर्ता हा भाव दृढ झाला पाहिजे; कारण इच्छा ही दृश्यापेक्षा सूक्ष्म आहे. कर्तेपण त्या मानाने स्थूलातले म्हणजे दृश्यातले आहे.

**पू. बाबा :** राम इच्छा असे जेव्हां आपण म्हणतो तेव्हां आपले मन स्वस्थ होते असे तुम्ही म्हणता. त्यांच्यावर सोपवले की ते काय करायचे ते करतात आणि ते योग्यच असते असे म्हणता. पण त्यासाठी तुम्ही जी काही उदाहरणे देता त्यात त्यांनी तुमच्या शक्तीपलीकडची गोष्ट केली पण ती तुम्हांला पाहिजे होती तशी केली असे दिसते. तसे नाही; तुमच्या मनाविरुद्ध झाले तरीदेखील त्यात त्यांची इच्छा दिसली पाहिजे आणि मन अस्वस्थ होता कामा नये.

बरी मला आठवण झाली! सचिवालयात पाटील म्हणून एक अधिकारी होते. ते येथे येत असत. त्यांच्यावर त्यांच्या शिपायाने हल्ला केला. मानेवर सुरी लागली. खूप रक्त वाहात होते. सेंट जॉर्जेस हॉस्पिटलमधे नेत असतानाच ते बेशुद्ध झाले. त्यांच्याबरोबर असणाऱ्या गृहस्थांनी ही गोष्ट श्रीमहाराजांना सांगितली तेव्हा श्रीमहाराजांनी विचारले की बेशुद्ध होण्यापूर्वी तो काय करत होता? ते गृहस्थ म्हणाले, नाम घेत होता. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, त्यावेळी मी तेथेच होतो. पुढे ते वाहणारे रक्त पोटात गेल्यामुळे त्यांचा आजार वाढला. श्रीमहाराज म्हणाले, ते थांबेल आणि तो बरा होईल आणि तसेच झाले. तेव्हां मुद्दा असा की तुम्ही कसेही नाम घ्या, ते तेथे असतातच.

**साधक ग :** त्यांनी सांगितले आहे की जो नाम घेतो त्याच्या मागेपुढे मी असतो; कसा ते विचारू नका. त्या गृहस्थांनी ज्या अवस्थेत नाम घेतले तसे नाम अभ्यास असल्याखेरीज आणि त्यांच्या अस्तित्वाची खात्री झाल्याखेरीज होणारच नाही.

**साधक ज :** अस्तित्व जाणवण्यासाठी चित्तशुद्धी आवश्यक आहे. त्यासाठी प्रपंचात राहूनही त्याची ओढ नाहीशी झाली पाहिजे.

**साधक ड :** मागे एकदा श्री. दत्ताण्णा म्हणाले होते की मी आणि माझे किंवा अहंकार आणि वासना नाहीशा झाल्याखेरीज भगवंताच्या जवळ पोचता येणार नाही. हल्ली सुरक्षिततेसाठी जसे metal detector असतात तसा भगवंताच्या दारात अहंकार आणि वासना शोधणारा डिटेक्टर आहे. तो पार करूनच मग आत जाता येते.

**पू. बाबा :** ही चांगली कल्पना आहे. 'पारियाचा रवा घेतां भूमीवरी। यत्न परोपरी साधन तैसें॥' म्हणजे काय?

**साधक ब :** पाऱ्याला Quick silver म्हणतात. जमिनीवर पडला तर तो उचलता येत नाही. साधनाचे यत्नही तसेच आहेत.

**पू. बाबा :** 'पारियाचा रवा' ह्याचा मला वाटतो तो अर्थ सांगतो. आपले मन पाऱ्यासारखेच चंचल आहे. पाऱ्याचा जमिनीवरचा गोळा उचलावयाचा प्रयत्न केला तर तो हातात तर येत नाहीच पण त्याचे असंख्य बारीक कण होतात. आपल्या मनाची स्थिती अशीच आहे. आज मी कोठे गुंतलो आहे म्हणून विचारले तर काय सांगता येईल? कितीतरी ठिकाणी मी थोडा थोडा गुंतलेलो आहे. तेथून माझे मन काढून ते सर्वच्या सर्व भगवंताकडे वळवणे हे पाऱ्याचे असंख्य बारीक बारीक कण गोळा करण्याइतके कठीण आहे.

**साधक ग :** मन गोळा करणे किती कठीण आहे हे आतून जाणवले की शरणागती येत असावी. त्यासाठीच सर्व साधन आहे.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचा भाव येण्यासाठी प्रत्येक गोष्ट करतांना त्यांना सांगून करावी. दिवसअखेर काय काय घडले ते सांगावे. ह्या बाबतीत भाऊसाहेब आदर्श होते.

**साधक ग :** ते तर तसबिरीसमोर स्वारींच्या कानावर घातले की आपली जबाबदारी संपली म्हणत. त्याच्या लेखी ती तसबीर नसून प्रत्यक्ष श्रीमहाराज होते.

**पू. बाबा :** आणि ह्याचे कारण मारुतीला किंवा तसबिरीसमोर सांगावे म्हणजे मला ऐकू येते असे श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले होते. त्यांनी ते घट्ट धरून ठेवले.

**साधक ड :** रोज काय काय घडले याचे रिपोर्टिंग करावे. खूप साधन करावे असे वाटते पण होत नाही.

**पू. बाबा :** धुमसते आहे पण पेटत नाही.

**साधक ड :** धुराने विझून जाऊ नये म्हणजे झाले!

**पू. बाबा :** तसे होणार नाही. त्यांनी हाताशी धरले आहे.

**|३३८|** (६ ऑगस्ट १९९३)

**पू. बाबा :** मागच्या रविवारी निरूपणानंतर मला दोन बायका भेटल्या. त्यांनी त्यांचे प्रश्न लिहून दिले आहेत. त्यांच्यापैकी एक अलिकडे पावसला गेल्या होत्या तेव्हां ज्या खोलीत स्वामी स्वरूपानंद बसत असत त्या खोलीत त्यांना सोऽहम् जप ऐकू आला. गोंदवल्यालाही समाधीजवळ त्रयोदशाक्षरी मंत्र ऐकू येतो असे सांगणारी माणसे भेटतात. मात्र हे जाणवायला मनाला सूक्ष्मता यावी लागते.

दुसऱ्या बाई आहेत त्यांचा नवरा वारी करत असे. त्याही कधी तरी जात असत. त्यांचा मुलगा व मुलगी दोघेही अमेरिकेत आहेत. त्यांच्याकडे ही दोघे गेली असतांना नवऱ्याला आंव झाली. उपचारात काही गडबड झाली का आणखी काही झाले माहीत नाही पण अमेरिकेतच त्याचा अंत झाला. पुढे त्या बाई तेथे करमत नाही म्हणून भारतात परत आल्या. आर्थिक सुस्थिती आहे, पण नवऱ्याचा मृत्यू पाहिल्यावर आपणही असेच जाऊ काय अशी भीती वाटते. त्यामुळे असेल कदाचित, पण त्यांच्या मनात आले की ज्ञानेश्वरी वाचावी. ज्ञानेश्वरी वाचायला सुरुवात केली पण ती समजेना म्हणून त्या आळंदीला गेल्या आणि आठ दिवस उपास करून अजानवृक्षाखाली वाचत बसल्या पण तरीही नीट समजेना तेव्हां त्यांच्या मनात विचार आला की मला हे कोण समजावून सांगेल? ह्या विचारातच त्यांची तंद्री लागली आणि त्यांना दृश्य दिसले की सकाळची वेळ आहे, लोक ऐकायला बसले आहेत आणि सफेत कपड्यातले एक वृद्ध गृहस्थ ज्ञानेश्वरी सांगत आहेत. भानावर आल्यावर त्यांनी त्यासंबंधी चौकशी सुरू केली. आळंदीला कुलकर्णी नांवाचे ॲडमिनिस्ट्रेटर आहेत, ते त्यांच्या नात्यातले आहेत. त्यांनी मुंबईला मालाडला

दर रविवारी सकाळी ज्ञानेश्वरी सांगतात म्हणून सांगितले म्हणून रविवारी त्या येथे आल्या आणि मी ज्ञानेश्वरी सांगायला येऊन बसलो तेव्हां तंद्रीत दिसलेले गृहस्थ हेच असे त्यांनी ओळखले. निरूपणानंतर त्या भेटल्या तेव्हां म्हणाल्या की त्यांचे अर्धे लक्ष ज्ञानेश्वरीकडे आणि अर्धे माझ्या चेहेऱ्याभोवती त्यांना पिवळा प्रकाश दिसत होता तिकडे होते. गोंदवल्यालाही चिंतोपंत जोशांना माझ्या चेहेऱ्याभोवती प्रवचनाच्या वेळी असा प्रकाश दिसतो म्हणे! पण यामधे काही विशेष नाही. पिवळा प्रकाश हा बुद्धीचा प्रकाश आहे. श्रीमहाराज म्हणाले की ज्ञानाचा प्रकाश निळा दिसतो. Seven Sheaths नांवाच्या एका पुस्तकात जी चित्रे दिली आहेत त्यात भक्तीचा प्रकाश निळा दाखवलेला आहे. ते चित्र श्रीमहाराजांना दाखवले तेव्हां ते म्हणाले की त्या लेखकांना नीट दिसले किंवा समजले नसावे. भक्तीचा प्रकाश पांढरा दिसतो. पुढे म्हणाले की पांढऱ्या रंगात बाकीचे सगळे रंग येतात तसे भक्तीमधे ज्ञानयोग, कर्मयोग इत्यादी सगळे योग येतात. त्या पुस्तकात क्रोधाचे चित्र आहे. एका रागावलेल्या माणसाच्या शरीरातून सर्व दिशांना लाल बाण जात आहेत. ते चित्र पाहून श्रीमहाराज म्हणाले, हे बरोबर आहे. क्रोधामुळे जर आसमंतात ते वातावरण तयार होते तर सत्पुरुष सगळीकडे समाधान पसरवीत नसतील कां?

तर त्या बायकांचा प्रश्न होता की अजपा जप म्हणजे काय? श्रीमहाराजांना मी एकदा श्वासावर नाम कसे घ्यायचे म्हणून विचारले होते, तेव्हां ते म्हणाले होते की तो योगाचा प्रांत आहे; आपण त्या भानगडीत पडू नये. तथापि श्वास जितका सहज येतो जातो तितके सहज नामस्मरण होणे म्हणजेच अजपा जप. यासाठी काय करावे? योगामधे प्राणावर नियंत्रण आणून मन स्थिर करतात. याच्या उलट मन स्थिर झाले तर प्राणावर नियंत्रण येऊ शकते. मन स्थिर व्हावयाला नामस्मरणासारखा उपाय नाही. तेव्हां आपण प्रथम स्वस्थ बसावे आणि नुसते श्वासाकडे लक्ष द्यावे. अगदी नामस्मरण देखील करू नये. हळूहळू लक्षात येते की श्वास मंद होतो आहे आणि त्याचबरोबर मन जरी पूर्ण निर्विचार नाही तरी शांत होते आहे किंवा असेही करायला हरकत नाही की जितका संथपणे श्वासोच्छ्वास चालतो तितक्याच संथपणे नामस्मरण चालू ठेवावे.

**साधक प** : मी हे करून पाहिले आहे. काय होते, की जोपर्यंत तुम्ही नुसते श्वासावर लक्ष ठेवता तोपर्यंत तो ठीक चालतो. पण त्याबरोबर नाम चालू केले की श्वासात काहीतरी अडथळा येतो आणि मग मधेच थांबून दीर्घ श्वास घ्यावा लागतो. मला वाटते, रक्तातले ऑक्सिजनचे प्रमाण कमी झाल्यामुळे तसे होते.

त्यासाठीच भस्त्रिका, प्राणायाम इत्यादी सांगत असावे. कारण दीर्घ श्वास घेतला की रक्तात ऑक्सिजन भरपूर प्रमाणात साठवला जातो. पाण्याखाली जाण्यापूर्वी आणि पाण्यातून वर आल्यावर पाणबुड्यांना दीर्घ श्वसन करावे लागते.

**पू. बाबा :** तो केवल कुंभकाचा प्रकार आहे. योगी लोक पाण्याखाली तासभर देखील राहातात.

**साधक प :** श्रीरामकृष्णांची जेव्हां प्रथम समाधी लागली तेव्हां त्यांचे श्वसन इतके मंदावले की त्यांच्या गुरूंनी - तोतापुरींनी त्यांच्या नाकाशी सूत धरून श्वास चालू आहे याची खात्री करून घेतली.

**पू. बाबा :** ते जाऊ दे. आपण हा अभ्यास कसा करायचा ते सांगा. माझा अनुभव सांगतो. पोट साफ आणि हलके असले तर हे लवकर जमते. प्राणांवर ताबा आणून मन स्थिर करण्यापेक्षा मन स्थिर करून प्राणांवर ताबा आणणे ही जास्त वरची आणि कठीण पायरी आहे.

**साधक क :** मनोमय कोश हा प्राणमय कोशाच्या वरचा आहे आणि अन्नमय कोश प्राणमय कोशाच्याही खाली आहे. तेव्हां योग्य आणि थोडेसे अन्न घेऊनच सुरुवात करावी लागते.

**पू. बाबा :** योगी अरविंद प्राणांना आणि प्राणमय कोशाला फार महत्त्व देतात कारण आपल्या सर्व मानसिक आणि शारीरिक क्रियांचा तो driving force आहे. वृत्ती उठली की तिची ऊर्मि आणि मग कृती ही प्राणांच्या शक्तीमुळेच होते. प्राणायामामुळे वृत्ती उठली की ती दाबली जाते. पण श्रीमहाराज मात्र योगाचा हा अभ्यास न सांगता वृत्तीच्या तोंडाशी नाम द्यावे असे सांगत.

**साधक क :** वृत्ती येतांना अतिशय नाजुक आणि लवचिक असतात. पण त्या नंतर घट्ट होतात. सुरवातीला तो passing thought वाटतो पण मग वरचेवर येऊन तो दृढ होतो म्हणून अगदी सुरुवातीलाच वृत्तीकडे लक्ष देऊन ती काढून टाकली पाहिजे. त्यावेळी ते सोपे जाते. श्रीमहाराजांनी उदाहरण दिले आहे. ते म्हणतात, हिमालयात बर्फ पडते तेव्हां ते अगदी पिसासारखे हलके आणि भुसभुशीत असते पण नंतर ते दगडासारखे घट्ट होते.

**पू. बाबा :** तुमचे हे म्हणणे पटले. वृत्ती सुरुवातीला नाजुक असते तेव्हांच तिच्याशी मुकाबला केला पाहिजे.

**साधक ड :** वृत्ती उठतांना लक्षात येणे कठीण जाते. आपल्या नकळत तिची ऊर्मि होते आणि काही वेळा तर कृती घडून गेल्यानंतर मग हे करायला नको होते असे वाटते.

**पू. बाबा :** त्यासाठीच साधकाने अखंड सावध राहिले पाहिजे.

**साधक प :** आत पहायला लागले की निदान आपल्या साधनाच्या आड कोणत्या प्रधान वासना येत आहेत हे लक्षात येईल.

**पू. बाबा :** नामानेच अडचणी लक्षात येतात. त्यासाठी अनुसंधानाचा अभ्यास केला पाहिजे. श्रीमहाराजांना एकदा याबद्दल विचारले होते तेव्हां ते म्हणाले, नादब्रह्म म्हणतात ना, त्याचा आधी अभ्यास केला पाहिजे. नादब्रह्म म्हणजे ॐकार ना म्हणून मी विचारले तेव्हां लगेच ते छे! असे जोरात म्हणाले; मला अजून ते आठवते आहे. चांगले संगीत ऐकतांना किंवा नाम चांगले चालू असतांना एक लय लागते. मग जपाचे शब्दही राहात नाहीत. अशा वेळी माणूस डोलू लागतो आणि मग अनाहत नाद ऐकू येतो. महाराज अनुहाद म्हणाले होते. तेथे नादब्रह्म आहे. त्याच्यापुढे ॐकाराचे आहे ते शब्दब्रह्म.

**साधक ग :** पलूसकरांचे रघुपति राघव राजाराम हे भजन आहे त्याच्या चालीवर किंवा अशीच एखादी भजनाची चाल घेऊन त्यावर जप केला तर मन लवकर रमते.

**पू. बाबा :** आपली शक्ती मर्यादित आहे, आणि अनेक सांसारिक गोष्टींत ती विखुरली जाते. ते सगळे थांबवून ती नामाकडे लावता आली पाहिजे. उदाहरणार्थ, गाण्याची आवड आहे, वाचनाची आवड आहे तर गाणे गातांना किंवा ऐकतांना, वाचन करतांना मनाची वरची पातळी आली की ते सोडून लगेच नामाला बसावे.

**साधक ग :** म्हणजे कसे? वाचनाची आवड आहे कारण वेगवेगळे विचार, त्यामागचा तर्क, भाषाशैली इत्यादींमुळे त्यात गोडी वाटते. नामात तसे काहीच नाही.

**पू. बाबा :** नामाला स्वत:ची अशी चव नाहीच, म्हणून वाचतांना मन वर गेले की लगेच ते नामाकडे लावावे.

**साधक ब :** हे बरोबर आहे. वाचतांना गोडी आली की आपण पुढे वाचत जातो आणि मग ती अवस्था पूर्ण विकसित होऊन विराम पावते. तिचा पूर्ण विकास होण्यापूर्वीच म्हणजे वाचन मधेच थांबवून नाम घ्यावे. हे वृत्तीच्या तोंडी नाम देणे आहे.

**पू. बाबा :** उदाहरणार्थ, तुम्ही श्रीमहाराजांचे प्रवचन वाचताहात. त्यातल्या एखाद्या विधानाने तुम्ही आनंदित झालात तर प्रवचन पुढे वाचणे थांबवून

नामस्मरण करावे. अर्थात हे सगळे करतांना आपल्या जीवनाचा आजचा जो घाट आहे तोही बिघडवून चालणार नाही.

**साधक प :** तेच जास्त कठीण आहे. एकांतात न जाता साधन करणे ही खरी कसोटी आहे.

## ।३३९। (१३ ऑगस्ट १९९३)

नेहमीप्रमाणे संध्याकाळी आम्ही पू. बाबांकडे मालाडला गेलो. आमच्या मागोमाग डॉ. सोनार आले.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांचं म्हणणं किती खरं आहे! किती चांगल्या माणसांची इथं घरबसल्या भेट होते. गेल्या रविवारी जे. जे. हॉस्पिटलमधील एक डॉक्टर एका संन्याशाला घेऊन आले होते. त्या संन्याशांचा पूर्वाश्रमी बंगलोरला कसला तरी कारखाना होता. चांगला चालला होता. पण काही वर्षांनी हे सगळे आपण कशासाठी करतो आहोत? आपल्या जीवनाचा उद्देश काय? अशासारखे प्रश्न त्यांच्या मनात वारंवार येऊ लागले. शेवटी त्यांनी कारखाना बंद केला आणि रांचीला योगदा आश्रमात जाऊन त्यांनी संन्यास घेतला. आता ते कर्नाटकातच दावणगिरीला असतात. मूळ मराठी भाषी गृहस्थ पण आता मराठी बेताचेच येते. मी त्यांना विचारले की तुम्ही मंडळी Transcendental Meditation (TM) म्हणजे काय करता? त्यांनाही जपासाठी मंत्र दिलेला असतो; पण त्या मंडळींचा क्रियायोगावर भर आहे. त्यात मन ताब्यात आणण्यासाठी मुख्यतः प्राणायामावर भर आहे.

माझा आजचा तुम्हांला प्रश्न आहे की काळावर स्वामित्व कसे मिळवता येईल? कारण आपण पहातो की हा काळ आपल्याला फार त्रास देतो. जप करतांना वेळेचे भान राहिले नाही तर आनंद होतो.

**साधक प :** झोपेत देखील आपण काळ विसरतोच; त्यामुळे ती आनंदाची स्थिती असते. जागे झाल्यावर घड्याळ पाहून मी इतका वेळ झोपलो होतो असे आपण म्हणतो. पण झोपेत काळ नसतोच.

**साधक ब :** काळ म्हणून काही अस्तित्वातच नाही. माणसाने काळ निर्माण केला आहे. काल, आज, उद्या हे आपण एकाच अखंड काळाचे तुकडे केले आहेत.

**पू. बाबा :** हो; पण म्हणजे काळ म्हणून काहीतरी आहेच.

**साधक ज** : काळाला सामाजिक महत्त्व जास्त आहे. दिवस-रात्र या भागांचा तर उघड उघड सूर्याच्या उदय आणि अस्ताशी संबंध आहे. पण एखादा माणूस जर अंधाऱ्या गुहेत जाऊन बसला तर दिवस, रात्र, वार, तारीख, महिना इत्यादींची त्याची जाणीवच नाहीशी होईल. त्यासाठी काही संदर्भ (reference) राहणार नाही.

**पू. बाबा** : एखाद्या आवडीच्या विषयात माणूस रमला तर त्याचे काळाचे भान नाहीसे होते.

**साधक ब** : ज्यांना गाण्याची आवड आहे त्यांना चांगले गाणे ऐकतांना पाच-सहा तास झाले तरी एक-दोन तास झाल्यासारखे वाटते.

**पू. बाबा** : गुरुदेव रानडे जेव्हां कॉलेजात शिकत होते तेव्हां दोन-दोन दिवस ते सतत अभ्यास करत असत आणि मग बाहेर लक्ष गेले की ही सकाळ आहे की संध्याकाळ असा त्यांना संदेह पडत असे.

**साधक ड** : स्मृति आहे तोपर्यंत भूतकाळ राहाणार आणि कल्पना आहे तोपर्यंत भविष्यकाळ राहाणार. काहीतरी घडावे अथवा घडू नये अशी आपली अपेक्षा असते. आपल्या सगळ्या कल्पना त्यावर आधारलेल्या असतात. म्हणजे काळाचे मूळही वासनेत आहे. वासना आहेत तोपर्यंत काळ राहाणारच. म्हणून मला वाटते की जे निर्वासन होऊन काळापलीकडे गेले आहेत अशा संतांची संगत लाभली तरच काहीतरी शक्य आहे.

**पू. बाबा** : सत्संगती हा तर उत्तम उपाय आहेच. पण ती जर नसली तर काय करायचे ? काळाचे बंधन जायला हे दृश्य जे खरे वाटते त्याचे खरेपण गेले पाहिजे. म्हणजे मग स्वप्न जसे खोटे असते तसे काळही खोटा वाटेल. स्वप्न कसे, म्हटले तर खरे आणि खोटे दोन्ही असते.

**साधक प** : जागे झाल्यावर स्वप्न खोटे ठरते तसे दृश्य खोटे वाटायला दुसरे काही तरी खरे माहीत झाले पाहिजे.

**पू. बाबा** : असे करता येईल का ? आत्तापर्यंत किती काळ होऊन गेला. ह्या पृथ्वीचे आयुष्य काही कोटी वर्षांचे आहे. त्यांपैकी काही लाख वर्षे माणूस पृथ्वीवर आहे. त्यामधे आपले आयुष्य म्हणजे एखादा क्षण म्हणता येईल. हे जर मनाला पटले तर आपल्या जीवनात घडणाऱ्या घटनांना जे आपण अवास्तव महत्त्व देतो ते राहाणार नाही.

**साधक ब** : हे फार कठीण आहे. मला एवढे कळले आहे की माझे कर्तृत्व लटके आहे. जे घडते आहे ते त्याच्या इच्छेने घडते आहे. काही वेळा ते सहन

होत नाही. पण अशा वेळीही ते त्यांच्याच कानावर घालावे. सुखाच्या गोष्टींनी खूश झालो तर तेही त्यांना सांगावे म्हणजे ह्या काळाच्या फंदातून सुटका होईल. कारण आज माझ्या वासना आहेत. त्यांमधून निर्माण झालेल्या अपेक्षा आहेत. मी सोडतो म्हणून त्या सुटत नाहीत. तेव्हां त्यांना शरण जाऊन तुम्ही काय ते करा म्हणावे.

**पू. बाबा :** एक तर काळ विसरायचा प्रयत्न करावा नाहीतर अनंत काळ प्रतीक्षा करायची तयारी ठेवावी. त्याबाबतीत शबरी आदर्श आहे. **Intense aspiration and infinite patience** अनंत काळ प्रतीक्षा करायची आणि तळमळ टिकवायची हे कठीण आहे. हे ज्याला जमले तोच काळाच्या पलीकडे जाईल.

डॉ. सोनार यांनी गुरूवर दृढ श्रद्धा पाहिजे या मुद्द्यावर भर दिला. त्यांनी त्यांच्या गुरूंच्या - पू. हरीकाकांच्या काही गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले की गुरूवर श्रद्धा बसायला काहीतरी अनुभव यावा लागतो, पू. हरीकाकांनी अनेकदा तसा अनुभव दिला.

**पू. बाबा :** सत्संगती हा राजमार्ग आहे. पण सत्संगती लाभली पाहिजे आणि लाभली तरी टिकवता आली पाहिजे. कारण देहाच्या संगतीत मनात विकल्प यायची फार शक्यता असते.

**|३४०|** (२० ऑगस्ट १९९३)

**पू. बाबा :** श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचा भाव कसा निर्माण करता येईल ह्या विषयावर आपली बरेच दिवस चर्चा चालली आहे. एक श्लोक मला थोडासा आठवत होता तो तुकाराम महाराजांवरच्या एका पुस्तकात सापडला, तो वाचून दाखवतो. त्यात पाच गोष्टी सांगितल्या आहेत. श्लोक असा आहे :

१) आनुकूलस्य संकल्प : २) प्रतिकूलस्य वर्जनम् ३) रक्षिष्यतीति विश्वास : ४) गोमृत्वं बरणं तथा ५) आत्मनिक्षेप कार्मण्ये इति सर्वभावसमर्पणम् ॥

त्याच्या अस्तित्वाची खात्री पटून आत्मनिवेदन किंवा संपूर्णपणे शरण जाण्याकरता काय केले पाहिजे ते सांगितले आहे. तो हवा असे वाटले पाहिजे. त्याच्या प्राप्तीसाठी पहिली गोष्ट म्हणजे त्याची प्राप्ती होण्यासाठी जे जे अनुकूल त्याचा संकल्प करावयाचा. संकल्प म्हणजे हेतु म्हणता येईल. त्याची प्राप्ती होण्यासाठी जे जे अनुकूल त्याची कल्पना करावयाची, विचार करावयाचा हे

positive झाले. त्याच्या प्राप्तीच्या आड जे जे काही येईल ते टाकावयाचे, सोडावयाचे हे negative झाले; म्हणून प्रतिकूलस्य वर्जनम्।

**साधक प** : मला वाटते, ज्याला साध्य झालेले आहे तो कसा असतो त्याची ही लक्षणे असावी.

**साधक ग** : नाही. वर्जनम्, वरणम् या रूपांवरून हे करावे असे सांगितलेले आहे. म्हणून हे सिद्धलक्षण नसून साधकांसाठीच आहे.

**पू. बाबा** : त्याच्या प्राप्तीसाठी अनुकूल म्हणजे काय करावे ते सांगा. नुसते त्याला आवडते ते ते करावे असे मोघम उत्तर नको.

**साधक क** : श्रीमहाराजांनी नीतिमत्तेचे आचरण आणि अखंड नामस्मरण ह्या दोन गोष्टी सांगितलेल्या आहेत.

**पू. बाबा** : मधले पवित्र अंत:करण विसरलात.

**साधक क** : नीतीच्या आचरणात शुद्ध अंत:करण आलेच.

**पू. बाबा** : शुद्ध अंत:करण अणि पवित्र अंत:करण ह्यामधे फरक आहे. शुद्ध अंत:करणाचा माणूस पवित्र अंत:करणाचा असेलच असे नाही. पवित्र म्हणजे holy.

**साधक क** : मला मान्य आहे. पण नीतिमत्तेचे आचरण आणि तेथे भगवंताचे नामस्मरण हे पवित्र अंत:करण असेल तरच शक्य आहे.

**पू. बाबा** : आपण नीतीने वागतो आणि नामस्मरणही करतो पण आपले अंत:करण पवित्र झालेले आहे असे वाटते का?

**साधक क** : कां नाही? ज्यावेळी आपण नामात रंगतो त्यावेळी आपले अंत:करण पवित्र असतेच.

**पू. बाबा** : तसे नाही. It must come to stay. नेहमी तसे वाटले पाहिजे. पण ते असो. प्रतिकूल ते ते टाळायचे म्हणजे काय?

**साधक ज** : साधनाच्या दृष्टीने कोणत्या गोष्टी प्रतिकूल आहेत ते आपल्याला कळत असते; त्या टाळायच्या.

**पू. बाबा** : आपले मन आपले ऐकत नाही. 'वाचा वदे परी करणे कठीण। इंद्रियांआधिन झालो देवा॥' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे.

**साधक प** : कित्येक वेळा काय टाळावे तेच कळत नाही कारण ते काहीतरी गोंडस रूप धरून येते. वास्तविक साधनाच्या आड येणारी गोष्ट असते पण ती जणू साधनाला मदत करीलसे वाटते.

**पू. बाबा :** हे तुमचे म्हणणे खरे आहे. अज्ञानामुळे फसगत होते म्हणूनच मनावर ताबा मिळवला पाहिजे. तो तरी कसा मिळवायचा? माझ्या शक्तीने मी ते करू शकत नाही हे तुकाराम महाराजांना पटले आणि म्हणून ते म्हणाले, 'आतां आड उभा राहे नारायणा। दयासिंधूपणा सार्थ करी॥'

**साधक प :** मनावर ताबा ठेवणे कठीण जाते पण त्यामानाने कृतीवर ताबा ठेवणे सोपे आहे म्हणून आधी देहाच्या पातळीवर साधनाला प्रतिकूल वागणे थांबवले पाहिजे. मग मनाप्रमाणे शरीर वागत नाही अशी मनाची खात्री झाली की ते दुबळे होईल आणि त्यानंतर त्याच्यावर ताबा मिळवणे सोपे जाईल.

**साधक ग :** प्रतिकूल गोष्टी वर्ज करायच्या म्हणजे साधन चतुष्टयात सांगितलेल्या शम दमादि गोष्टी आवश्यक आहेत.

**पू. बाबा :** होय. अगदी देहाच्या पातळीवरही ते आवश्यक आहे. उदाहरणार्थ तितिक्षा घ्या. प्रकृती ठीक नाही, किंवा फार उकडते आहे म्हणून नामस्मरण होत नाही हे बरोबर नाही. ते सहन करूनच साधन करावे लागेल. पुढे म्हटले आहे 'रक्षिष्यतीति विश्वास:' तो माझे रक्षण करतो, नव्हे करेल; भविष्यकाल आहे. रक्षण करेल म्हणजे काय?

**साधक ग :** मी माझे रक्षण करू शकत नाही ही खात्री झाली म्हणजेच माणूस रक्षणासाठी दुसरीकडे आधार शोधू लागतो. रक्षणामध्ये feeling of security आहे.

**साधक प :** आपली रक्षणाची कल्पना म्हणजे आपल्यावरचे संकट टळले की रक्षण झाले असे आपण म्हणतो. पण आपल्या प्रवचनात श्रीमहाराजांनी म्हटले आहे की तुम्हांला तयार करायला, तुमची परीक्षा घ्यायला म्हणून मी संकटे पाठवतो आणि मलाच तुम्ही ती दूर करायला सांगता. अशाने तुम्ही तयार तरी कसे होणार?

**पू. बाबा :** आपल्याला वाटते की आता आपले वय झाले; आता पैसा, नांवलौकिक यात आपण गुंतलेलो नाही, पण आज जे आहे त्याला धक्का लागला, समजा, सगळा पैसा बुडाला तर स्थिर मनाने साधन होईल? काहीही होवो, तो रक्षण करणारा आहे अशी ज्याची खात्री झाली तोच तयार होईल. तेथे मग खऱ्या अर्थाने feeling of security आहे. 'गोमृत्वं वरणं' म्हणजे तो रक्षण करेल हा विश्वास आहे म्हणून मी त्याचा रक्षणकर्ता म्हणून स्वीकार करून भविष्यकाळाची चिंता सोडली पाहिजे. त्याच्याशिवाय दुसऱ्या कशाचाही आणि कोणाचाही आधार वाटता कामा नये. 'आत्मनिक्षेप कार्मण्ये' म्हणजे

कर्म करतांना मी बाजूला ठेवून तो कर्ता आहे हे पटले पाहिजे. हे सगळे घडणे म्हणजे त्याला सर्वतोपरी समर्पण होणे आहे. तो आहे ही खात्री पटल्याखेरीज ह्या सगळ्या गोष्टी होणारच नाहीत आणि एकदा का तशी खात्री पटली तर त्या घडायला आज जे कठीण वाटते ते तसे वाटणार नाही. तोच सगळे करवून घेईल.

**साधक ब** : मी पाहिले आहे की आपले कर्तृत्व नाहीच; आणि असे असूनही प्रत्येक ठिकाणी आपण मार खात असतो. म्हणून प्रत्येक गोष्ट - मग ती चांगली असो या वाईट - त्यांना सांगण्याचा अभ्यास केला पाहिजे. मी चुकलो हेदेखील त्यांना सांगितले पाहिजे.

**पू. बाबा** : श्रीमहाराज सर्वत्र आहेत. ते माझी प्रत्येक कृती, इतकेच नव्हे तर विचारही जाणतात कारण ते अंतर्यामी आहेत. म्हणून प्रत्येक गोष्ट त्यांना सांगायची सवय लावून घेतली तर त्यांच्यासमोर करायची लाज वाटेल अशी गोष्ट हातून होणारच नाही. कोणताही विषय भोगायचा झाला, उदाहरणार्थ, काही खावेसे वाटले तर त्यांना सांगावे आणि नीतिविरोधी वर्तन करू नये. त्यांच्या ज्ञानाबद्दल आणि क्षमाशीलतेबद्दल काय सांगू? नागपूरचे श्री. रामभाऊ मनोहर श्रीमहाराजांकडे येत असत. पुढे एकाएकी ते यावयाचे बंद झाले आणि काही वर्षांनंतर परत आले. श्रीमहाराजांना (पेटीवर) ते भेटले तेव्हा त्यांना थोडे अवघड वाटत होते. ते आणि मी दोघेच होतो. श्रीमहाराजांनी त्यांना इतके दिवस का आला नाहीत वगैरे काहीच विचारले नाही. मात्र बोलण्याच्या ओघात एकदम म्हणाले, माझा माणूस जातो म्हणून कोठे जाईल? त्याला परत यावेच लागते; म्हणून या गोष्टीचे वैषम्य वाटून घेऊ नये.

## |३४१| (२७ ऑगस्ट १९९३)

**पू. बाबा** : रामचरित मानसच्या बालकाण्डात तुलसीदासांनी म्हटले आहे.

ब्रह्म रामतें नामु बड़ बरदायक बरदानी।
रामचरित सतकोटिमहँ लिय महेश जिय जानी॥ १.२५॥

म्हणजे ब्रह्म आणि साक्षात राम यांच्यापेक्षाही रामनाम श्रेष्ठ आहे; इतकेच नव्हे तर शतकोटी श्लोक विस्तार असलेल्या रामायणात केवळ रामनाम श्रेष्ठ आहे हे ओळखून शंकरांनी तेच धारण केले आहे असे तुलसीदास सांगतात. ब्रह्म आणि राम यांपेक्षा रामनाम श्रेष्ठ कसे? (पहा : अध्यात्म संवाद भाग १, संवाद क्र. ७४)

**साधक ग :** निर्गुण ब्रह्म आणि सगुण राम या दोहोंनाही नाम व्यापून आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीही 'सगुण निर्गुण एक गोविंदु रे' म्हटले आहे.

**पू. बाबा :** नामाचे हे मोठेपण आपल्याला का समजत नाही? आपल्याला अनुग्रह म्हणून श्रीमहाराजांनी त्रयोदशाक्षरी मंत्र दिला आहे आणि जिथे नाम आहे तिथे मी आहे असे सांगितले आहे. असे असतांना आपले नामस्मरण चांगले का होत नाही?

**साधक प :** चांगले नाम म्हणजे 'असे' नाम वगैरे कल्पना करण्यापेक्षा त्या नामाची शक्ती कळावी यासाठी नामाचीच प्रार्थना करावी. सगुण आणि निर्गुण या दोहोंपेक्षा जर नाम श्रेष्ठ आहे आणि त्यांना जोडणारे आहे तर त्या नामालाच शरण जावे. इतर विषय जसे आत्मसात होतात तसे नाम आत्मसात होण्यासाठी नामाचाच उपयोग होईल. साधनातून अमुक व्हावे, तमुक व्हावे अशा ज्या अपेक्षा असतात त्या गेल्या पाहिजेत. गुरूंनी नाम दिले, ते मी घेतो. त्यातून काय व्हावयाचे ते ते पाहतील असा दृढ विश्वास पाहिजे.

डॉ. सोनार आलेले होते. ते म्हणाले की एकदा गुरूंवर सोपवलेत की मग संशय राहाता कामा नये.

**पू. बाबा :** Commentaries on Living मधे जे. कृष्णमूर्ती म्हणतात की जीवनात स्वस्थता - हार्मनी पाहिजे; ती नसते. कारण लहानपणापासून तुम्हांला एकामागून एक समस्या निर्माण करून त्या सोडवायची धडपड करायलाच शिकवतात. त्याला ते conditioning म्हणतात. म्हणून ते म्हणतात की Deconditioning केल्याखेरीज जीवनात समाधान येणार नाही. हे कसे करता येईल? मला वाटते की त्याला दोन मार्ग आहेत. १) राम कर्ता यावर विश्वास. अर्थात हा विश्वास ठेवतांना तो माझा हितकर्ता आहे, रक्षक आहे हा विश्वास हवा. २) विचारांचा मार्ग. असलेल्या समस्येचा आपल्या परीने विचार करून प्राप्त परिस्थितीमधे काय करणे शक्य आहे ते पहावे व करावे.

डॉ. सोनार आलेले असल्यामुळे आज बऱ्याच जुन्या गोष्टींची व मुद्द्यांची उजळणी झाली. काही हकिगती प्रथमच ऐकावयाला मिळाल्या त्या देत आहे.

१) एकदा हरिभक्तिपरायण ल. रा. पांगारकर भटजीबापूंकडे गेले होते. पू. बाबा त्यांच्याबरोबर गेले होते. भटजीबापू चांगले गात असत. पांगारकर भेटल्यावर त्यांनी 'उद्धवा शांतवन कर जा, त्या गोकुळवासि जनांचे' हे पद गावयाला सुरुवात केली. अर्धे पद म्हणून झाले असेल, गातांना ते आणि ऐकतांना पांगारकर, दोघांच्याही डोळ्यांतून अश्रू वाहू लागते आणि गाणे

थांबले. संतचरित्रात पांगारकरांनी ह्या घटनेचा उल्लेख केला आहे आणि म्हटले आहे की त्यावेळी आम्ही दोघेही आनंदरसात डुंबत होतो.

२) मालाडच्या जुन्या घरात रविवारच्या प्रवचनाला खूप गर्दी होत असे. ऐकायला माणसे बाहेर उभी राहात असत. पू. बाबा एकदा श्रीमहाराजांना म्हणाले की जागा कमी पडते. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, जागा कितीही वाढवली तरी कमीच पडेल, आणि आज आपण पाहतोच आहोत की पूर्वीच्या मानाने बसायला पुष्कळ जास्त जागा असूनही ती अपुरीच पडते.

३) आपण जर एखाद्या सत्पुरुषाचे चिंतन करीत असलो तर त्याच्या विचारचित्रांतून (Thought forms) तो आपल्यापुरता प्रगट होतो. व्हाइन नांवाच्या एका मानसशास्त्रज्ञाने म्हटले आहे की He enlivens for you.

४) डॉ. सोनारांनी एक हकिगत सांगितली. एकदा ते जी. डी. बिर्लांकडे बसलेले असतांना कॉंग्रेस पक्षाचे एक पुढारी बिर्लांना भेटायला आले आणि त्यांनी त्यांच्याकडे पक्षासाठी पैसे मागितले. बोलणे चालू असतांना नीतीचा विषय निघाला तेव्हां ते म्हणाले की देशाच्या भल्यासाठी आम्हांला तुम्ही पैसे देण्यात अनीती नाही. ते पुढारी गेल्यानंतर बिर्लाशेठनी डॉ. सोनारांना भर्तृहरीच्या वैराग्यशतकातील एक श्लोक सांगितला. श्लोक असा :

भोगे रोगभयं धने नृपभयं भ्रंशोभयं कूलिनाम्।
माने दैन्यभयं बले रिपुभयं रूपे जरायां भयम्।
शास्त्रे वादिभयं गुणे खलभयं काये कृतान्ताद्भयम्।
सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां शम्भो: पदम् निर्भयम्॥

श्लोकाचा भावार्थ असा की केवळ भगवंताच्या चरणांपाशीच माणूस भीतिरहित होतो. नाहीतर भोगी माणसाला रोगाचे भय, धनवानाला राजाचे, कुलीनाला कुल भ्रष्ट होण्याचे, मान मान्यता मिळालेल्याला अपमानाचे, बलवानाला शत्रूचे, रूपवानाला म्हातारपणाचे, विद्वानाला वादात दुसरा हरवेल असे, सद्गुणी माणसाला दुष्टाचे आणि शरीराला मृत्यूचे भय असते.

## ।३४२। (३ सप्टेंबर १९९३)

**पू. बाबा :** रविवारच्या निरूपणाला येणारे एक गृहस्थ आहेत, त्यांनी श्रीमहाराजांच्या एका वचनाचा अर्थ विचारला आहे. आपल्याकडे अशी पद्धत आहे की लग्नाच्या वेळी नवरामुलगा मुलीच्या घरी लग्नासाठी जातो व लग्नानंतर ती नवरी त्याची होऊन त्याच्या घरी येते. लग्न लावायसाठी पुरोहित लागतो. ही

प्रथा लक्षात घेऊन श्रीमहाराजांनी म्हटले आहे की 'जीवाचे वृत्तीशी लग्न लावायचे काम नाम करते.' म्हणजे जीवाने लग्नासाठी वृत्तीच्या घरी जायचे आहे. आपण आधी वृत्ती म्हणजे काय ते पाहू. १) वृतपासून वर्तुळ, वृत्ति हे शब्द बनतात. एका विशिष्ट विचारात मन गुंतले की ते त्यामधेच चकरा मारू लागते. आपण त्या भोवऱ्यात सापडतो आणि आपल्या प्रयत्नाने त्यातून बाहेर पडणे शक्य नसते. २) वृत म्हणजे व्यापणे. आलेली वृत्ती आपल्या देहमनाला पूर्णपणे व्यापून टाकते. ३) वृत्तीचा तिसरा अर्थ निवड करणे असा आहे. आपण यांपैकी दुसरा अर्थ घेऊ. वृत्ती आपल्या मनाला पूर्णपणे व्यापते. वेदान्ताचे म्हणणे आहे की आपले मन हा सत्त्वचित्त म्हणजेच हिरण्यगर्भ किंवा विश्वमनाचा अंश आहे. त्यामुळे त्याचे गुणधर्म आपल्या मनात आलेले आहेत. मनामधे एकसारख्या वृत्ती उठत असतात. एक वृत्ती उठते, ती विराम पावते आणि त्याचवेळी दुसरी वृत्ती वर येते. योगवासिष्ठात म्हटले आहे की दोन वृत्तींच्या मधे संधि असते. त्यामधे नाम टिकले पाहिजे. वृत्तीबद्दल बोलतांना दुसऱ्या एका वेळी श्रीमहाराज म्हणाले की 'वृत्तीच्या तोंडीं नाम द्यावें.' जीवाचे वृत्तीशी लग्न लावायचे म्हणजे काय आणि नाम ते कसे करते? तसेच वृत्तीच्या तोंडी नाम द्यायचे म्हणजे काय आणि ते कसे द्यायचे?

चर्चा सुरू झाली तेव्हां सर्वांचे म्हणणे असे होते की ही दोन वचने तशी एकमेकांशी संबंधित नाहीत; त्यामुळे त्यांचा वेगवेगळा विचार केला पाहिजे. जीवाचे वृत्तीशी लग्न लावायचे म्हणजे काय याबद्दल प्रथम चर्चा झाली.

**साधक प :** लग्न झाले की स्त्री नवऱ्याची होते. तिच्यात काही गुणदोष असतात, त्यांसह तो तिचा स्वीकार करतो. तसे कोणतीही वृत्ती आली तरी ती चांगली वाईट न म्हणता तिचा स्वीकार करणे हे वृत्तीचे जीवाशी लग्न लावणे आहे.

**पू. बाबा :** कृष्णमूर्तींनी हे चांगले सांगितले आहे. आपल्या मनात उठणाऱ्या वृत्तींमधून आपण निवड करीत असतो. तसे न करता त्या कशा येत आहेत इकडे अलिप्तपणे पाहाता आले पाहिजे; त्यांच्यामागून जाता कामा नये. यालाच त्यांनी choiceless awareness म्हटले आहे. श्रीमहाराज म्हणाले की आपल्यामधे आवड, नावड असते आणि त्यामधून आपण निवड करतो. हे निवड करणे गेले पाहिजे. जे येते आहे ते येऊ द्या.

**साधक ज :** मला वाटते की वृत्ती येतात त्या माझ्या मनातून उठत असल्या तरी माझे मन जर त्या विश्वमनाचा अंश आहे तर त्या वृत्ती विश्वमनातून माझ्या

द्वारा येत आहेत. म्हणजे त्या वृत्तीही परमेश्वरानेच पाठवल्या आहेत असे वाटले तर ही आवड नावड नाहीशी होईल.

**साधक प :** सामान्यत: वृत्ती येतात व जातात. पण आपण काही वृत्तींच्या मागून जातो. उदाहरणार्थ, भुकेची वृत्ती उठली तर अन्न खाऊन ती शांत करावी. त्यावर जास्त विचार कशाला करायचा?

**साधक भ :** भुकेसारख्या वृत्तींचे सोडा. पण काही वृत्ती वाईटही असतील. त्याही परमेश्वराकडून आल्या असे कसे म्हणायचे?

**साधक प :** काय हरकत आहे? जे सगळे येते ते त्याच्याकडूनच येते. ते चांगले आणि वाईट इत्यादी आपण ठरवतो.

**साधक ग :** सामान्यपणे वृत्ती आली आणि गेली तर ठीक आहे. पण हे तेथेच थांबत नाही. वृत्तीतून ऊर्मि आणि ऊर्मीतून कृती असा क्रम असतो. त्यामुळे अनिष्ट वृत्ती आली आणि तशी कृती झाली तर हे भगवंताकडून आले असे कसे म्हणायचे?

**साधक प :** आपण साधन करतो आहोत आणि नीतिधर्माने वागत आहोत हे गृहीत आहे.

**साधक ब :** मनात वाईट विचार येतात, पण जोपर्यंत तशी कृती होत नाही तोपर्यंत आपण सुरक्षित आहोत. ते सांभाळावेच लागेल. वृत्ती चांगल्या असोत वा वाईट, त्या नामस्मरणाला घातकच ठरतात. शत्रूशी भांडण्यात वेळ गेला काय किंवा मित्राशी गप्पा मारण्यात वेळ गेला काय, गाडी चुकतेच असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे ते अगदी खरे आहे. म्हणून येणाऱ्या वृत्तींची उपेक्षा करून नाम चालू ठेवले पाहिजे. आपल्या सगळ्या वृत्तींना उपाधि असतात. याउलट नाम निरुपाधिक आहे. तेच वृत्तींना शांत करेल.

**साधक क :** नाम वृत्तीशी जीवाचे लग्न लावून देते. नामाच्या ह्या कार्यामुळे वृत्तींचा पूर्णपणे लय होतो. इतर सगळ्या वृत्ती नाहीशा होऊन केवळ भगवंताची वृत्ती राहिली की जीव भगवंतमय होतो. मग झोप ही वृत्तीदेखील सामान्य झोपेच्या पातळीवर राहात नाही.

**पू. बाबा :** जीवाचे वृत्तीशी लग्न लावायचे म्हणजे union - योग हा अर्थ आहे. योगाचा अभ्यास करून चित्तवृत्तींचा निरोध केला तर द्रष्ट्याचे स्वत:च्या रूपामधे राहाणे घडते. 'तदा द्रष्टुरूपे अवस्थानम्' ॥ १.३ ॥ एरवी म्हणजे जेव्हां चित्तवृत्तींचा निरोध होत नाही तेव्हां द्रष्टा वृत्तीशी सरूप झालेला असतो. 'वृत्तिसारूप्यमितरत्र' ॥ १.४ ॥

**साधक ग** : योगाने जसा चित्तवृत्तींचा निरोध होतो तसा तो भक्तीनेही होऊ शकतो. योगात वृत्तींना दाबणे आहे तर भक्तीत त्यांना योग्य दिशेने वळवणे आहे. 'त्याची इच्छा' म्हणण्यामध्ये मी नाहीसा होण्याची प्रक्रिया आहे आणि नाम जीव आणि वृत्ती यांचे लग्न लावते म्हणजे वृत्तीला नामात गुंतवून हळूहळू भगवंताशी एकरूप करते.

**पू. बाबा** : बरे, वृत्तीच्या तोंडी नाम द्यायचे म्हणजे काय ?

**साधक ग** : श्रीमहाराजांचे दुसरे एक वचन आहे की नाम बेंबीच्या देठापासून घ्यावे. आपल्या वृत्ती वासनेतून येतात आणि वासनांचे मूळ बेंबीपाशी आहे. बेंबीच्या देठापासून नाम घेणे म्हणजे जेथे वासनांचा आणि वृत्तींचा उगम आहे तेथेच नाम ठेवणे आहे. हे वृत्तीच्या तोंडी नाम देणे आहे. हे जमले की वृत्ती उठेल ती नामाचीच उठेल.

**पू. बाबा** : पण हे कसे करायचे ?

**साधक ब** : आपली इच्छा आणि आपले कर्तेपण त्याच्यावर सोपवल्याखेरीज वृत्तींचा प्रवाह थांबणार नाही.

**पू. बाबा** : आपल्या कोणत्या वासना आपल्याला त्रास देतात याचा थोडे स्वस्थ बसून विचार करावा. लौकिकाची वासना, पैशाचा लोभ, कामवासना, शास्त्रग्रंथांचे ज्ञान व्हावे ही इच्छा इत्यादींपैकी कोणते मला साधनात त्रास देते ?

**साधक ग** : यांपैकी कोणतीही एखादी वासना प्रबळ असती तर ते लक्षात येणे सोपे झाले असते. पण आमचे मन शंभर ठिकाणी बसलेले आहे त्यामुळे जास्त त्रास होतो. तथापि अंतर्मुख झाले पाहिजे हे खरेच.

**साधक प** : वृत्तींच्या तोंडी नाम द्यायचे म्हणजे शब्दश: त्यांच्या तोंडी नाम द्यायचे. आपल्या वृत्ती एकसारख्या हे पाहिजे, ते पाहिजे म्हणून तोंड वासून पुढे येत असतात. त्यांनी काहीही मागायसाठी तोंड उघडले की त्यामधे नामच द्यायचे ! आपल्याला पाहिजे ते मिळत नाही, उलट तोंड उघडले की त्यात नाम पडते असा अनुभव येऊ लागला की वृत्तींचे आ करणे बंद होईल; नाहीतर त्यांना नाम आवडू लागेल. दोन्ही पक्षी ते हितकर आहे.

**पू. बाबा** : वा ! हा अर्थ उत्तम आहे.

(पहा : अध्यात्म संवाद भाग २, संवाद क्र. १९२ व १९३)

|३४३| (१० सप्टेंबर १९९३)

**पू. बाबा** : संसारात गरीब असो श्रीमंत असो, लहान असो वा मोठा असो, शिकलेला असो किंवा अडाणी असो, सर्वांना प्रॉब्लेम्स असतात. दुर्लक्ष करायचे म्हटले तरी ते मानगुटीला बसतात. एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो की दारिद्र्यात - म्हणजे गरिबी नव्हे, तर सकाळी जेवायला मिळाले तर रात्री मिळेल की नाही याची वानवा असतांना - साधन चांगले होणे किंवा टिकणे कठीण आहे. यावर श्रीमहाराज म्हणाले की आणि देहदु:खात. म्हणजे दारिद्र्य आणि देहदु:ख असतांना साधकाची खरी परीक्षा असते. म्हातारपण फार कठीण आहे. देहदु:ख असतांना साधन चालू ठेवणे सोपे नाही हे मी स्वत:वरून सांगतो.

**साधक ब** : देहदु:ख कोणालाच सुटलेले नाही म्हणून आज प्रकृती चांगली असतानाच साधनाची अशी उंची गाठता आली पाहिजे की देहदु:ख असतांना देखील ते विनाकष्ट चालू राहील. त्या पातळीवर माझे साधन जाऊ द्या अशी माझी श्रीमहाराजांना आणि तुम्हांला प्रार्थना आहे.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांचे एक वचन आहे. 'तुम्हांला नाम दिलेले आहे पण तुम्ही त्याला बंधारा घालता' या वचनाचा अर्थ काय?

**साधक ग** : बंधारा प्रवाह अडवतो. अंत:करणात नामाचा प्रवाह आला पाहिजे पण तो येऊ शकत नाही कारण आम्ही मधे प्रपंचाचा बांध घातलेला आहे.

**साधक प** : जोपर्यंत नाम हेच सत्य हे पटत नाही आणि नामाकडून आपल्या काहीतरी, विशेषत: सांसारिक अपेक्षा (कळत वा नकळत) असतात तोपर्यंत हा बंधारा राहणारच.

**साधक क** : जीवनात मिळणारे सुख तात्पुरते असते आणि त्याच्यातच दु:खाची बीजे असतात. जीवनातील सुखाच्या अनित्यपणाची जाणीव झाली तर माणसाचे नामाकडे लक्ष लागेल. नाहीतर सुखदु:खाचे हेलकावे राहाणारच.

**साधक ग** : म्हणूनच विठ्ठलाचे वर्णन करतांना 'सर्वसुखाचें आगर' किंवा पसायदानात 'किंबहुना सर्वसुखी' म्हटले आहे. ज्या सुखाला दु:खाचा स्पर्शही नाही ते शाश्वत सुख म्हणजे सर्वसुख.

**पू. बाबा** : गीतेने 'सुखदु:खेषु समत्व' या अर्थाने साम्ययोग सांगितला आहे. दु:खात भगवंताची आठवण शेवटी होते पण सुखात माणूस त्याला सहज

विसरतो. म्हणूनच कबीरांनी म्हटले आहे "दुखमें सुमिरन सब करें सुखमें करें न कोय। जो सुखमें सुमिरन करें दुख काहेको होय॥" श्रीमहाराजांनी जो बंधारा म्हटले आहे तो देहबुद्धीचा बंधारा आहे. हा बंधारा ढासळल्याखेरीज साधनात प्रगति होणार नाही. माझ्या प्रयत्नाने मी हे करेन असे म्हणणे वेडेपणाचे आहे म्हणून नामाला बसतांना त्यांची प्रार्थना करावी. माझ्याकडून साधन करवून घ्या म्हणावे व नाम घेतांना शक्य तितकी त्यांची आठवण ठेवावी. इतर दैनंदिन व्यवहार करतांना त्यांचे स्मरण ठेवावे म्हणजे कर्तेपणाची जाणीव जाईल आणि मग कर्तेपणाचा आणि देहबुद्धीचा बंधारा विरघळून जाईल.

## **|३४४|** (१७ सप्टेंबर १९९३)

**पू. बाबा :** कृष्णमूर्तींचे जर्नल वाचत होतो, त्यात त्यांनी म्हटले आहे की All our desires come from sensations. म्हणजे वासनांचे भोग इंद्रियांच्या द्वारा होतात. म्हणूनच 'शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे।' म्हणणाऱ्या ज्ञानेश्वर महाराजांनी इंद्रियांचे निर्दालन केले पाहिजे अशी कडक भाषा वापरली आहे.

श्री. काका दीक्षित नांवाचे एक गृहस्थ पू. विष्णुपंत लेल्यांचे शिष्य होते. त्यांनी त्यांचे (लेले यांचे) चरित्रही लिहिलेले आहे. त्यांना कृष्णमूर्तींचे सांगणे फार आवडत असे. ते नेहमी श्रीमहाराजांकडे येत असत आणि आल्यावर कृष्णमूर्तींनी काय सांगितले ते सांगत असत. श्रीमहाराज एकदा त्यांना म्हणाले की कृष्णमूर्ती सांगतात ते (म्हणजे त्यात गुरु नको हे सांगणेही आले) बरोबर आहे. तथापि तिकडच्या लोकांना समजेल अशा रीतीने ते सांगतात. आपल्याला त्याची जरूर नाही. उदाहरणार्थ, ते जेव्हां Freedom from the known म्हणतात तेव्हां ते दृश्याला the known म्हणतात. आपल्या संतांनीही दृश्यात गुंतू नका असेच सांगितले आहे.

जर्नलच्या दुसऱ्या एका भागात त्यांनी वृक्षामधे मुळाकडून वर चढणाऱ्या जीवनरसाचा आवाज त्यांना ऐकू येतो असे म्हटले आहे; तसेच पृथ्वीचाही आवाज ऐकू येतो म्हटले आहे. आणखी एका ठिकाणी दगडाचाही आवाज ऐकू येतो म्हटले आहे. हा आवाज म्हणजेच नामाचा अनाहत नाद आहे. तो आपल्या आंतमधेच आहे. काय केले म्हणजे आपल्याला तो ऐकू येईल?

**साधक प :** आपण जे काही बोलतो त्याची बोलतानाच्या क्षणापासूनच कृतीत परिणती झाली तर बोलण्याला काही अर्थ आहे. नाम हे नुसते शक्तिमय नसून ज्ञानमयही आहे.

**पू. बाबा :** श्रीमहाराज एकदा म्हणाले की ब्रह्माला जुळे झाले. नाम आणि प्रेम. नाम सच्चिदानंदस्वरूप आहे. सत् हे केवळ असणे आहे; पण हे सत् चित् म्हणजे ज्ञानमयही आहे. ते पूर्ण आहे म्हणून आनंदाने ओसंडते आहे. म्हणजेच ते प्रेममय आहे. नाम घेतांना आपल्याला याचा प्रत्यय आला पाहिजे.

**साधक ज :** नाम घेतांना निव्वळ संख्येपेक्षा चित्त एकाग्र करून आत उतरण्याचा म्हणजे खऱ्या मी जवळ जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**साधक प :** नाम घेतांना हे नाम कोठून येते आणि ते कोण घेतो आहे यावरही मन एकाग्र करता येते.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांनी एका पत्रात लिहिले होते - "पाणी माती एक झाले। वेगळे नाहीं करता आलें। निवळी घालावी पाण्यांत। पाणी स्वच्छ होते जाण॥ तैसा विषयांत राहून जगतीं। नामाची ठेवावी संगती। विषयाचें विष शोषून घेई। ऐसी आहे नामाची प्रचीति॥" म्हणून नामाजवळच काय ते मागावे. (पहा : अध्यात्म संवाद भाग १, संवाद क्र. ७७)

**साधक प :** नामस्मरण नीट होत नाही हे देखील नामालाच सांगावे. त्याची प्रार्थना करावी. ते आत आहेच.

**साधक क :** ह्या सगळ्या गोष्टी घडायला नाम हेच सर्वस्व वाटले पाहिजे. स्वामी रामदास जसे नामस्मरण करतांना स्वस्थ होत व ते थांबले की अस्वस्थ होत तसे झाले पाहिजे.

**पू. बाबा :** सर्व जीवन नामाला सोपवावे. फक्त नामच खरे आहे हे मनाला पुन:पुन्हा सांगावे आणि सर्व व्यवहार नामाला सांगून करण्याचा अभ्यास वाढवावा.

# परिशिष्ट

अध्यात्म संवाद भाग तिसरा. महत्त्वाचे विषय.

| **संवाद क्रमांक** | **विषय** |
|---|---|
| २४७. | नामाचा विश्वास. प्रारब्ध व क्रियमाण. विवेक. |
| २४८. | नियती व पुरुषप्रयत्न. नामसाधनात शिळेपणा. निवृत्तीची तळमळ. |
| २४९. | कृष्णमूर्ती, वर्तमानात जगा. स्वामी रामदास, जीवनात सुसंवाद. निरुपाधिक नाम. आग्रह सुटावा. वैराग्य. |
| २५०. | कृष्णमूर्ती अद्वैत सांगतात. कृष्णमूर्तींचे काही उतारे. श्रीमहाराजांची वचने. ज्ञातृत्व, कर्तृत्व व भोक्तृत्व. देहतादात्म्य. |
| २५१. | अनाहत जपाचा अर्थ. नामाचे खरेपण. होऊ नको....मनाआधीन. |
| २५२. | श्रीमहाराज नामावतार - स्वामी रामदास. कृतज्ञता भाव. मुक्त कोण. कसे ऐकावे. |
| २५३. | नामस्मरण हा भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग. सत्पुरुषांचे inner circle. श्रींची वचने. |
| २५४. | पू. बाबांचा वाढदिवस, अमानित्वाचा अभ्यास. पू तात्यासाहेब. पैशाचे दोष. |
| २५५. | 'लौन गला पानी मिला'. मृत्यूची जाणीव. समजणे जाणिवेत यावे. |
| २५६. | ज्ञानाचा भूमिका. सत्संगाचे महत्त्व. |
| २५७. | भीती व काळजी - कृष्णमूर्ती. वासना व देहबुद्धी नाहीशी करण्याचे मार्ग. |
| २५८. | Mysticism. परमार्थ व एकांत. अस्तित्व. |
| २५९. | प्रारब्ध व रामइच्छा. |
| २६०. | पाहण्याचे परमार्थातील महत्त्व. नामाची संगत. प्रेम व आसक्ती. |
| २६१. | नामाची शक्ती व पावित्र्य. नामाने शक्तिसंचय. |
| २६२. | गुरु जागे करतात. खरी परीक्षा दारिद्र्य व देहदुःखात. |
| २६३. | नामाची Truth value व Reality value. मन व भावना. |
| २६४. | रामाच्या हातचे खेळणे व्हावे. |
| २६५. | नाथांचे चतुःश्लोकी भागवत. डब्यांचे शंटिंग, समर्थांचे पंचसमासी. |
| २६६. | जीवनाचा साचा, 'शाधि मां त्वां प्रपन्नम्' प्रार्थनेचे महत्व. धर्मदास. |
| २६७. | अखंड नाम की मौन. प्रार्थना, शरणागती. |
| २६८. | ऋत व सत्य. वासना. साधनाचा वेळ वाढवावा. |
| २६९. | वासना, प्रेम, भगवंताचे प्रेम. |



प्रा. के. वि. बेलसरे

अध्यात्मविषयक लेखनाप्रमाणेच पू. बाबांना अध्यात्मविषयक चर्चेचीही आवड होती. चर्चेत भाग घेणाऱ्या साधकांकडूनच त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची वा शंकांची उत्तरे मिळावी अशा कुशलतेने ते चर्चेचे सूत्रसंचालन करीत असत. निव्वळ बौद्धिक कसरतीचा त्यांना तिटकारा होता. चर्चेतून साधकांच्या अध्यात्मविषयक संकल्पना स्पष्ट व्हाव्या आणि साधनात त्यांची प्रगती व्हावी अशी त्यांना तळमळ होती.